# SELECTED DECISIONS

OF THE COURT OF

# SUDDER DEWANEE ADAWLUT

OF

**BOMBAY.**

COMPILED BY JAMES MORRIS.

*Translated into Marathi*

BY

GANPAT SHRIKRISHNA,

Revised and carried through the press

BY

**NANA SHASTRI APTE,**

REVISER TO THE D. P. C.

AND

PRINTED FOR THE DAXANA PRIZE COMMITTEE,

AT L. M. D'SOUZA'S PRESS.

**Bombay:**

1859.

# मुंबईंतील सदर दिवाणी अदालतीच्या

निवडक ठरावांचें इंग्रेजी पुस्तक

जेम्स मारिस साहेब ह्यांनीं केलें.

त्याचें मराठी भाषांतर

गणपत श्रीकृष्ण

ह्यांनीं केलें तें

नानाशास्त्री आपटे दक्षिणा प्रैज कमिटिचे रिवैजर

ह्यांनीं तपासून शुद्ध केलें



आणि मेहरबान दक्षिणा प्रैज कमिटीनें

मुंबई मध्यें

एल. एम. डिसोजा ह्यांचें छापखान्यांत छापविलें.

सन १८५९. शके १७८१.

## प्रस्तावना.

१ संसारांत जे लोक वागणारे आहेत त्यांस देण्याघेण्याचा व्यापार करणें पडत नाहीं असें नाहीं. देण्याघेण्याचे बाबदींत दिवाणी कोडतांत ज्यांचा तंटा नाहीं असे शंभरांत एक दोन असामी सांपडतील; तेव्हां लोकांस दिवाणी कायद्यांची चांगली माहिती असणें अवश्य आहे. जिल्ह्यांत हुकुमनामे होतात; त्यांवर सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपिलें होऊन जे निवाडे होतात त्यांचे तरजुमे लोकांस स्वभाषेंत वाचण्यास मिळाले असतां कायद्याविषयीं त्यांची चांगली समजूत होईल, आणि व्यवहारांत त्यांचे नुकसान न होतां कायद्या प्रमाणें ते तजवीज ठेवितील. न्याय करणारे लोक ( मुनसफ, सदर अमीन, प्रिन्सिपाल सदर अमीन, वगैरे ) ह्यास अशा प्रकारचे तरजूम्यांपासून उपयोग फार घडेल, व वकिलांस फार उपयोग होईल.

ह्या तरजुम्यांत जे ठराव आले आहेत ते बहुत करून सन १८५० आणि १८५१ ह्या दोन सालांतील आहेत.

हा तरजुमा करते समयीं **बाळाराम रामचंद्र व कृष्णाजीपंत जोगळेकर** ह्यांनीं मला मदत केली ह्या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

---

# स्पेशल अपील नंबर २३३६

अपिलेंट्

**नसरवान्‌जी पेस्तंजी.**

रिस्पोंडेंट्

**माणिकजी कावसजी** ह्याचे पेढीचे वारस **फ्रामजी माणिकजी, रतंजी बहिरामजी नसरवांन्‌जी बहिरामजी व मंजीभाई फरदूंजी.**

**सदर अदालतीचा ठराव.**

इसवी सन १८१७त्रां तील रोख्या वरून फिर्याद झाली होती. तेव्हां दोन्ही कनिष्ट कोडतांत दावा मंजूर झाला; परंतु **सदर दिवाणी अदालतीनें** पुऱ्या किमतीच्या छापील कागदावर रोखा नाहीं, ह्या कारणावरून दावा रद्द केला, आणि पुऱ्या किमतीचा स्टाप रोख्यास लावून पुनः फिर्याद करण्याची सवड मालकास ठेविली होती. पुढें त्याप्रमाणें रोख्याचे मालकानें केलें; परंतु सन १८१५-च्या १४व्या कायद्याप्रमाणें तो रोखा त्याचे मिती पासून ६० दिवसांत छापवावयास पाहिजे होता तो छापविला नाहीं, ह्या कारणावरून कनिष्ट कोडतांनीं दावा रद्द केला. मग तो खटला पुनः **सदरदिवाणी अदालतीकडे** आल्यावर असा निवाडा झाला, कीं सन १८२७च्या १८व्या कायद्याच्या १३व्या कलमाप्रमाणें करण्यास ह्मणजे पुऱ्या किमतीचा स्टाप लावून फिर्याद करण्यास रोख्याचे मालकास कांहीं हरकत नाहीं.

स्पेशल अपील नंबर २३७१.

अपिलेंट्

बाई अमृत अयाळ केशवजी शंकरजी व देवशंकर नंदादलाल.

रिस्पोंडेंट्

बाई कुसळ अयाळ शंकरजी गोविंदराम, देसाभाईबा, व दाजीभाईबा.

ठराव.

एका हिंदू विधवा स्त्रियेनें कुटुंबाचे रहाण्याचे घरापैकीं कांहीं भाग विकल्या वरून तिच्या सुनेनें फिर्याद केली, कीं माझे मयत नवऱ्याचे संबंधानें सदरहू घराची मी वारस आहें, सबब घराची विकरी रद्द करावी. नंतर सासूनें जबाब दिला, कीं माझा पुत्र ह्या माझ्या सुनेचा नवरा हा आपला बाप जीवंत असतां मरण पावला, ह्या कारणानें सुनेचा हक्क कांहीं राहिला नाहीं. तेव्हां मुनसफानें ठराव केला, कीं पुत्राचे पाठीमागें त्याचे बायकोस आपले सासऱ्याची जिनगी मिळण्याचा हक्क आहे. जिल्हाजडूजानें ठरविलें, कीं कोणी हिंदू मेला आणि त्यास जर पुत्र नसला, तर त्याची जिनगी त्याच्या स्त्रियेस मिळते. मग सदर दिवाणी अदालतीनें ठराव केला, कीं तंठ्यांतील घर मृत पुत्राचे स्त्रियेचे संमतावांचून सासूनें विकलें, सबब ती विकरी कोडतास मंजूर नाहीं.

स्पेशल अपील नंबर २३८५.

अपिलेंट्.

चिमणलाल हरी वल्लभ.

रिस्पोंडेंट्.

हरी वल्लभ लक्ष्मीदास व भगू लक्ष्मीदास.

दावा रुपये ५०.

ठराव.

कांहीं जमिनीचे उत्पन्नाची जप्ती झाली होती. ती जप्ती उठवि-

ण्याकरितां जमीनदारानें फिर्याद केली. तेव्हां मुनसफानें वादीचे वतीनें हुकूमनामा केला. अपिलांत जिल्हाजड्जानें ठरविलें, कीं इतर सावकारांचा हक्क सोडून जमीनदाराचाच हक्क सदरहू उत्पन्नावर अगोदर पुरा करावा असें नाहीं. नंतर मुकद्दमा सदर दिवाणी अदालतींत गेल्यावर तेथें ठराव झाला, कीं साऱ्याचे बाकीकरितां जमिनीचें उत्पन्न अठकावून ठेवण्यास जमीनदारास हक्क आहे, असें कायद्यांत साफ आहे. साऱ्याबद्दल उत्पन्न अटकावूंनये, असा कायद्याविरुद्ध व चालीविरुद्ध जर कौलनाम्यांत साफ करार नसेल, तर तो कौलनामा कायद्यास व चालीस धरून आहे, असें समजलें पाहिजे.

## स्पेशल अपील नंबर २४८७.

अपिलेंट्.

**रूपजी अखू.**

रिस्पोंडेंट्.

**भवानी शंकर नथू.**

दावा रुपये १६१.

**ठराव.**

एका मनुष्यानें अर्धे घर विकत घेतलें. नंतर कांहीं दिवसांनीं बाकीचें अर्धे घर मालकानें दुसरे मनुष्यास विकलें. तेव्हां पहिलें अर्धे घर विकत घेणारानें फिर्याद केली, कीं शास्त्रावरून व चालीवरून बाकीचें निमें घर विकत घेण्याविषयीं पहिल्यानदां माझा हक्क आहे; ह्यास्तव ही विकरी रद्द करावी. बलसरचे मुनसफानें वादीचे वतीनें निवाडा केला. अपिलांत सुरतेचे जड्जानें वादीचा दावा असे कारणावरून रद्द केला, कीं वादीचे वतीनें निवाडा करण्यासारखें त्यानें कांहीं कारण दाखविलें नाहीं, व खासगी माल विकण्याविषयीं हुकूम करण्यास, अगर खासगी माल दगल

बाजीनें विकला असा पुरावा झाल्याशिवाय त्या मालाची विकरी रद्द करण्यास कोडतास अख्त्यार आहे किंवा कसें ह्याबद्दल आंदेशा आहे. **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झाल्यावर तेथें ठराव झाला, कीं तटच्यांतील निमें घर विकत घेण्याविषयीं चालीवरून पहिल्यानदां माझा हक्क आहे, असें वादी लिहितो. त्यास ही चाल बरोबर आहे, असें अनुमानानें दिसतें; परंतु **रिस्पांडेंट** असें ह्मणतो, कीं वादीचे खरेदीपत्रांत सदरहू चालीला सोडून चालण्याविषयीं सवड ठेविली आहे, त्यास ह्या गोष्टीबद्दल चौकशी होऊन ठराव झाला पाहिजे, ह्या कारणावरून **सदर अदालतीनें** जिल्हाजड्जाचा हुकूमनामा रद्द करून आणखी चौकशी करण्याकरितां मुकद्दमा त्याकडे परत पाठविला.

## स्पेशल अपील नंबर २४९३.

अपिलेंट.

**शेकउमर वल्लद शेकइभ्राहिम, मयत. त्याचे वारस शेकअमीन वल्लद शेकउसमान व आदम वल्लद इभ्राहिम.**

रिस्पोंडेंट

**शेकशिकंदर व शेकमुगदुम.**

दावा रुपये ९५६११६८

### ठराव.

एका मशिदीस सरकारी तिजोरींतून नक्त नेमणूक पावत असे. तीपैकीं मला हिस्सा देववावा, ह्मणून वादीनें फिर्याद केली. ती जिल्हाजड्जानें असे कारणावरून रद्द केली, कीं सदरहू नेमणूक देणें हें सरकारचे मर्जीवर आहे; व सरकारानें मेहरबान होऊन ज्या मनुष्यास ती नेमणूक दिली त्या मनुष्याशिवाय, दुसरे मनुष्यास ती नेमणुक द्यावी असा हुकूम करण्यास आह्मास अख्त्यार ना-

हीं. **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं मशिदीचे शेताच्या हिस्सेदारांस मशिदीचे सर्व उत्पन्नांतील हिस्सा मिळण्याविषयीं हक्क आहे, आणि नक्त नेमणूक देणें, हें जरी सरकारच्या खुशीवर आहे, तरी जों पावेतों ती नेमणूक चालत आहे तों पावेतों त्या नेमणूकींतील हिस्सा मिळण्याबद्दल हक्काचा ठराव करण्याचा अखत्यार कोडतास आहे.

## स्पेशल अपील नंबर २५०६.

अपिलेंट्

**नारो बल्लाळ कर्वे.**

रिस्पोंडेंट्

**त्रिंबक हरी गद्रे.**

दावा रुपये १५.

### ठराव

माझें वंशपरंपरेचें शेत प्रतिवादीकडे गहाण आहे, तें त्याकडून मला देववावें, ह्मणून वादीनें फिर्याद केली होती. **रत्नागिरीचे सिनियर** असिष्टंट् जड्जानें अपिलांत ठराव केला, कीं ही फिर्याद चालावयाची नाहीं. कारण मागील तीस वर्षांत सदरहू शेताची वहिवाट मजकडे होती, असा वादीकडून पुरावा झाला नाहीं, आणि प्रतिवादीनें शाबीत केलें आहे, कीं तंटयांतील शेत माझे कबजांत आहे व सरकारचा सारा मी देतों. स्पेशल अपील आल्यावर **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं कितीही काळ गेला असला तरी गहाण मालावर मालकाचा दावा चालण्यास हरकत नाहीं; ह्मणजे जो मालक नाहीं त्यापासून मालक पाहिजे तेव्हेळेस माल परत घेईल.

## स्पेशल अपील नंबर २५०७.

अपिलँट्.

**जोटिंगा वल्लद जाना महार.**

रिस्पाँडेंट्.

**विठू वल्लद हैबती महार.**

दावा रुपये ५१०.

**ठराव.**

महारकीच्या वतनाबाबद शेत व हक्क होते, त्यांपैकी हिस्सा घेण्या करितां ही फिर्याद केली होती, तेव्हां अपिलांत जिल्हाजडूजानें अशा कारणावरून दावा रद्द केला, कीं अशा प्रकारचे सर्व हक्क सन १८३९चा अक्ट २० व सन १८४४चा अक्ट १९ ह्यांवरून रद्द झाले आहेत. सबब अशा प्रकारचे फिर्यादींची चोकशी करण्याचा अख्त्यार कोडतास आहे किंवा नाहीं ह्याबद्दल आह्मास अंदेशा आहे. स्पेशल अपिलांत **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं जिल्हाजड्जानें जो अभिप्राय दिला तो बरोबर नाहीं, कारण सन १८३९चा अक्ट २० ह्या मुकद्दम्यास अगदीं लागू नाहीं. तंट्यांतील हक्क गांवचे महारांस चाकरीबाबद दिलेले आहेत, ते सन १८४४चा अक्ट १९ ह्यावरून रद्द झाले नाहींत.

## स्पेशल अपील नंबर २५२५.

अपिलँट्

**बापूजी विश्वनाथ.**

रिस्पाँडेंट्

**अंताजीबापूजी.**

दावा रुपये ४३६६६८.

**सदर अदालतीचा ठराव.**

कोणी एक गृहस्थ कालीकडील अमलदारास जामीन झाला

होता, त्या जामिनकीबाबद त्याला कांहीं रुपये सरकारांत भरावे लागले. त्या रक्कमेचें व्याज घेण्या करितां त्यानें सदरहू अंमलदारावर फिर्याद केली. अपिलांत रत्नागिरीचे सिनियर असिस्टंट जड्जानें ठराव केला, कीं सदरहू फिर्याद नुकसानीबद्दल समजली पाहिजे व फिर्यादीचें कारण उत्पन्न झाल्यावर सात वर्षे पावेतों वादीनें फिर्याद केली नाहीं; ह्यास्तव मुद्दतीचे कायद्याप्रमाणें ही फिर्याद चालावयाची नाहीं. स्पेशल अपिलांत ठराव झाला, कीं सदरहू फिर्याद लेखी दस्तऐवजावरून ह्मणजे जामीनकतब्यावरून आहे, सबब सन १८२७चा कायदा ५ कलम ४ ह्यांत लिहिलेल्या प्रकारची ही फिर्याद आहे, ह्मणजे ती बारा वर्षे पावेतों चालेल.

## स्पेशल अपील नंबर २६६३.

अपिलेंट्

**नाना तुळजाराम, मयत. त्याचे वारस गिरधरलाल सुंदरलाल व ब्रिजलाल, पैकी गिरधरलाल सुंदरलाल मयत.**

रिस्पोंडेंट्.

**वल्लभदास राजाराम.**

दावा रुपये २००.

## सदर अदालतीचा ठराव.

कांहीं मालावरील जप्ती उठविण्याविषयीं गहाणखतावरून फिर्याद झाली. त्या फिर्यादींत अव्वल कोडतानें व अपील झाल्यावर जिल्हाजड्जानें असा ठराव केला, कीं जप्तींतील माल दोघे भावांचा आहे, व ते दोघे भाऊ विभक्त नाहींत, आणि त्यांतून एके भावानें कर्ज केलें तें ह्या मालमत्तेसाठीं केलें नाहीं, सबब एकानें केलेल्या कर्जाचे फेडीसही मालमत्ता लावतां येत नाहीं, ह्या करितां

मालावर बसविलेली जप्ती बरोबर नाहीं. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां असा ठराव झाला, कीं कनिष्ट कोडतांनीं ज्या कारणावरून जप्ती उठविली त्याचा व फिर्यादीतील मजकुराचा अगदीं संबंध नाहीं, आणि अशा कारणावरून त्या कोडतांस ठराव करण्याचा अखत्यार नाहीं, सबब त्यांचे ठराव रद्द आहेत.

## स्पेशल अपील नंबर २७२७.

अपिलंट

**बाळापा नाईक रांजणेकर.**

रिस्पांडेंट

**अंताजी विरूपाक्ष** (हा मयत.) ह्याचा वारस पुत्र **आबाजी अनंत.**

दावा रुपये ८,२३६८१२६२.

**ठराव.**

एका मनुष्याच्या नांवाचा दस्तऐवज होता. तो त्यानें दुसऱ्या मनुष्यास दिला. त्या दुसऱ्या मनुष्यानें त्या दस्तऐवजावरून पैसा मिळण्याविषयीं फिर्याद केली. त्या फिर्यादीची चौकशी नेटीव जड्जानें करून वादीचे तर्फेनें निवाडा केला; परंतु अपिलांत तो निवाडा युरोपियन जड्जानें असे कारणावरून रद्द केला, कीं ज्या मनुष्याच्या नांवाचा दस्तऐवज आहे त्यासमात्र त्या दस्तऐवजावरून फिर्याद करण्याचा अधिकार आहे. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें. तेव्हां असा ठराव झाला, कीं कोणी मनुष्यानें आपला हक्क दुसऱ्यास दिला असतां ती गोष्ट सरकारास कबूल आहे.

## स्पेशल अपील नंबर २४९८.

अपिलेंट्

**नैनसूक** व त्याचा पुत्र **सुबराम** हे दोघे मयत. **सुबरामाची** वारस त्याची बायको **रखमाबाई.**

रिस्पोंडेंट्

**नवलजी वल्लद रोहिदास.**

दावा रुपये ४९४६५.

**ठराव.**

खातें ह्मणजे चालना हिशेब ह्यास छापनिण्याची गरज नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २५११.

अपिलेंट्

**माणिकचंद आत्माराम.**

रिस्पोंडेंट्

**पितांबर बेचर.**

दावा रुपये ७५.

**ठराव.**

एका मनुष्यानें दुसऱ्याची कांहीं जागा साधून घेतली, ती परत मिळण्याविषयीं दुसऱ्या मनुष्यानें फिर्याद केली होती. त्या फिर्यादीत जिल्हेजड्जानें कनिष्ट कोडतांचे निवाडे रद्द करून वादीचे वतीनें निवाडा अशा कारणावरून केला, कीं **अमदावाद** शहरांतील लोकांच्या वहिवाटीप्रमाणें घराच्या पाख्यांचे खालच्या जागेवर त्या घराचे मालकाची सत्ता असते; परंतु **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील आलें. तेव्हां जिल्हेजड्जाचा निवाडा रद्द होऊन दोन्ही कनिष्ट कोडतांचे निवाडे

कायम झाले; कारण जिल्हा जडूजानें आपले निवाडयांत जी सबब लाविली ती वादीनें आपले अर्जांत लिहिली नव्हती, आणि ती मजबूत आहे, असेंही जिल्हाजडूजानें दाखविलें नाहीं; ह्याशिवाय **अमदाबादे**सारखे शहरांत ही चाल असणें असंभवी आहे, कारण तेथें वस्ती दाट असल्यामुळें घरांची पाखीं दुसऱ्या घरांवर गेलेलीं आहेत.

## स्पेशल अपील नंबर २५२०.

अपिलेंट.

**अपा वल्लद कुशाबा मगर.**

रिस्पोंडेंट.

**जगु वल्लद मल्हारी मगर.**

दावा रुपये २५.

**ठराव.**

कोणी मिरासदार आपली जमीन सोडून २५ वर्षे गेला-असतां तेणें करून त्याचा त्या जमिनीवरील हक्क बुडत नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २७४०.

अपिलेंट.

**अमरचंद वल्लद भोपशिंग.**

रिस्पोंडेंट.

**विश्वनाथ पद्माकर.**

दावा रुपये १,४९१६८

**ठराव.**

**अ**नें बचा कांहीं माल गहाण ठेविला होता, त्या मालावर त्यानें जप्ती बसविली. तेव्हां बचा बाप ड ह्याकडून **अ**च्या गहाण-खताच्या पूर्वीचे तारखेचें गहाणखत **क**नें लिहून घेतलें होतें.

त्यावरून त्यानें जप्ती उठविण्याविषयीं फिर्याद केली. कनिष्ठ कोडतांनीं बाप जीवंत असतां मुलास माल गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं, ह्याकरणावरून कचा दावा मंजूरकेला; परंतु **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झाल्यावर कनिष्ट कोडतांचे ठराव रद्द झाले, कारण कनें फिर्याद केली,तेव्हां त्याचें खत छापविलें नव्हते, सबब तें खत त्या तारखेस मंजूर करून अचा दावा नामंजूर करतां येत नाहीं, आणि जो हुकूमनामा अनें ब ( मुलगा ) वर करून घेऊन जप्ती बसविली, तो हुकूमनामा होण्याचे पूर्वी ड ( बाप ) मरण पावला, ह्यामुळें अच्या हक्काला जो अडथळा होता तो दूर झाला.

## स्पेशल अपील नंबर २७५७.

अपिलेंट्.

**हणमंता** मयत, त्याचे वारस पुत्र **धोंडी** व **नाना**, हे अज्ञान, पालन करणार त्यांची आई **गाऊ** कोम **हणमंता**

रिस्पोंडेंट्.

**संतराम** बिन **भवान शिंग**

दावा रुपये ७२.

### ठराव.

पूर्वीच्या गहाणदाराच्या ताब्यांत जर गहाणमाल नसला, आणि तो पुढच्या गहाणदाराच्या ताब्यांत असला, तर पुढच्या गहाणदाराचा हक्क मंजूर होईल.

## स्पेशल अपील नंबर २७६८.

अपिलेंट्.

**परशराम गोपाळ भट**, ह्याचा वारस **महादाजी परशराम भट.**

रिस्पोंडेंट्.

**भिकु फकीर पाटील** त्याचे वारस दामू व बापू.

दावा रुपये २२८१२.

**ठराव.**

जें पीक पुढें येणार तें गहाण लावूनघेणें हिंदुशास्त्राचे विरुद्ध आहे.

**स्पेशल अपील नंबर २८१३.**

अपिलेंट्.

**हरिरुपा.**

रिस्पोंडेंट्

**मनोर हंसराज, नोनजी हंसराज,** व **सामल हंसराज,** ह्यांपैकीं **सामल हंसराज** अज्ञान असल्या मुळें त्याचे पालन करणारे **मनोर हंसराज** व **शेट् द्वारकाभगा.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

एका मनुष्यानें कोडतांत हुकूमनामा करून घेऊन त्यावरून कांहीं हीं मालावर जप्ती बसविली, ती उठविण्याकारतां त्या मालाचे गहाणदारानें फिर्याद केली. पुढें असिस्टन जड्जाकडे अपील झालें, तेव्हां व **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें तेव्हां असें ठरलें, कीं जप्ती बसल्यामुळें गहाणदाराचे हक्कास व्यत्यय येत नाहीं, सबब गहाणदारास जप्ती उठविण्याबद्दल फिर्याद करण्याची जरूर नाहीं. ह्याप्रमाणें ठराव होऊन गहाणदाराचा दावा रद्द झाला.

# स्पेशल अपील नंबर २६२९.

अपिलेंट.

**नारायण रामचंद्र.**

रिस्पोंडेंट.

**लक्ष्मीबाई, अपिलेंटाची बायको.**

दावा रुपये. १,०००.

## ठराव.

कोणी एक ब्राह्मण ख्रिस्ती झाल्यावर त्यानें आपला मुलगा मिळण्याविषयीं बायकोवर फिर्याद केली, त्या फिर्यादींत **अदालतीचा** शास्त्री ह्यानें असा शास्त्रार्थ दिला, कीं जो मनुष्य आपला धर्म सोडून परधर्मांत जातो त्यास महापातक लागून तो जातिभ्रष्ट होतो, परंतु प्रिन्सिपाल सदर अमिनानें फिर्यादीची चौकशी करून अभिप्राय दिला, कीं ह्या मुकदम्यास कोणताही शास्त्रार्थ अथवा कायदा किंवा देशचाल लागू होत नाहीं, आणि बापास मुलाचें पालनपोषण करण्याचा अधिकार सिद्धच आहे, ह्याविषयीं संशय नाहीं. तेव्हां त्यानें ख्रिस्तीधर्म स्विकारल्यामुळें त्याचा तो अधिकार जात नाहीं. पुढें जिल्हेजड्जाकडे अपील झालें, तेव्हां त्यानें असा अभिप्राय दिला, कीं जो ब्राह्मण आपला धर्म सोडतो तो जातिभ्रष्ट होतो; आणि त्यामुळें त्याचे व्यवहारांतील सर्व हक्क बुडतात, असें धर्मशास्त्रावरून स्पष्ट दिसतें. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां असा ठराव झाला, कीं धर्म सोडल्यामुळें अथवा जात सोडल्यामुळें मालमत्ता किंवा हक्क बुडतात अशाविषयीं जें शास्त्र असेल किंवा देशचाल असेल, तो सन १८५० चा आक्ट नंबर २१ ह्यावरून अमलांत आणितां येत नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २५८१.

अपिलँट्

**खंडेराव बल्लाळ ओक.**

रिस्पोंडेंट्

**किसनशिंग बिन छटुरामशिंग.**

दावा रुपये ५२८१५.

**ठराव.**

खत कोडतांत चालण्या सारखें आहे, असा त्याविषयीं बरोबर पुरावा झाल्यावर त्या खताचे शाबितीकरतां हिशेबाचा पुरावा देण्याची गरज नाहीं, कारण त्या खताचा ऐवज न पोहोंचल्याबद्दल पुरावा करण्याचें काम प्रतिवादीचें आहे.

## स्पेशल अपील नंबर २५८२.

अपिलँट्.

**अंताजी सदाशीव जोशी.**

रिस्पोंडेंट्.

**बाळशेट विठूशेट.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

हप्तेबंदीचे खतांतील जे हप्ते मुदतीचे कायद्याचे आंत येतील, त्यांबद्दल फिर्याद चालण्यास त्या कायद्यावरून अटकाव होणार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २६४५.

अपिलँट्.

**केशव लछीराम नाईक.**

रिस्पोंडेंट्.

**गोविंद आपाजी.**

दावा रुपये २९६७५.

**ठराव.**

पेढीवरच्या कारकुनाचे लबाडीमुळें किंवा गफलतीमुळें जें नुकसान होईल त्याबद्दल त्याला धन्यास जाब द्यावा लागेल.

**स्पेशल अपील नंबर २७०८.**

अपिलेंट्.

**माणिकचंद** उर्फ **मनीराम** वल्लद **पागदास**

रिस्पोंडेंट्.

**जेठीराम** वल्लद जयशिंग मयत, त्याचे वारस **बरदीचंद** उर्फ **सखाराम**, **रतनचंद** उर्फ **धोंडी**, आणि **काशीराम**, पैकीं **काशीराम** हा अज्ञान सबब त्याचें पालन करणार **सखाराम** व **धोंडी**.

दावा रुपये ३,०००.

**ठराव.**

एके व्यापारांत एका मनुष्याची पाती होती. ती शाबीत करण्याकरितां त्यानें फिर्याद केली. ती फिर्याद कनिष्ट कोडतांनीं नामंजूर केली, कारण वादीनें अमुक रुपयांची पाती होती असा पुरावा केला नाहीं; परंतु **सदर दिवाणी अदालतींत** असें ठरलें, कीं कनिष्ट कोडतांनीं व्यापारांत वादिची कांहीं पाती होती असें कबूल केलें, व ती पाती किती रुपयांची होती ह्याचा खुलासा प्रतिवादींचे हिशेबावरून झाला असता; परंतु त्यांनीं आपले हिशेब हजर केले नाहींत, सबब पाती किती रुपयांची होती, ह्याविषयीं ठराव करणें तो वादीची प्रतिज्ञेवर जबानी घेऊन करावा.

## स्पेशल अपील नंबर २९१७.

अपिलँट्.

बाईजेनब बिबी, अबदुलगनी ह्याची कन्या.

रिस्पोंडेंट्.

महंमद अलीबेग बाहादूर अलीबेग.

दावा रुपये २००.

### ठराव.

एका मनुष्यानें कांहीं जमीन विकत घेऊन त्या जमिनीचा तो भोगवटा करीत असतां दुसऱ्या मनुष्यानें वारसाचे संबंधानें त्यावर फिर्याद केली. त्या फिर्यादींत असें ठरलें, कीं बेचनपत्र नसलें तरी भोगवटा आणि बेचनाविषयीं तोंडचा पुरावा असला ह्मणजे मुसलमानांचे शास्त्रावरून बेचन घेणाराचा दावा शाबीत आहे.

## स्पेशल अपील नंबर २५९२.

अपिलँट्.

सागरबाई कोम आत्माराम व तिचापुत्र घ्यानीराम बिन आत्माराम.

रिस्पोंडेंट्.

शंभुदास बावा मयत, ह्याचा वारस पुत्र लक्ष्मण दास, अज्ञान पालण करणार त्याची आई रामकुवर.

दावा रुपये ५०.

### ठराव.

एखादी गोष्ट कायद्याप्रमाणें पुरावा होऊन शाबीत झाली असतां ती अदालतींचा शास्त्री ह्याच्या तोंडच्या अभिप्रायावरून रद्द होणार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २७९५.

अपिलँट्.

**भाऊ** आणि **चिमणाजी** बिन **बगोजी** वगैरे.

रिस्पोंडेंट्.

**भाऊ** वल्लद **गुणाजी.**

दावा रुपये ७५.

### ठराव.

पासोडी जमिनीचें उत्पन्न पाटिलकीचे प्राप्तीपैकीं आहे, आणि सन १८४३च्या ११व्या अकूटा अन्वयें त्या उत्पन्नाची वांटणी करण्याचें काम कलेक्टराचें आहे, ह्मणून दिवाणी कोर्टास त्याबद्दल चौकशी करण्याचा अखत्यार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २८६३.

अपिलँट्

**पनीराम** बिन **हिरानंद**, मुनीम निसबत **हिरानंद** व **शालिग्राम.**

रिस्पोंडेंट्.

**मुळ्चंद सुरचंद.**

दावा रुपये ४२८१२८९.

### ठराव.

चालते खात्यावरून पैसा घेणें निघत होता तो व त्याचें व्याज वसूल व्हावें, ह्मणून फिर्याद झाली. तेव्हां स्पेशल अपिलांत

असा ठराव झाला, कीं सन १८३९च्या ३२व्या अक्टा अन्वयें व्याजाबद्दल वादीनें नोटीस दिली नाहीं, व सन १८२७चा कायदा ५ कलम १० रकम २ हीप्रमाणें व्याज घेणें खरें आहे असें देवघेवींतील कोणतेही प्रकारावरून शाबीत झालें नाहीं, सबब सदरहू पैशाबद्दल व्याज मिळणार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २९४७.

अपिलेंट्

**फकिरापा हेबाल निसबत केंचन गवडा बहादूर देसाई.**

रिस्पोंडेंट्

**मुजियानाडोल्लिन**, मयत, ह्याचे वारस पुत्र **सुरिया, सिद्दा, व भैरू.**

दावा रुपये १३६.

### ठराव.

कोणी एका शेतसंदी चाकरानें आपली चाकरी बजाविली नाहीं, ह्मणून त्याकडे चाकरीबद्दल जी जमीन होती तिचें उत्पन्न परत घेण्याकरितां इनामदारानें त्यावर मामलेदाराकडे फिर्याद केली. पुढें अपिलांत कलेक्टरानें ठराव केला, कीं ह्या खटल्याबद्दल फिर्याद माजिस्त्रेटाकडे करावयाला पाहिजे होती, कारण ह्या खटल्याचा निवाडा करण्याचें काम केवळ माजिस्त्रेटाचें आहे. पुढें स्पेशल अपील झालें, तेव्हां **सदर अदालतीनें** ठराव केला, कीं कलेक्टरानें जो निवाडा केला हा गैरशिस्त आहे, कारण हक्काबद्दल तंटा पडला असतां त्याचा निवाडा करण्याचें काम त्याचें नव्हे.

## स्पेशल अपील नंबर २९१८.

अपिलेंट्

**लालाभाना**, मयत. ह्याचा वारस पुत्र **लखन**, व पालन करणार त्याची आई बाई तेजकुवर.

रिस्पोंडेंट्

**मुळजी रुपशिंग**

दावा रुपये २३८४८३.

### ठराव.

**अ** ह्याने आपला हुकूमनामा **क** ह्यावर करून घेतल्यावर कनें आपली मिळकत ड ह्याकडे गहाण लाविली. पुढें त्या मिळकतीवर **अनें** टांच बसविल्यावरून ती खुली व्हावी ह्मणून डनें फिर्याद केली. तेव्हां स्पेशल अपिलांत **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं हुकूमनामा झाला असला, तरी प्रतिवादीस आपले मिळकतीवर टांच बसण्यापूर्वी तिची पाहिजे तशी व्यवस्था करण्याची मोकळीक आहे.

## स्पेशल अपील नंबर २९६५.

अपिलेंट्

**लाले जिलू परभू.**

रिस्पांडेंट्

**गणेश महादेव.**

दावा रुपये २.

### ठराव.

एका जमिनीवर टांच बसली होती, ती दूर होण्याकरितां फिर्याद झाल्यावरून ठराव झाला, कीं जमिनीचा धारा मी देत अस-

तों, सबब ती माझे कबजांत रहावी, ह्मणून जो मनुष्य फिर्याद करील त्याला ज्या रकमेबद्दल टांच बसली असेल तेवढ्या रकमेची फिर्याद करण्याची गरज नाहीं. त्याला जमिनीच्या धाऱ्याचे रकमेची फिर्याद करण्यास अधिकार आहे.

## स्पेशल अपील नंबर २९७२.

अपिलेंट्

**गिरिआपा बिन हनमापा.**

रिस्पोंडेंट्

**नरसापा दिवटी.**

दावा रुपये २५.

**ठराव.**

गहाणखत कोडतांत मंजूर होण्यास गहाणमाल गहाणदाराच्या ताब्यांत असण्याची जरूरी नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २७४५.

अपिलेंट्

**भुकणदास दयाराम.**

रिस्पोंडेंट्

**दामोदर बिजाभाई.**

दावा रुपये २०.

**ठराव.**

मुकद्दम्याची चौकशी पुनः चालली असतां पक्षकार जो साक्षीपुरावा देईल तो कोडतानें घेतला पाहिजे. न घेतल्यास तसें करण्याचें योग्य कारण लिहिलें पाहिजे.

## स्पेशल अपील नंबर २६५२.

अपिलेंट्

**शिद्रापा बिन रेवापा.**

रिस्पोंडेंट्

**पुनाकोटी**, मयत. त्याचा वारस पुत्र **वासुदेव** अज्ञान.
त्याचें पालन करणारा **विजिरंग अया मुद्दलियर.**

दावा रुपये ८००.

**ठराव.**

दोघे बंधु एकत्र रहात असतां त्यांतून एकानें आपले नावानें एकादें घर खरेदी केलें, तर तें घर हिंदुशास्त्राप्रमाणें दोघांचें होतें.

## स्पेशल अपील नंबर २७३३.

अपिलेंट्

**खंडू शिवराम नाईक.**

रिस्पोंडेंट्

**महादेव त्र्यंबक नाईक.**

दावा रुपये २६८६१०.

**ठराव.**

कोणी एकानें आपलें कर्ज वसूल करण्या करितां फिर्याद केल्यावरून प्रतिवादीनें जबाब दिला, कीं फिर्यादींत लिहिलेले कर्जापैकीं मीं कांहीं कर्ज फेडलें आहे, व ती फेड शाबीत करण्यास त्यानें आपले हिशेब पुराव्यास हजर केले. त्यावरून असा ठराव झाला, कीं जी फिर्याद रोख्या वरून होते, ती शाबीत होण्यास वादीचे हिशेब आणण्याची जरूरी नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २८२२.

अपिलेंट्

**शिऊबाई** व तिचा बाप **रामजी वानारशी**

रिस्पोंडेंट्

**रतंजी नथू.**

दावा रुपये ५०

**ठराव.**

कोणी एका मनुष्यानें आपले सुनेवर फिर्याद केली, कीं तिनें दुसरें लग्न केलें, ह्याकरितां पहिल्या नवऱ्याचें पोटचें लहान मूल आहे, तें माझ्या हवाली करावें. ह्यामुकद्दम्यांत असा ठराव झाला, कीं जोंपावेतों बालक आईचे अंगावर पितें, तों पावेतों आईचा हक्क त्या मुलावर असतो, असें हिंदुशास्त्र आहे, तेव्हां सदरहू बाई दुसरें लग्न करून गरोदर झाली आहे, ह्याकरितां हिंदुशास्त्रा प्रमाणें तंटयांतील मुलावर तिचा हक्क नाहीं.

**स्पेशल अपील नंबर २८९१.**

अपिलेंट्

**हरी वल्लद बुधाजी.**

रिस्पोंडेंट्

**पांडू वल्लद बाळोजी व आपा वल्लद त्र्यंबकजी.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

**अ**नें एक घर **क** पाशीं गहाण ठेविलें, व तेंच घर **ब**नें **ड** पाशीं गहाण ठेविलें. नंतर **क**नें त्या घरावर टांच लाविली. ती दूर करण्याबद्दल **ड**नें फिर्याद केली; तेव्हां **ब**ला घर गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं, असें समजून ती फिर्याद जिल्हा जड्जानें रद्द केली. पुढें **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं **अ** हा **ब** वर फिर्याद करून आपली मालकी शाबीत करीतों पर्यंत **ड**चें गहाण खत मंजूर धरावें, कारण कीं गहाण माल त्याचे कबजांत आहे.

## स्पेशल अपील नंबर २८५८.

अपिलेंट्.

**नौरोजी होरमस्जी.**

रिस्पोंडेंट्

**कावस्जी खरशेटजी.**

दावा रुपये २६८.

**ठराव.**

**काव** (समुद्रांतील मासे धरण्याची जागा) हिचा हिस्सा घे- ण्याबद्दल फिर्याद झाली होती. तींत असा ठराव झाला, कीं त्या जाग्याबद्दल जो सरकारास कर द्यावा लागतो, त्याचे अन्वयें फिर्याद झाली, सबब ती फिर्याद कमी दाव्याची आहे, कारण त्या जाग्याची गणना साऱ्याच्या जमिनींत करतां येत नाहीं, सबब तीविषयीं सन १८३०चा १२वा कायदा लागू पडत नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २६९१.

अपिलेंट.

**जिवाजी गंगाधर.**

रिस्पोंडेंट्.

**शामराव महादेव.**

दावा रुपये १,२१९.

**ठराव.**

पाटिलाचे घराण्यांतील कोणी पुरुष पाटिलकीचे वतनाचे हि- श्शावर दावा करिल, तर त्याचे हक्काबद्दल इनसाफ करण्याचा अख्त्यार दिवाणी कोर्टास आहे; परंतु कलेक्टर किंवा दुसरा कोणी वरिष्ठ अम्मलदार ह्यास सन १८४३चा अक्ट नंबर ११ कलम १३ ह्यांतिल ठरावा अन्वयें त्या वतनाची जी वांटणी कर-

णें योग्य दिसेल ती करण्यास सदरहू इनसाफावरून अटकाव होणार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २६९९.

अपिलेंट्.

**रामा खानसुवा.**

रिस्पोंडेंट्.

**जिबा भिकचुरी.**

दावा रुपये २५.

**ठराव.**

कोणी मनुष्य आपले भाऊबंदासहवर्तमान एकत्र रहात असतां मयत झाला, तर त्याच्या बायकोस त्याचे इतर वारसांचे अनुमतावांचून त्याची स्थावर मिळकत विकण्याचा अधिकार नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २८२८.

अपिलेंट्.

**चिंतो सखाराम सप्तऋषी.**

रिस्पोंडेंट्.

**बाळकृष्ण गोपाळ भलवणकर.**

दावा रुपये ३४६८६६.

**ठराव.**

कर्जरोख्यावरून फिर्याद झाली होती. ती तारीख २५ माहे ज्यून सन १८३२ इसवीचे समजूतपत्रावरून मुद्दतीबाहेर गेली, ह्मणून जिल्हा जड्जानें रद्द केली. मग **सदर दिवाणी अदालतींत** असा ठराव झाला, कीं १२ वर्षांची मुद्दत गणण्यांत जो शक वादीचे दाव्यास अनकूल पडत होता, तो त्याला घेऊं द्यावयाचा होता.

## स्पेशल अपील नंबर २७१३.

अपिलेंट्.

**लक्ष्मण उद्धव कुळकर्णी.**

रिस्पोंडेंट्.

**गणू वल्लद हरजी पाटील.**

दावा रुपये १५८१२८९.

### ठराव.

कुळकर्णीपणाचा हक्क मिळण्याविषयीं फिर्याद झाली होती; परंतु सदरहू हक्काबद्दल मला अमक रुपये घेणें आहेत असा वादीच्यानें पुरावा झाला नाहीं. तेव्हां त्या फिर्यादींत असा ठराव झाला, कीं आपल्या दाव्याचे शाबितीकरितां कलेक्टराची साक्ष व त्याचे दप्तरचा दाखला मिळण्याविषयीं वादीस कोर्टाची मद्दत मागण्याचा हक्क आहे.

## स्पेशल अपील नंबर २५४२.

अपिलेंट्.

**महादाजी बिन विठोजी चव्हाण.**

रिस्पोंडेट्.

**रूपाजी बिन विठोजी**, आज्ञान. पालन करणार त्याची **आई**

दावा रुपये ७८८८१०

### ठराव.

कालीकडील अमलदारांनीं ज्या मनुष्यास गतकुळी शेतवहिवाटीस दिलें त्याव्यतिरिक्त दुसरे मनुष्याचा त्या शेतावर हक्क आहे, व त्याकडून तें शेत आपले ताब्यांत घेण्याविषयीं

दुसऱ्यास अखत्यारी आहे, असा दोन्ही कनिष्ट कोडतांनीं ठराव केला तो गैरशिस्त केला, असें सदर दिवाणी अदालतीनें ठरविलें.

## स्पेशल अपील नंबर २८७०.

अपिलेंट्

**विठू दयाळजी गुजर.**

रिस्पोंडेंट्

**महादाजी केशव दामले.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

सदर अदालतीनें ठराव केला, कीं एका मुकद्दम्यांत साक्षीदारांनीं ज्या साक्षी दिल्या असतील त्या साक्षी दुसरे मुकद्दम्यांत वादी प्रतिवादी निराळे असल्यास पुराव्यास घेऊं नयेत. त्या साक्षीदारांच्या साक्षी पुन्हा घ्याव्या, व गहाणमालावरील टांच उठविण्याकरितां फिर्याद करणें ती जितके रुपयांबद्दल टांच लाविली असेल तितक्याच रुपयांची करण्यास चिंता नाहीं.

## स्पेशल अपील नंबर २५७०.

अपिलेंट्.

**लाला त्रिकम.**

रिस्पोंडेंट्.

**भिका ऊर्फ चबेला केशव, वलजी केशव व पितांबर केशव.**

दावा रुपये १६.

**ठराव.**

**सदर अदालतीनें** असें ठरविलें, कीं भाऊ एकत्र रहात अस-

तां वडील भावास स्वसंपादित माल आपल्या कनिष्ठ बंधूंचे अनुमताशिवाय विकण्यास देशचालीवरून अधिकार आहे, व सन १८२७चा कायदा ४ कलम २६ ह्याप्रमाणें देशचालीला प्रतिवादीचे शास्त्रापेक्षां प्राधान्य आहे.

## स्पेशल अपील नंबर २९३८.

अपिलेंट्.

**गोपाळ दीक्षित** बिन **भास्कर दीक्षित**, मयत,
त्याचा वारस पुत्र **दामोदर दीक्षित.**

रिस्पोंडेंट्.

**व्यंकापा नाईक** ह्याचे नांवचें दुकान वहिवाट
करणार **वासुदेव नारायण** धारवाडकर.

दावा रुपये ९९१८६६४.

**ठराव.**

**अ**नें कांहीं माल ब जवळ गहाण ठेवला, आणि तो **ब**चे ताब्यांत होता. **क**नें **अ**वर कर्जा बद्दल हुकूमनामा करून घेऊन त्या मालावर जप्ती बसविली; परंतु त्या मालावर आपल्या हुकूमनाम्याचा उलगडा करून घेण्याविषयीं आपणास हक्क आहे असा पुरावा केला नाहीं. तेव्हां ह्या खटल्यांत **सदर अदालतीनें** असा ठराव केला, कीं गहाणदार जो ब ह्याचा हक्क **क**पेक्षां सदरहू मालावर अधिक आहे.

## स्पेशल अपील नंबर २८६४.

अपिलेंट्.

**योगीराज** बिन **जिवाजी** गोरके.

रिस्पोंडेंट्.

**केशव सिद्धेश्वर शास्त्री.**

दावा रुपये २९६११६६.

**ठराव.**

जितक्या रुपयांबद्दल फिर्याद झाली असेल तितक्या रुपयांहून जास्त रुपये देण्याविषयीं ठराव झाला असतां तो ठराव अपील करण्यास योग्य कारण आहे.

## स्पेशल अपील नंबर २८८७.

अपिलेंट्.

**शिवराम पंत बडबडे.**

रिस्पोंडेंट्.

**योगानंदशेट, व दुसरा एक मनुष्य.**

दावा रुपये २९२८२८५.

**ठराव.**

फिर्याद खात्यावरून असून खात्यावर प्रतिवादीची सही असेल, व हस्तेबंदीनें रुपयांची फेड करीन असें त्याचें वचन असेल, तर त्या फिर्यादीस सन १८२७चा कायदा १८ कलम १० ह्यांत लिहिलेला ठराव लागू आहे, ह्मणजे फिर्याद करण्याकरितां खात्यास स्टाप लाविला पाहिजे.

## स्पेशल अपील नंबर २९०५.

अपिलेंट्.

**मुरगीआपा मेन्सिकी.**

रिस्पोंडेंट्.

**गिरीआपा तेली.**

दावा रुपये ३०.

**ठराव.**

फिर्यादीचे वेळेस गहाणदाराचे कबजांत गहाणमाल नसला

तरी फिर्याद होण्यापूर्वी बारा वर्षांचे आंत कधीं सदरहू माल कबजांत असल्यास गहाणखताला बारावर्षे झालीं असलीं तरी तें कायद्या बाहेर गेलें, असें समजूं नये.

## स्पेशल अपील नंबर २९०६.

अपिलेंट्.

**सिद्दा बिन दादसिद्दा बारकी.**

रिस्पोंडेंट्.

**सनासिद्दापा.**

दावा रुपये ६६८.

**ठराव.**

**सदर अदालतीनें** ह्या मुकद्दम्यांत असें ठरविलें, कीं जर कसबीण निक्का लावील तर तो तिचे लग्नाप्रमाणें समजावा, व कसबिणींत वारशाबद्दल ज्या चाली असतील त्या निक्का लाविलेल्या कसबिणीचे संततीस लागू नाहींत.

## स्पेशल अपील नंबर २९३९.

अपिलेंट्.

**मोरो रघुनाथ काळे.**

रिस्पोंडेंट्.

**रावजी बाळाजी,** व त्याचे वहिवाटदार **साळू बाई,**

**अंताजी व बाबजी.**

दावा रुपये २३१६११.

**ठराव.**

एक मनुष्य ग्वालेरीस होता, त्याकडून कर्ज वसूल करण्या-

करितां त्यावर व त्याचे वहिवाटदार हजर होते त्यांवर वादीनें नगरास फिर्याद केली. ही फिर्याद गैरशिस्त आहे, ह्मणून कनिष्ट कोडतांनीं वादीचा दावा रद्द केला; परंतु सदर अदालतीनें असा ठराव केला, कीं मुख्य प्रतिवादी अव्वल कोडताचे हुकमती बाहेर होता तरी त्यावर फिर्याद घेण्यास अव्वल कोडतास अधिकार होता.

## स्पेशल अपील नंबर २५५०.

अपिलेंट्.

**भगवंत केशव.**

रिस्पोंडेंट्.

**गोविंद बाजीराव.**

दावा रुपये. ९६२.

## ठराव.

जी तकरार अपिलेंटानें केली नाहीं त्या तकरारीवरून अपिलांत पहिला हुकूमनामा रद्द करूं नये.

## स्पेशल अपील नंबर २४५९.

अपिलेंट्.

**बाळमित्र पालेकर**, त्याचे वारस **गोपाळ, हरी, रामा, आणि गोपिका.**

रिस्पोंडेंट्

येसू बिन **गनमात्र** व **चिमा** बिन **गनमात्र पालेकर.**

दावा रुपये ८२५.

## ठराव.

ह्या मुकद्दम्यांत असा ठराव झाला, कीं मुदलापेक्षां ज्यास्त

व्याज देऊं नये असें जरी हिंदुशास्त्रांत आहे, तरी व्याज देण्याचा जो करार रिणकोनाम ह्यानें दस्त ऐवजांत लिहून दिला असेल त्याप्रमाणें कोडतांनीं व्याज देववावें.

## स्पेशल अपील नंबर २५८३

अपिलेंट्.

**जगजीवन शिवलाल गुजराथी.**

रिस्पोंडेंट्

**मोरो व शामराव रामजी.**

दावा रुपये ३००.

**ठराव.**

किती काळ गेला तरी गहाणदाराकडून गहाण माल घेण्याविषयीं मालकास हक्क आहे.



## स्पेशल अपील नंबर २३३६.

अपिलेंट्.

**नसरवानूजी पेस्तमजी.**

रिस्पोंडेंट्.

**माणिकजी कावसजी,** ह्याच्या पेढीचे वारस **फ्रामजी माणिकजी, रतंजी बहिरामजी, नसरवानूजी बहिरामजी व मंजीभाई फरदुंजी.**

## सदर अदालतीचा ठराव.

**इ**सवी सन १८१७त्यांतील रोख्यावरून फिर्याद झाली होती, तेव्हां दोन्ही कनिष्ट कोडतांत दावा मंजूर झाला. परंतु **सदर दिवाणी अदालतीनें** पुऱ्या किमतीच्या छापील कागदावर रोखा नाहीं ह्याकारणावरून दावा रद्द केला, आणि पुऱ्या किमतीचा स्टाप रोख्यास लावून पुनः फिर्याद करण्याची सवड मालकास ठेविली. पुढें त्याप्रमाणें रोख्याचे मालकानें केलें; परंतु सन १८१५च्या १४व्या कायद्याप्रमाणें तो रोखा त्याचे मितीपासून ६० दीवसांत छापवावयास पाहिजे होता, तो छापविला नाहीं, ह्याकारणावरून कनिष्ट कोडतांनीं दावा रद्द केला. मग तो खटला पुनः **सदर दिवाणी अदालती**कडे आल्यावर असा निवाडा झाला, कीं सन १८२७च्या १८व्या कायद्याच्या १३व्या कलमाप्रमाणें करण्यास ह्मणजे पुऱ्या किमतीचा स्टाप लावून फिर्याद करण्यास रोख्याचे मालकास कांहीं हरकत नाहीं.

गहाण रोख्यावरून मुद्दलापैकीं कांहीं बाकी निघत होती, ती व व्याजहीं घेण्याकरितां अपिलेंट **नसरवानजी पेस्तमजी** ह्यानें **सुरतेचा** सदर अमीन ह्याचे कोडतांत अव्वल फिर्याद केली. ही फिर्याद ज्या देवघेवीबद्दल झाली ती देवघेव इसवी सन १८१७त्नांतली होती. मागे ह्या देवघेवीबद्दल सन १८३०सांत फिर्याद झाली होती, त्यावेळेस चीफ कमिशनर ह्यानें **नसरवानजी पेस्तमजी** ह्याचे वतीनें हुकूमनामा केला आणि तो हुकूमनामा जिल्हाजड्जानें दुरुस्त केला. नंतर **सदर दिवाणी अदालतींत** अपील झाल्यावर ठराव झाला, कीं पुऱ्या किमतीच्या छापील कागदावर गहाण रोखा नाहीं, सबब दावा रद्द असे, परंतु सन १८२७च्या १८व्या कायद्याच्या १३व्या कलमांतील १ल्या रकमेप्रमाणें गहाण रोख्यास पुऱ्या किमतीचा स्टाप लावून पुनः फिर्याद करण्यास **सदर दिवाणी अदालतीनें पेस्तमजी नसरवानजी** ह्यास सवड ठेविली. आतां, **रिस्पोंडेंट** ह्यानें ऐवज दिला नाहीं, सबब रोख्यास पुऱ्या किमतीचा स्टाप लावून **अपिलेंटानें** ही फिर्याद केली.

ता० २२ दिसेंबर सन १८४८.

प्रतिवादींपैकीं फक्त **मंजीभाई फरदुनजी** ह्यानें जबाब दिला. तो असा, कीं रोख्याची मिती पहातां रोख्या वरून ही फिर्याद चालावयाची नाहीं, व रोख्यांत लिहिलेला माल वादीनें **राणकुवर** ह्याचा ह्मणून विकला त्यास हा माल वादीपाशीं गहाण असता तर त्यानें तो विकला नसता. पुढें **मंजीभाईनें** पुरवणी जबाब दिला, कीं वादीस आपले एकट्याचे नांवे फिर्याद करण्यास अख्त्यार नाहीं. कारण ज्या मनुष्याचा वारसपुत्र ह्मणून तो ही फिर्याद करितो, त्या मनुष्यास ह्याशिवाय आणखी पुत्र आहेत.

सदर अमीन ह्यानें असा हुकूमनामा केला, कीं सन १८२७-च्या १८व्या कायद्याचे १०व्या कलमाच्या १ल्या रकमेवरील समजूतपत्रांत असें आहे, कीं जोंपावेतों सन १८१५ह्यांतील १४वा कायदा जारी होता तोंपावेतों जे दस्तऐवज झाले असतील ते कोडतांत चालण्याकरितां त्यावेळेचे कायद्याप्रमाणें त्यांच्या मितीपासून ६० दिवसांत छापविलेले पाहिजेत आणि वादीचा रोखा तसा नाहीं, सबब त्याचा दावा रद्द असे.

नंतर अपिलेंट् ह्यानें सुरतेच्या जिल्हाजड्जाचे कोडतांत अपील केलें. तेव्हां जड्जानें कनिष्ट कोडताचा हुकूमनामा कायम करून निवाडा केला. तो येणें प्रमाणें.

ज्या कारणावरून हल्लींची फिर्याद आहे, त्याच कारणावरून अपिलेंट् ह्यानें मागें फिर्याद केली होती, तिचा फेसला चीफ कमिशनर ह्यानें अपिलेंट् ह्याचे वतीनें केला. पुढें जड्जानें कनिष्ट कोडताचा हुकूमनामा दुरुस्त करून अपिलेंट् ह्याचे वतीनें हुकूमनामा केला. रिस्पांडेंट् ह्यानें सदर दिवाणी अदालतीस अपील केलें, तेव्हां सन १८१५चे कायद्यांत लिहिलेल्या किमतीचे छापिल कागदावर रोखा नाहीं, ह्या कारणावरून सदर अदालतीनें अपिलेंट् ह्याचा दावा रद्द केला, आणि आपल्या निवाड्यांत असें लिहिलें आहे, कीं सन १८२७च्या १८व्या कायद्याच्या १३व्या कलमाच्या १ल्या रकमेप्रमाणें अपिलेंट् ह्यानें तजविज करावी. त्यावरून त्यानें रोख्यास पुरा स्टाप लवून पुनः फिर्याद केली.

सदर अमीन ह्यानें निवाडा केला, कीं ह्या मुकद्दम्याचा निकाल आह्मी अमुक रितीनें करावा, असें वरिष्ट कोडताचे मागील कज्यांतील हुकूमनाम्यावरून होत नाहीं, आणि त्या हुकूमनाम्यांत

**सद्र दिवाणी अदालतीनें** एका विशेष कायद्याचा उल्लेख केला आहे, इतक्यावरून त्या कायद्याप्रमाणें **अपिलेंट्** ह्यानें वागावेंच असा त्याला हुकूम झाला असें होत नाहीं. कायद्याचा उल्लेख **अपिलेंट्** ह्यास केवळ सुचनार्थ आहे. आतां त्या सुचनेप्रमाणें केलें असतां आपला दावा शाबीत होईल, असें **अपिलेंट्** ह्यास वाटेल तर त्यानें त्याप्रमाणें करावें; परंतु दावा शाबीत न झाल्यास त्याबद्दल नुकसान त्याला सोसली पाहिजे. सन १८२७च्या १८व्या कायद्याचे १०व्या कलमांतील १ल्या रकमेवरील समजूतपत्रांत असें आहे, कीं जोंपावेतों सन १८१५चा १४वा कायदा जारी होता तोंपावेतों जे दस्तऐवज झाले असतील ते कोर्टांत चालण्याकरितां त्या वेळच्या कायद्याप्रमाणें त्यांचे मितीपासून ६० दिवसांत छापविलेले पाहिजेत. ह्या मुकद्दम्यांत **अपिलेंट्** ह्यानें त्याप्रमाणें केलें नाहीं; सबब त्याचा दावा रद्द असे.

सदरहूबद्दल **अपिलेंट** तकरार करितो, कीं सदरअमीन ह्यानें ज्या समजूतपत्राचा उल्लेख केलाआहे तें साधे कागदावर लिहिलेले दस्तऐवजांस लागूआहे, कमी किमतीचें छापील कागदावर लिहिलेल्या दस्तऐवजांस लागू नाहीं, सबब तें ह्या मोकदम्यास बिलकुल लागू नाहीं; परंतु ही तकरार जमेस धरण्यासारखी नाहीं, हें साफ आहे. कारण कायद्याचे एकेभागाचा अर्थ दुसरे भागाचे अर्थास विरुद्ध न होईल असा केला पाहिजे, व सदरीं **अपिलेंट्** ह्यानें जो भेद दाखविला आहे, त्याबद्दल सन १८१५चे कायद्यांत कांहीं मजकूर नाहीं, सबब तो भेद मंजूर धरतां येत नाहीं. **अपिलेंट्** आणखी तकरार करितो, कीं माझे फिर्यादीची चौकशीच झाली नाहीं; मला **सदर दिवाणी आदालतीचा** हुकूम झाला आहे, कीं रो-

ल्यास पुऱ्या किमतीचा स्टाप लावून पुनः फिर्याद करावी, ह्याकरितां माझ्या खटल्याची चौकशी झाली पाहिजे; परंतु आमच्या नजरेस येतें, कीं ह्या तकरारीबद्दल सदर अमीन ह्याचा अभिप्राय बरोबर आहे. **सदर अदालतीचे** हुकूमनाम्यांत **अपिलेंटास** केवळ सुचना दिली आहे. ह्या मुकदम्यांत रोख्याशिवाय दुसरी मजबुती असती तर तिचा विचार करून **अपिलेंट्** ह्याचे वतीनें निवाडा करण्यास कनिष्ट कोडतास काय हरकत होती; परंतु त्या कोडतानें तसें केलें नाहीं. ह्यावरून मुकदम्यास रोख्याशिवाय दुसरी मजबुती नाहीं असें अनुमान होतें. ज्या दोषामुळें मागें आपला दावा रद्द झाला, तो दोष दूरकरण्यासारखा असल्यास दूरकरण्याचें मुख्य काम **अपिलेंटाचें** होतें. आतां सदरहू दोष दूरकरण्यास कायदा अनुकूल नाहीं, हें त्याचें दुरदैव; सबब त्याचे मुकदम्याची जास्ती चौकशी करतां येत नाहीं; कनिष्ट कोडताचा निवाडा कायम करून खर्च **अपिलेंट्** ह्यावर घातला असे.

नंतर स्पेशल अपील घ्यावें ह्मणून **अपिलेंट्** ह्यानें अर्ज केला, तेव्हां तारिख १० माहे आगष्ट सन १८३३ रोजीं **सदर दिवाणी अदालतीनें** जो निवाडा केला त्यावरून ज्या रोख्यावरून ही फिर्याद झाली आहे तो छाप लागण्या सारखा आहे, ह्यास्तव सन १८२७सांतील १८व्या कायद्याच्या १०व्या कलमांतील १ रकम व तीवरील समजूतपत्र ह्यांवरून सदरहू रोखा कायद्याप्रमाणें छापवितां येत नाहीं, ह्या कारणावरून जड्जानें **अपिलेंट्** ह्याचा दावा रद्द केला, हें गैरशिस्त केलें. ह्याकारणावरून अर्ज मंजूर झाला.

ग्रेगर ग्रांट साहेब.

सदरहू मुकद्दमा प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जासमोर आला, तेव्हां त्यानें अभिप्राय दिला, कीं जिल्हा जड्जानें जें समजूत पत्र लिहिलें आहे, तें साधे कागदावरील खतांस लागू आहे, कायद्यांत सांगितलेल्या किमतीहून कमी किमतीचे छापील कागदावर लिहिलेल्या दस्तऐवजांस लागू नाहीं, ह्याकरितां आमचें मत अपील मंजूर करणाऱ्या जड्जाचे मताप्रमाणेंच आहे, सबब मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें निवाडा केला, कीं सन १८२७सांतील १८व्या कायद्याच्या १०व्या कलमावरील तारिख २३ माहे जानेवारी सन १८२८ इसवीचें समजूत पत्र जिल्हाजड्जानें ह्या मोकद्दम्यांत लागू केलें ही त्याची चूक आहे, कारण " कायद्याप्रमाणें छापणें " ह्या शब्दांचा अर्थ काय ह्याबद्दल तें समजूतपत्र आहे. सन १८१५ यांतील १४व्या कायद्याच्या २३साव्या कलमांतील ठरावाप्रमाणें तंटयांतील रोखा छापलेला नव्हता, सबब त्या अवस्थेंत तो रोखा नवीन कायद्याप्रमाणें मंजूर धरण्यासारखा नव्हता. सन १८२७सांतील १८व्या कायद्याच्या १३व्या कलमांतील ठरावाप्रमाणें तंटयांतील रोख्याचे मालकास तजवीज करण्यास कांहीं हरकत नाहीं, कारण तो ठराव साधारण आहे, ह्यास्तव ह्या रोख्याचे मालकासारख्यासही लागू आहे, ह्मणून जिल्हाजड्जानें जी तकरार काढली ती बरोबर नाहीं, आणि ह्याकरितां त्याचा हुकूमनामा रद्द करून मुकद्दमा चौकशी करून फैसला करण्याकरितां परत पाठविला आहे.—

बेल साहेब

बेलसाहेब, सिमसन साहेब व लिजिट्‌ साहेब.

## स्पेशल अपील नंबर २३७१.

अपिलँट्.

**बाई अमृत** अयाळ **केशवजी शंकरजी** व **देवशंकर नंदलाल.**

रिस्पोंडेंट्.

**बाईकुसळ** अयाळ **शंकरजी गोविंदराम,**
**देसाई भाईबा** आणि **दार्जीभाईबा.**

**ठराव.**

एका हिंदूचे विधवा स्त्रियेनें कुटुंबाच्या रहाण्याचे घरापैकीं कांहीं भाग निकल्यावरून तिच्या सुनेनें फिर्याद केली, कीं माझे मयत नवऱ्याचे संबंधानें सदरहू घराची मी वारस आहे; सबब घराची विकरी रद्द करावी. नंतर सासूनें जबाब दिला, कीं माझा पुत्र ( ह्या माझ्या सुनेचा नवरा ) हा आपला बाप जीवंत असतां मरण पावला, ह्या कारणानें सुनेचा हक्क कांहीं राहिला नाहीं. तेव्हां मुनसफानें ठराव केला, कीं पुत्राचे पाठीमागें त्याच्या बायकोस आपल्या सासऱ्याची जिनगी मिळण्याचा हक्क आहे. जिल्हाजडजानें ठरविलें, कीं कोणी हिंदू मेला आणि त्यास जर पुत्र नसला तर त्याची जिनगी त्याचे स्त्रीस मिळते. मग **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं तंट्यांतील घर मृतपुत्राचे स्त्रीचे संमतावांचून, सासूनें विकलें, सबब ती विकरी कोडतास मंजूर नाहीं.

**अपिलँट्** ( मुळचे वादी ) ह्यांनीं **सुरत** जिल्ह्यांत **बोरसदचे** मुनसफाचे कोडतांत दोनशें *रुपयांची फिर्याद केली. त्यांनीं अर्जीत असें लिहिलें, कीं मयत **शंकरजी गोविंदराम** ह्याचें एक घर आहे.

ता० १ फेब्रुवारी सन १८४९.

*घराचा भाग दोनसें रुपयांस विकला होता.

त्या घरावर आमचा वंशपरंपरा संबंधानें हक्क असतां **रिस्पोंडेंट्** **बाई कुसळ** हिनें त्या घराचा कांहीं भाग दुसरे दोघे **रिस्पोंडेंट्** ह्यांस दोनशें रुपयांस विकला; सबब त्याबद्दलचें खरेदीपत्र **रद्द** करावें.

**रिस्पोंडेंट्** ह्यांनीं जबाब दिला, कीं **शंकरजी गोविंदराम** जीवंत असतां त्याचा पुत्र मरण पावला, सबब त्या पुत्राची स्त्री **बाई अमृत** ( **अपिलेंट्** ) हिचा आपले सासऱ्याचे जिनगीवरील सर्व हक्क बुडाला, व तिनें वांटा घेऊन फारखतही लिहून दिली आहे.

मुनसफ ह्यानें **अपिलेंट् बाई अमृत** हिच्या वतीनें हुकूमनामा केला. त्यानें असें लिहिलें, कीं **बाई अमृत** हिनें आपला सासरा **शंकरजी गोविंदराम** ह्याचे उत्तर कार्यास पैसा खर्च केला, असा पुरावा केला आहे, व घराचे विकरीविषयीं अंदेशा घेण्या सारख्या गोष्टी आहेत; आणखी पक्षकारांचे जातीचे चालीप्रमाणें व हिंदुशास्त्राप्रमाणें विधवा सुनेला आपल्या सासऱ्याची जिनगी मिळण्याविषयीं हक्क आहे. सदरहू कारणांवरून खरेदीपत्र रद्द असे; परंतु **बाई कुसळ** हिला तहांहयात घरांत राहूं द्यावें, आणि ती मेल्यावर सदरहू घर विकून जो पैसा येईल त्यांतून कांहीं तिचें उत्तर कार्यास खर्च करावा.

सदरहू ठरावास राजी न होऊन **बाई कुसळ** व दुसरे **रिस्पोंडेंट्** ह्यांनीं सुरतेचे जिल्हाजड्जाचे कोडतांत अपील केलें. मग जड्जानें आपले अदालतीचा शास्त्री ह्यास सवाल करून जवाब घेतला. त्यांतील अभिप्राय असा होता, कीं नवऱ्याचे संबंधानें **बाई अमृत** दावा करिते; परंतु तो आपले बापाचे पूर्वी मेला, सबब हिंदुशास्त्राप्रमाणें तंटचांतील घर मिळण्या विषयीं **बाई अमृत**

हिचा हक्क मजबूत नाहीं. मग बाई अमृत हिनें शास्त्र व दुसऱ्या जातीच्या चाली ह्यांहून माझ्या जातीची चाल भिन्न आहे, असें शाबीत करण्याकरितां कांहीं साक्षिदार दिले; परंतु जड्जानें असें ठरविलें, कीं हे साक्षिदार फार थोडे आहेत, ह्याकरितां सदरहू गोष्ट सिद्ध करण्याविषयीं ह्यांच्या ह्मणण्यापेक्षां बलवत्तर प्रमाण पाहिजे. ह्यासर्व कारणांवरून त्यानें मुनसफाचा हुकूमनामा रद्द करून पुनः चौकशी करण्याकरितां मुकद्दमा परत पाठविला. मग मुनसफानें अणखी चौकशी केली; परंतु त्यानें आपल्या पूर्वीच्याच निवाड्यांत जीं पूर्वीं कारणें लाविलीं होतीं, त्यांवरूनच तो निवाडा कायम ठेवला.

नंतर बाई कुसळ व दुसरे रिस्पांडेंट् ह्यांनीं जिल्हाजड्जाकडे पुनः अपील केलें, तेव्हां जड्जानें मुकद्दम्याची चौकशी करून असा ठराव केला, कीं वारसपणाचे हक्काविषयीं जो हिंदुशास्त्राचा सिद्धांत आहे, तो सदर दिवाणी आदालतीनें आपल्या पुष्कळ निवाड्यांत मान्य केला आहे. ह्याकरितां त्यापुढें वारसपणाचे हक्काविषयींच्या जातींतील चालीस प्राधान्य देतां येत नाहीं. तो सिद्धांत असा आहे, कीं एखादा मनुष्य मेला आणि त्यास पुत्र नसला, तर त्याची जिनगी त्याचे बायकोस मिळते, त्याच्या पूर्वीं मेलेल्या पुत्राचे बायकोस मिळत नाहीं, कारण बाप जीवंत असतां पुत्र मेला, तर पुत्राच्या जिनगीचा वांटा बापाकडे जातो, आणि बाई अमृत व तिचा जांवई ह्यांनीं जे थोडे साक्षीदार दिले आहेत त्यांच्या ह्मणण्यावर सदरहू शास्त्रसिद्धांत सोडून जातीची चाल कबूल करवत नाहीं. कारण ते साक्षीदार चालीविषयीं मजकूर सांगतात, परंतु तीबद्दल ते दाखला दाखवीत नाहींत; ह्यासर्व कारणांवरून खरेदीपत्र मंजूर करवत नाहीं, ह्म-

णून मुनसफ ह्यानें जो हुकूमनामा केला आहे, तो रद्द असे. आणखी जड्जानें असें लिहिलें, कीं ज्या नवऱ्याच्या संबंधानें **बाई कुसळ** दावा सांगते, त्याचे पोटची तीस एक कन्या आहे, असा पुरावा झाला; तेव्हां त्या कन्येचे संमतावांचून सदरहू जिनगी विकण्यास **बाई कुसळ** हीस अखत्यार आहे, किंवा नाहीं, ह्याबद्दल आह्मी कांहीं ठराव करीत नाहीं, ह्याकरितां **बाई कुसळ** हिनें आपल्या मयत नवऱ्याचे घरापैकीं कांहीं भाग विकला, तो विकण्यास तिला अखत्यार नाहीं, अशी तिची कन्या व कन्येचा पुत्र हीं फिर्याद करूं लागल्यास त्यांस ह्याहुकूमनाम्यावरून हरकत होणार नाहीं.

बेल साहेब

**आपिलेंट् बाई अमृत** व तिचा जांवई ह्यांनीं स्पेशल अपिल मंजूर होण्याकरितां **सदर दिवाणी अदालतींत** अर्ज केला. त्यांत **बाई अमृत** हिनें असें लिहिलें, कीं माझे सासऱ्याचें उत्तरकार्य मीं केलें, आणि माझी नणंद मयत आहे; परंतु माझी कन्या जिवंत आहे. सदरहू अर्ज ह्या कारणावरून मंजूर झाला, कीं जिल्हाजड्जाचा हुकूमनामा हिंदुशास्त्रास विरुद्ध आहे. त्या शास्त्रांत असें आहे, कीं राहाण्यास जागा व अन्नवस्त्र इतक्या पुरता सासऱ्याचे जिनगीवर जी सून विधवा असेल तिचा हक्क असतो, असें असतां ह्या मुकद्दम्यांतील घर **बाई अमृत** हिचे संमतावांचून विकलें आहे.

लिजिट् साहेब.

मुकद्दमा प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जाकडे आला, तेव्हां त्यानें **सदर दिवाणी अदालतींतील** शास्त्री ह्यास प्रश्न केला, कीं **अ** ह्मणून एक ब्राह्मण होता, तो मयत झाला. त्याची बायको **ब** आहे, व **अ** जीवंत असतां त्याचा पुत्र **ड** मरण पावला. त्याची बायको **स** आहे, व

स हिला त्या इचे पोटची इ कन्या आहे. ब हिनें घराण्याच्या जिनगीपैकीं कांहीं जिनगी विकली, सबब स व इ तकरार करितात, कीं सदरहू जिनगी विकली ती आमचें संमत घेऊन विकावयाची होती. त्यास ह्या उभयतांचे संमताची जरूरी आहे किंवा कसें? शास्त्री ह्याचे उत्तरांतील हाशील असें, कीं विधवा सासूनें घराण्याची कांहीं जिनगी विकली तरी ती विकरी कोडतांस मंजूर होण्याकरितां तिला आपल्या विधवा सुनेचें संमत घेतलें पाहिजे; परंतु सुनेचे कन्येचें संमत घेण्याची गरज नाहीं. ह्या शास्त्रार्थावरून लिजिट् साहेबांनीं असा अभिप्राय दिला, कीं जिल्हा कोडताचा शास्त्री ह्यानें जो शास्त्रार्थ दिला आहे, त्याहून हा भिन्न आहे, ह्याकरितां आमचे नजरेस येतें, कीं पक्षकार ह्याचे जातीचे चालीस हिंदुशास्त्र प्रतिकूल नाहीं, उलटें अनुकूलच आहे, आणि बाई अमृत हिच्याबद्दल मुनसफानें अव्वल कज्जांत जो ठराव केला आहे, तो बरोबर आहे; परंतु तिची कन्या शिवकल हिच्या संमताची जरूरी आहे, असें जें मुनसफ ह्यानें ठरविलें हें बरोबर नाहीं. ह्या कलमाबद्दल जिल्हाजड्जानें बरोबर ठराव केला आहे. ह्या वरील कारणांवरून जिल्हाजड्जाचा बाई अमृत ही विषयींचा ठराव आमच्यानें बाहल करवत नाहीं; सबब मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें ठरविलें, कीं रिस्पोंडेंट् हिनें अपिलेंट् बाई अमृत हिचे संमतावांचून जिनगी विकली, सबब ती विकरी हिंदूंचें शास्त्र व चाल ह्यांप्रमाणें ह्मटलें ह्मणजे कोडतांस मंजूर होणार नाहीं. ह्यास्तव जिल्हाजड्जाचा निवाडा रद्द करून जिनगी विकावयास अपिलेंट् बाई अमृत

बेलसाहेब. वार्डिन साहेब, व लिजिट् साहेब.

हिचे संमताची जरूरी आहे, इवक्या अंशीं मुनसफाचा हुकुमनामा कायम केला असे.

## स्पेशल अपील नंबर २३८५.

अपिलेंट्

**चिमणलाल हरी वल्लभ.**

रिस्पोंडेंट्

**हरी वल्लभ लक्ष्मीदास व भगू लक्ष्मीदास.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

कांहीं जमिनीचे उत्पन्नाची जप्ती झाली होती, ती जप्ती उठविण्याकरितां जमीनदारानें फिर्याद केली. तेव्हां मुनसफानें वादीचे वतीनें हुकूमनामा केला. अपीलांत जिल्हाजड्जानें ठरविलें, कीं इतर सावकारांचा हक्क सोडून जमीनदाराचाच हक्क सदरहू उत्पन्नावर अगोदर पुरा करावा असें नाहीं. नंतर मुकद्दमा **सदर दिवाणी अदालतींत** गेल्यावर तेथें ठराव झाला, कीं साऱ्याचे बाकीकरितां जमिनीचें उत्पन्न अटकावून ठेवण्यास जमीनदारास हक्क आहे असें कायद्यांत साफ आहे. साऱ्याबद्दल उत्पन्न अटकावूं नये, असा कायद्याविरुद्ध व चालीविरुद्ध जर कौलनाम्यांत साफ करार नसेल, तर तो कौलनामा कायद्यास व चालीस धरून आहे असें समजलें पाहिजे.

तारीख ९ माहे फेब्रुआरी सन १८४९.

सुरतेचे मुनसफ कोर्टांत **अपिलेंट्** ह्यानें नुकसानीबद्दल ५० रुपयांची फिर्याद केली, आणि तींत लिहिलें, कीं **रिस्पोंडेंट्** ह्यांनीं एका शेताचे व बागेचे उत्पन्नावर जप्ती बसविली आहे, ती जप्ती उठवावी, कारण सदरहू शेत व बाग

हीं माझी आहेत, आणि तीं मीं **आंबाईदास** ह्यास कौलानें दिलीं आहेत, ह्यास्तव माझा सारा फिटेतों त्यांचें उत्पन्न जप्त होऊं सकणार नाहीं. **रिस्पोंडेंटांनीं** जबाब दिला, कीं तंटच्यांतील उत्पन्न **आंबाईदास** ह्याच आहे, आणि त्यावर आमचा हुकूमनामा झाला आहे, ह्यास्तव त्या हुकूमनाम्यावरून तें उत्पन्न आह्मीं जप्त केलें आहे.

मुनसफानें **अपिलेंट** ह्याचे तर्फे हुकूमनामा करून त्यांत असें लिहिलें, कीं **अपिलेंट** हा जमीनदार व **आंबाईदास** हा त्याचें कुळ, असें पुरें शाबीत झालें, ह्याकरितां सारा फिटे तोंपावेतों जमिनीचे उत्पन्नावर जमीनदाराचा दावा चालेल, दुसरे मनुष्याचा दावा चालावयाचा नाहीं.

ह्या हुकूमनाम्यावर **रिस्पांडेंटांनीं** जिल्हाजड्जाकडे अपील केलें, तेव्हां जड्जानें खालीं लिहिल्या प्रमाणें न्याय केला.—

कोडताचे नजरेस येतें, कीं सदरहू मुकद्दम्याबद्दल मुनसफाचा अभिप्राय गैरवाजवी आहे, आणि तो ह्याप्रकारच्या खटल्यांच्या व्यवस्थेकरितां जो कायदा केलेला आहे त्याचे तात्पर्याशीं विरुद्ध आहे. **आंबाईदास** ह्यानें वादीपासून जमीन घेऊन त्यास कौलनामा लिहून दिला. त्यांत सदरहू जमिनीचे उत्पन्नांतून सारा घ्यावा असा करार नाहीं, ह्याकरितां साऱ्याबद्दल उत्पन्न घेण्यास वादीस अखत्यार आहे, असें आमच्यानें कबूल करवत नाहीं. वादी हा फक्त सावकार आहे, त्याला आपला सारा वसूल करण्याकरितां कोडतांत फिर्याद केली पाहिजे. ह्या शिवाय कौलनाम्यांतील कराराप्रमाणें ज्या मितीस **आंबाईदासा**कडे साऱ्याबद्दल पहिला हप्ता भरतो त्या मितीच्यापूर्वी १० दिवस सदरहू फिर्याद वादीनें लाविली आहे. मागील तीन साल-

चा सारा सदरहू उत्पन्नांतून मला घेणें आहे, असेंही वादीचें ह्म-
णणें आहे, आणि ह्या साऱ्याबद्दल **आंबाईदासानें** वादीस स-
मादसकत लिहून दिलें आहे, व ही जमीन त्यानें ४० वर्षांचे कौ-
लानें घेतली आहे, असें पुराव्यावरून दिसतें. सारा वसूल क-
*रण्याबद्दल फिर्याद न करितां शेतांतील उत्पन्न जप्त करण्याचा*
अखत्यार कायद्यामध्यें फक्त सरकारास आहे. जमीनदारास
शिरस्त्याप्रमाणें रेविन्यू कोडतांत फिर्याद केली पाहिजे. जमि-
नीचे उत्पन्नावर कुळाची मालकी आहे, ह्या करितां कौलनाम्यांत
साऱ्याबद्दल जमिनीचे उत्पन्न द्यावें, असा ठराव नसल्यास ज-
मिनीचे उत्पन्नावर इतर सावकारांचे हक्कापेक्षां जमीनदाराचा हक्क
अधिक नाहीं, सबब मुनसफ ह्याचा हुकूमनामा रद्द करून दोन्ही
कोडतांतील खर्च वादीवर घातला असे.

नंतर **अपिलेंट्** ह्यानें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील केलें, तेव्हां सन १८२७ चा कायदा ४ कलम ६९ रकम ३ हीवरून कुळाकडे सा- ऱ्याबद्दल जी बाकी येणें राहिली असेल तीबद्दल शेतांतील उभे धान्यांवर जमीनदाराचा हक्क आहे, ह्या कारणावरून अपील मं- जूर झालें. मुकद्दमा चौकशीकरतां काढला, तेव्हां **वार्डिन साहेबांनीं** अभिप्राय दिला, की साऱ्या पुरतें जमिनींतील उत्पन्न जमीनदारानें अटकावून ठेवावें असा मजकूर कौलनाम्यांत नाहीं, अशी जिल्हाजड्जाची पहिली शंका आहे, त्यास साऱ्याचे बाकीब- द्दल शेताचें उत्पन्न अटकावून ठेवण्यास जमीनदारास हक्क आहे, असें कायद्यांत साफ आहे, ह्याकरितां **आंबाईदासानें अपिलेंट्** ह्यास जो दस्तऐवज लिहून दिला आहे त्याप्रकारचे दस्तऐवजांत साऱ्याबद्दल शेताचें उत्पन्न अटकावून ठेवूं नये असा करार का-

लिजिट् साहेब.

यद्याविरुद्ध व चालीविरुद्ध नसेल, तर ते दस्तऐवज कायद्यास व चालीस धरून आहेत, असें समजलें पाहिजे; जिल्हाजड्जाची दुसरी शंका अशी आहे, कीं साऱ्याबद्दल पहिला हप्ता भरण्याचे पूर्वी १० दिवस **अपिलेंट्** ह्यानें फिर्याद केली, त्यास कायदा असा आहे, कीं साऱ्यापुरतें शेतांतील उत्पन्न जमीनदाराचें होय कुळाचें नव्हें, ह्यावरून **रिसपोंडेंट्** ह्यानें जें उत्पन्न जप्त केलें तें त्याचा रिणको **आंबाईदास** ह्याचें नव्हे, तिऱ्हाइत मनुष्य **चिमणलाल** ह्मणजे जमीनदार ह्याचें आहे, ह्याकरितां जप्ती उठविण्याकरितां जी फिर्याद झाली ती सारा घेण्याची मुद्दत भरल्यापूर्वी झालीकाय अगर मग झालीकाय एकच. तीन सालचे साऱ्यास पुरेशे उत्पन्नावर **अपिलेंट्** दावा सांगतो, अशी जिल्हाजड्जाची तिसरी शंका आहे, त्यास जितक्या उत्पन्नावरून जप्ती दूर करण्याविषयीं **अपिलेंट्** ह्यानें ही फिर्याद केली आहे, तितक्या उत्पन्नाची किंमत एक वर्षाचे साऱ्याचे रूपयांहून कमी आहे, तर जप्ती दुर करावी ह्मणून मुनसफ ह्यानें हुकूमनामा केला आहे, तो सदरहू कारणांवरून मंजूर करावा असें आमचें नजरेस येतें, सबब मुकद्दमा फुल कोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जाप्रमाणें अभिप्राय दिला, आणि जिल्हाजड्जाचा हुकूमनामा रद्द करून मुनसफाचा निवाडा कायम केला, व खर्च **रिस्पोंडेंटां**वर घातला.

बेलसाहेब वार्डिन साहेब व लिजिट् साहेब.

## स्पेशल अपील नंबर २४८७.

अपिलेंट्

**रुद्रजी अखू.**

रिस्पोंडेंट्.

**भवानीशंकर नथू.**

दावा रुपये १६१

**ठराव.**

एका मनुष्यानें अर्धे घर विकत घेतलें. नंतर कांहीं दिवसांनीं बाकीचें अर्धे घर मालकानें दुसरे मनुष्यास विकलें. तेव्हां पहिलें अर्धे घर विकत घेणारानें फिर्याद केली, कीं शास्त्रावरून व चालीवरून बाकीचें निमें घर विकत घेण्याविषयीं पहिल्यानदां माझा हक्क आहे, ह्यास्तव ही विकरी रद्द करावी. **बलसर**चे मुनसफानें वादीचे वतीनें निवाडा केला. अपिलांत **सुरते**चे जड्जानें वादीचा दावा असे कारणा वरून रद्द केला, कीं वादीचे वतीनें निवाडा करण्या सारखें त्यानें कांहीं कारण दाखविलें नाहीं, व खासगी माल विकण्याविषयीं हुकूम करण्यास, अगर खासगी माल दगलबाजीनें विकला असा पुरावा झाल्या शिवाय त्या मालाची विकरी रद्द करण्यास कोडतास अखत्यार आहे किंवा कसें ह्याबद्दल आंदेशा आहे. **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झाल्यावर तेथें ठराव झाला, कीं तंटयांतील निमें घर विकत घेण्याविषयीं चाली वरून पहिल्यानदां माझा हक्क आहे, असे वादी लिहितो. त्यास ही चाल बरोबर आहे, असे अनुमानानें दिसतें; परंतु **रिस्पोंडेंट्** असें ह्मणतो, कीं वादीचे खरेदीपत्रांत सदरहू चालीला सोडून चालण्याविषयीं सवड ठेविलेली आहे; त्यास ह्या गोष्टीबद्दल चोकशी होऊन ठराव झाला पाहिजे, ह्या कारणावरून **सदर अदालतीनें** जिल्हाजड्जाचा हुकूमनामा रद्द करून आणखी चोकशी करण्याकरितां मुकद्दमा त्याकडे परत पाठविला.

ह्या मुकद्दम्यांतील **अपिलेंट** ह्यानें **भवानी शंकर नथू** व **नथू अखू** ह्या दोघांवर अव्वल फिर्याद केली, आणि तींत त्यानें असें लिहिलें, कीं मीं **पेम्भाईचें** अर्धे घर तिजपासून विकत घेतलें, आणि पुढें ती मेल्यावर तिचावारस **भवानी शंकर** ह्यानें बाकी राहिलेलें अर्धें घर, हिंदुशास्त्राप्रमाणें माझा विकत घेण्याविषयीं प्रथमतः हक्क असतां, **नथू अखू** ह्यास विकलें, ह्याकरितां ही विकरी रद्द करावी. प्रतिवादी **भवानी शंकरा** ह्यानें जबाब दिला, कीं तंटयांतील अर्धे घर **नथू अखू** ह्याचे घरास लागून आहे, व पहिले अर्धे घराचे खरेदीपत्रांत लिहिलें आहे, कीं बाकीचें अर्धे घर जर मालकानें कधीं विकलें, तर तें त्यानें **नथू अखू** ह्यास विकावें, ह्याकरितां हें अर्धे घर प्रथमतः विकत घेण्याचा हक्क वादीस राहिला नाहीं.

तारीख १७ सप्तंबर सन १८५०.

ह्या मुकद्दम्याची चौकशी **बलसरचे** मुनसफानें केली. त्यानें **अदालतीचे** शास्त्रयाचा अभिप्राय आणवून **अपिलेंटाचे** वतीनें निवाडा केला. तो असा, कीं **नथू अखू** ह्यास **रिस्पोंडेंट** ह्यानें अर्धे घर विकलें, हें गैरशिस्त केलें, कारण सगळे घरापैकीं अर्धे घर **अपिलेंटाकडे** आहेच, आणि घराच्या दोन्ही भागांचीं बाहलें, खांब वगैरे हीं अशीं सांधलेलीं आहेत, कीं तीं निराळीं होणें कठीण, सबब तंटयांतील निमे घर विकत घेण्याविषयीं पहिल्यानदां अखत्यार **अपिलेंटास** आहे; ह्यास्तव जितके रुपयांस **नथू अखू** ह्यानें अर्धे घर विकत घेतलें तितके रुपये त्यानें **अपिलेंटा** पासून घेऊन तें अर्धे घर त्याचे स्वाधीन करावें. **रिस्पोंडेंट** प्रतिवादींपैकीं एक असामी ह्यानें अपील करून अपील अर्जांत लिहिलें, कीं तंटयांतील माल **अपिलेंटास** विकण्याची माझी खुशी

नाहीं, व तो माल विकण्याविषयीं मजवर जुलूम चालणार नाहीं. **सुरतेचे** अगूटिंग जड्जानें मुनसफाचा हुकूमनामा रद्द केला, आणि त्याबद्दल अशीं कारणें लिहिलीं, कीं **रिस्पोंडेंटानें** जें खरेदीपत्र करून दिलें आहे, तें रद्द करण्यास **अपिलेंटानें** कांहीं कारण दाखविलें नाहीं, व खासगीमाल दगाबाजीनें विकला असा पुरावा झाल्याशिवाय खासगी मालाची विकरी रद्द करण्यास कोडतास अखत्यार आहे किंवा नाहीं ह्याबद्दल अंदेशा आहे. मुनसफानें लिहिलें आहे, कीं तंटयांतील अर्धे घर **अपिलेंटास** विकत नघेऊं दिलें, तर त्याची फार गैरसोय होईल, व **रिस्पोंडेंटाचें** ह्मणणें, कीं मी तें **अपिलेंटास** विकण्यास खुशी नाहीं; त्यास तंटयांतील घर तूं **अपिलेंटास** वीक असा **रिस्पोंडेंटावर** जुलूम करण्यास कोडतास अखत्यार नाहीं.

नंतर **अपिलेंट्** (वादी) ह्यानें **सदर अदालतीस** स्पेशल अपील मंजूर होण्याविषयीं अर्ज केला, तेव्हां **अपिलेंट्** हा सगळे घरापैकीं अर्धे घराचा मालक आहे, सबब देशाच्या चालीप्रमाणें बाकीचें अर्धे घर विकत घेण्याचा पहिल्यानदां हक्क **अपिलेंटाचा** आहे; परंतु ह्या चालीकडे जड्जानें लक्ष दिलें नाहीं हें गैरशिस्त केलें, ह्या कारणावरून अपील मंजूर झालें. प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जासमोर मुकद्दमा आला, तेवेळेस त्यानें खालीं लिहिल्याप्रमाणें अभिप्राय देऊन मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला.

वार्डिन साहेब.

सर्टिफिकिटांत लिहिलेली चाल उभयपक्षकारांस कबूल आहे, असें समजलें पाहिजे, कारण **रिस्पोंडेंट्** ह्मणतो, कीं जें खरेदीपत्र **अपिलेंटानें** करून घेतलें आहे त्यांत असा मजकूर आहे, कीं बाकीचें निमें घर **अपिलेंटा** शिवाय दुसरे कोणास विकावें. आ-

तां रिस्पोंडेंटास मर्जीस येईल त्यास बाकीचें निमें घर विकण्याची मोकळिक असती, तर सदरहू मजकूर खरेदीपत्रांत लिहिण्याची गरज नव्हती. त्यास ह्यावरून गर्भित होतें, कीं ज्या चालीचे आधारावरून अपिलेंट ही फिर्याद करितो ती चाल रिस्पोंडेंटास कबूल आहे. ह्याप्रमाणें देशाची चाल कशी आहे हें ठरलें. आतां विचार करण्याचें दुसरें कलम हें आहे, कीं जी विकरी अशा चालीचे विरुद्ध झाली असेल ती विकरी रद्द होईल किंवा नाहीं. जिल्हाजड्जानें ठराव केला आहे, कीं ती रद्द होणार नाहीं, आणि त्याविषयीं त्यानें विशेषें करून हें कारण लाविलें आहे, कीं रिस्पोंडेंटानें जो माल दुसरे मनुष्यास विकला, तो माल अपिलेंटास विकत देण्यास त्याची खुशी नाहीं. तूं माल अपिलेंटास विक असा जुलूम रिस्पोंडेंटावर कोडताच्यानें करववत नाहीं खरा; परंतु सदरीं लिहिलेली चाल कबूल केली असतां रिस्पोंडेंटानें अपिलेंटास घर विकत न देतां दुसरे मनुष्यास विकलें, तर ती विकरी कोडतांत चालण्यासारखी आहे, असें ह्मणवत नाहीं. ह्या वरून ह्या कलमाकडे जिल्हाजड्जानें लक्ष दिलें नाहीं असें दिसतें.

आणखी अपिलेंटानें खरेदीपत्र दाखल केलें नाहीं, ह्यामुळें रिस्पोंडेंटानें जी तकरार केली आहे, कीं अपिलेंटानें जें खरेदीपत्र करून घेतलें आहे त्यांत असा मजकूर आहे, कीं बाकीचें निमें घर विकतेवेळेस चालीप्रमाणें अपिलेंटास न विकतां दुसरे मनुष्यास विकावें तिला मजबुती येते. सदरहू हकीकतीवरून आमचा अभिप्राय असा आहे, कीं रिस्पोंडेंटास आपले तकरारीबद्दल दुसरे प्रकारें पुरावा करण्याची परवाणगी द्यावी, आणि त्या तकरारीबद्दल चौकशी होऊन जो निकाल होईल त्याप्रमाणें

नथू अखू ह्यास रिस्पोंडेंटानें निमें घर विकलें, ती विक्री चालण्यासारखी आहे किंवा नाहीं ह्याबद्दल ठराव होईल.

वरील अभिप्रायाप्रमाणेंच फुलकोडतानें अभिप्राय देऊन जिल्हाजड्जाचा हुकूमनामा रद्द केला, आणि आणखी चौकशी करण्याकरितां मुकद्दमा परत पाठवून हुकूम केला, कीं सदर दिवाणी अदालतींत जो खर्च झाला आहे त्याबद्दल ठराव नवीन निवाडा करतेवेळेस कनिष्ठ कोडतानें करावा.

वार्डिन साहेब, लिजिट साहेब, आणि ग्रांट साहेब.

## स्पेशल अपील नंबर २४९३.

अपिलेंट्.

शेक उमर वल्लद शेक इभ्राहिम, मयत. त्याचे वारस शेक अमीन वल्लद शेक उसमान व आदम वल्लद इब्राहिम्.

रिस्पोंडेंट्.

शेक शिकंदर व शेक मुकद्दुम्.

दावा रुपये ९५६११६८.

### ठराव.

एका मशिदीस सरकारी तिजोरींतून नक्त नेमणूक पावत असे, तीपैकीं मला हिस्सा देववावा ह्मणून वादीनें, फिर्याद केली. ती जिल्हाजड्जानें असे कारणावरून रद्द केली, कीं सदरहू नेमणूक देणें हें सरकारचे मर्जीवर आहे, व सरकारानें मेहरबान होऊन ज्या मनुष्यास ती नेमणूक दिली त्या मनुष्याशिवाय दुसरे मनुष्यास ती नेमणूक द्यावी, असा हुकूम करण्यास आह्मास अ-

खुत्यार नाहीं. **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं मशिदीचे शेताच्या हिस्सेदारांस मशिदीचे सर्व उत्पन्नांतील हिस्सा मिळण्याविषयीं हक्क आहे, आणि नक्त नेमणूक देणें, हें जरी सरकारच्या खुशीवर आहे, तरी जोंपावेतों ती नेमणूक चालत आहे तोंपावेतों त्या नेमणूकेंतील हिस्सा मीळण्याबद्दल हक्काचा ठराव करण्याचा अखत्यार कोडतास आहे.

तारीख १७ माहे सप्तंबर सन १८५०.

**शेक उमर** ह्यानें फिर्याद केली, कीं मशिदीस सरकारी तिजोरींतून नक्त नेमणूक पावत असते, तीपैकीं माझा हिस्सा देववावा व माझ्या हिश्शा बद्दल रुपये येणें राहिले आहेत, ते देववावे. प्रतिवादींनीं जबाब दिला, कीं ज्या घराण्याचा हक्क सदरहू नेमणूकीवर आहे त्या घराण्यांतील हा वादी नाहीं, सबब ह्या नेमणूकीपैकीं त्यास हिस्सा मिळणार नाहीं.

**बेळगांवच्या** सदर अमीनानें निवाडा केला, कीं वादीचा दावा शाबीत आहे. अपिलांत हा हुकूमनामा **धारवाडचे** जड्जानें रद्द केला. त्यानें असें लिहिलें, कीं वादी **शेक उमर** ह्यानें हिश्शाविषयीं आपला हक्क शाबूत करण्याकरितां कांहीं बरोबर पुरावा दिला नाहीं, मला हिस्सा मिळत आला इतकाच कायतो त्याचा पुरावा आहे. सदरहू नेमणूक सरकार देतात आणि ती त्यांचे खुशीस पडेल त्यास ते देतील. त्यानें आणखीं असें लिहिलें आहे, कीं **रिस्पोंडेंट** (वादी **शेक उमर**) तकरार करितो, कीं सदरहू मशिदीकडे जें शेत आहे, त्यापैकीं माझ्या हिश्शाचा मी भोगवटा करित आहें; परंतु सरकारांतून मशिदीकडे जी नेमणूक पावते तिचा सदरहू शेताशीं कांहीं संबंध आहे असें आमचे नजरेस येत नाहीं; आणि ह्या मुकद्दम्यांत असें दिसतें, कीं सदरहू नेमणूक

मनास येईल त्यास देण्यास अगर अर्जी बंद करण्यास सरकार मुखत्यार आहेत, सबब ह्या कामांत आमच्यानें हात घालवत नाहीं, कारण सरकार मेहरबान होऊन सदरहू नेमणूक जर अपिलेंटास ( प्रतिवादीस ) देतात तर ती दुसरे मनुष्यास द्या, असा हुकूम करण्यास कोडतास अख्त्यार नाहीं.

इतक्यांत शेक उमर मयत झाला, तेव्हां त्याचे वारस शेक अमीन वल्लद शेक उसमान व आदम वल्लद इब्राहिम ह्यांनीं जिल्हाजड्जाचे हुकूमनाम्यास राजी न होऊन स्पेशल अपील मंजूर होण्याविषयीं सदर अदालतींत अर्जी केली, कीं तंटच्यांतील मशिदीकडे जें शेत आहे, त्या शेताचे आह्मी हिस्सेदार आहों, ह्याकरितां ह्यामशिदीस खर्चाबाबद सरकारांतून जी नक्त नेमणूक मिळते, तींतील हिस्सा आह्मास मिळण्याविषयीं हक्क आहे, तेव्हां ह्या मुकद्दम्याबाबद जिल्हाजड्जाचा अभिप्राय गैरशिस्त आहे, व त्यानें जो हुकूमनामा केला आहे तो शास्त्रास व चालीस विरुद्ध आहे, असें सिटिंगजड्जाचे वेल साहेब. नजरेस आलें, आणि त्यानें स्पेशल अपील अशाकारणावरून मंजूर केलें, कीं मशिदीकडील शेताच्या हिस्सेदारांचा मशिदीचे उत्पन्नावर हक्क आहे, आणि नक्त नेमणूक देणें हें सरकारचे मर्जीवर जरी आहे तरी जोंपावेतों ती नेमणूक पावत आहे तोंपावेतों तींतील हिस्सा मिळण्याचे हक्काबाबद ठराव करण्याचा अख्त्यार कोडतास आहे.

नंतर हा मुकद्दमा वार्डेन साहेबाकडेस आल्यावर सर्टिफिकीटांत लिहिल्याप्रमाणेंच त्यांनीं अभिप्राय दिला, तो असा, कीं ह्या कामाबद्दल ठराव करण्याचा अख्त्यार कोडतास आहे. सदर अमीनानें अव्वल चौकशी केली त्याप्रमाणेंच अपिलांत मुकद्दम्याचा

पुरावा पाहून त्याचा निकाल करण्याकरितां तो जिल्हाजडजाकडे पाठवावा असें मत देऊन **वार्डन** साहेबांनीं मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला. फुलकोडतानें **वार्डन** साहेबांचे अभिप्रायाप्रमाणें अभिप्राय देऊन जिल्हाजडजाचा हुकूमनामा रद्द केला, आणि चौकशी करून निवाडा **करण्याकरितां** मुकद्दमा जडजाकडे परत पाठऊन हुकूम केला, कीं **सदर दिवाणी अदालतींत** जो खर्च झाला आहे, त्याबद्दल ठराव **अखेरचा** हुकूमनामा होईल तेवेळेस करावा.

**वार्डिन साहेब व लिजिट् साहेब व ग्रांट् साहेब.**

## स्पेशल अपील नंबर २५०६.

अपिलेंट्

**नारो बल्लाळ कर्वे.**

रिस्पोंडेंट्

**त्रिंबक हरी गद्रे.**

दावा रुपये १५.

### ठराव.

माझ्या वंशपरंपरेचें शेत प्रतिवादीकडे गहाण आहे, तें त्याकडून मला देववावें, ह्मणून वादीनें फिर्याद केली होती. **रत्नागिरीचे सिनीयर** असिस्टंट जडजानें अपिलांत ठराव केला, कीं ही फिर्याद चालावयाची नाहीं, कारण मागील तीसवर्षांत सदरहू शेताची वहिवाट मजकडे होती, असा वादीकडून पुरावा झाला नाहीं, आणि प्रतिवादीनें शाबीत केलें आहे, कीं तंटयांतील शेत माझे कबजांत आहे व सरकारचा सारा मी देतों. स्पेशल अपील झाल्यावर **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं कितीही

काळ गेलाअसला, तरी गहाणमालावर मालकाचा दावा चालण्यास हरकत नाहीं, ह्मणजे जो मालक नाहीं त्यापासून मालक पाहिजे तेवेळेस माल परत घेईल.

**अपिलेंटानें** ही फिर्याद शेत परत घेण्याविषयीं केली होती. त्यानें अर्जीत लिहिलें, कीं माझें हें शेत वंशपरंपरेचें आहे, व सन १८१२ पावेतों माझे पूर्वजांचे कबजांत व वहिवाटीस होतें. सन १८१२त माझे तीर्थरुपांनीं तें शेत **विठ्ठलपंत** जोशी ह्यास मक्तयानें दिलें. नंतर **विठ्ठलपंत** जोशी ह्यानें तेंच शेत **बाळाजीपंत** गद्रे ह्यास दिलें. सबब **विठ्ठलपंत** जोशी व **रिस्पोंडेंट्** ( **बाळाजीपंत** गद्रे ह्याचा वडील पुत्र ) व त्याचे बंधु ह्यांवरही फिर्याद केली आहे. **मेहेंदळे** ह्यांचे घराण्यांतील दोघा मनुष्यांचें हें शेत आहे, आणि त्यांकडून तें आह्माकडे गहाण आलें आहे, असें प्रतिवादीनें जबाबांत लिहिल्यावरून त्या दोघा मनुष्यांचीही नावें वादीनें ह्या फिर्यादींत दाखल केलीं.

तारिख १७ माहे सपटंबर सन १८५०.

**हरणई**चे मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून ठराव केला, कीं शके १७३४ ह्मणजे इसवी सन १८१२ पावेतों सदरहू शेत **अपिलेंटा**चे पूर्वजांकडे होतें. त्यावर्षी माजीसरकारचे खोतानें तें शेत जप्त करून **मेहेंदळे** ह्यांस दिलें, आणि **मेहेंदळे** ह्यांनीं **रिस्पोंडेंट्** ह्यापाशीं गहाण ठेविलें, असा पुरावा होतो. सबब सदरहू शेत **रिस्पोंडेंट्** ह्यानें **अपिलेंट्** ह्याचें स्वाधीन करावें, व **रिस्पोंडेंट्** ह्यापाशीं ज्या मनुष्यानें तें शेत गहाण ठेविलें असेल त्यावर **रिस्पोंडेंट्** ह्यानें फिर्याद करावी.

सदरहू ठरावास राजी न होऊन **रिस्पोंडेंट्** ह्यानें **रत्नागिरी**चे **शिनीयर** असिष्टन जडजाचे कोडतांत अपील केलें. तेव्हां

त्यानें **अपिलेंट्** (वादी) ह्याचा दावा अशा कारणावरून **रद्द केला,** कीं सदरहू शेत माझें वंशपरंपरेचें आहे, अगर सदरीं लिहिल्याप्रमाणें माझे पूर्वजांनीं तें मक्तयानें दिलें होतें, असा पुरावा **अपिलेंटा**कडून झाला नाहीं, व **अपिलेंटा**च्याच ह्मणण्यावरून असें होतें, कीं त्याकडे शेताची वहिवाट ३० वर्षें पावेतों नाहीं, व **मेहेंदळे** ह्यांकडून **विठ्ठलपंत** जोशी ह्याकडे सदरहू शेताची वहिवाट होती. **मेहेंदळे** ह्यांनीं **रिस्पोंडेंट्** ह्यापाशीं सदरहू शेत गहाण ठेविलें, आणि तें त्याचे कबजांत आहे. तो सरकारचा सारा देत असतो.

ह्या निवाडयावर **अपिलेंटानें सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपिलाचा अर्ज केला, तो असे कारणावरून मंजूर झाला, कीं तंटयांतील शेताची मालकी **अपिलेंटा** कडे ३० वर्षांमध्यें नव्हती, असें कोणतेही प्रकारें दिसत नाहीं. शेत गहाण ठेवणारे **पांडुरंग हरी व आपाजी त्रिंबक मेहेंदळे** ह्यांचे बोलण्यावर भरंवसा ठेवला असतां असें दिसतें, कीं **त्रिंबक हरी गद्रे ( रिस्पोंडेंट )** ह्यानें सदरहू शेत कपटानें कबज्यांत घेतलें.

बेल साहेब.

प्रथम चौकशी करणारे जड्जा समोर मुकद्दमा आल्यावर त्यानें अभिप्राय दिला, कीं ह्यामुकद्दम्याचा निकाल कायद्याप्रमाणें झाला नाहीं, कारण वादीची फिर्याद मी मालक ह्मणून आहे, व प्रतिवादीची तकरार मी गहणादार ह्मणून आहे. एखादे मनुष्याचे कबजांत माल मालकीचे हक्कानें नाहीं, परंतु गहाणदाराचे हक्कानें आहे, तर तो माल परत घेण्याविषयीं फिर्याद कितीही वर्षांनंतर केली तथापि ती घेण्यास सन १८२७-चा कायदा ५ कलम ८ रक्कम १ हीवरून कोडतास हरकत नाहीं.

वार्डिन साहेब.

ह्मणजे जो मालक नाहीं त्यापासून मालक पाहिजे त्या वेळेस माल परत घेईल.

सदरहू मोकद्दमा ह्या प्रकारचा आहे, आणि आमचे नजरेस येतें, कीं पक्षकारांस अनुकूळ किंवा प्रतिकूळ जीं अनुमानें बहुत वर्षे फिर्याद केली नाहीं ह्या गोष्टीवरून काढिलीं आहेत, तीं ह्या मोकद्दम्यास लागू नाहींत. मालकीचा हक्क शाबीत करण्यास वादीपाशीं दस्तऐवजी अगर तोंडचा पुरावा आहे किंवा नाहीं, ह्याची चौकशी कोडतानें करावयाची होती, आणि पुरावा आहे असें नजरेस येतें तर शेताचे मालकीबाबद वादीचे वतीनें हुकूमनामा करावयाचा होता, आणि गहाणदार व दुसरे लोक जे फक्त माल कबजांत आहे ह्मणून हक्क सांगतात, त्यांस सांगावयाचें होतें, कीं मालकानें शेतावर जप्ती बसविल्यावर तुह्मी टांच उठविण्याची फिर्याद करा. वादीकडून मालकीचे हक्काबाबद शाबिती झाली नसती तर कोडतानें त्याचा दावा रद्द करावयाचा होता. ह्या दोन्ही पक्षीं प्रतिवादीचे कबजाचे हक्काबाबद चौकशी करण्याची जरूर नव्हती. ह्यावरून आमचा अभिप्राय असा आहे, कीं सदरीं लिहिल्याप्रमाणें मुकद्दम्याचा निकाल होण्याकरितां मुकद्दमा कनिष्ट कोडताकडे परत पाठवावा.

फुलकोडतानें प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जाचे अभिप्रायाप्रमाणें अभिप्राय देऊन **सिनियर** असिष्टन् जड्जाचा हुकूमनामा रद्द केला, आणि वर लिहिल्याप्रमाणें मुकद्दम्याचा निकाल करण्याकरितां मुकद्दमा कनिष्ट कोडताकडे पाठवून हुकूम केला, कीं **सदर दिवाणी अदालतींत** जो खर्च झाला आहे त्याबद्दल ठराव नवीन निवाडा करते वेळेस करावा.

वार्डिन साहेब,
लिजिट साहेब,
व ग्रांट साहेब.

## स्पेशल अपील नंबर २४७९.

अपिलेंट्

**दादाभाई रतनजी पारक.**

रिस्पोंडेंट्

**अरदेसर कसतुंजी.**

दावा रुपये ६३३.

**ठराव.**

एका पारशाजवळ तीन लाखरुपयांची जिनगी होती, तीबद्दल त्यानें मरणसमयीं आपले तिघे पुत्रांचे नांवें मृत्युपत्र करून ठेविलें होतें. पुढें दोघा पुत्रांनीं फिर्यादी केल्या; कीं आमचे वांटे आह्मांस देववावे; परंतु कोडतांनीं ठराव केला, कीं मृत्युपत्रांतील मजकुरावरून जिनगीची वांटणी होणार नाहीं. पुढें तिघा भावांपैकीं एकानें कर्ज केल्यावरून त्याचे सावकारानें त्यावर हुकूमनामा करून सदरहू जिनगीपैकीं सहा दुकानें जप्त केलीं. हीं जप्ती उठविण्या करितां दुसरे भावानें फिर्याद केली, आणि अर्जांत लिहिलें, कीं मृत्युपत्रावरून व मागें झालेल्या हुकूमनाम्यांवरून मालाची वांटणी होणार नाहीं, अगर मालांतून सावकारास कांहीं मिळावयाचें नाहीं. तेव्हां मुनसफानें त्याचे वतीनें हुकूमनामा केला; परंतु जिल्हाजड्जानें त्याचा दावा रद्द केला. नंतर त्यानें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील केलें. तेथें ठराव झाला, कीं सामान्य मालमत्तेस ज्या गोष्टी लागू आहेत, त्या सदरहू मालमत्तेस लागू आहेत, ह्याकरितां सावकारांचे अर्जावरून तिची जप्ती व लिलांव होईल.

**सुरत** एथें मुनसफाचे कोडतांत **अपिलेंटानें** अव्वल फिर्याद

तारिख २७ माहे सपटंबर सन १८५०.

रुपये १५००ची केली, कीं माझा भाऊ **पुंजीभाई रतनजी** ह्यावर **रिस्पोंडेंटाचा** हुकूमनामा झाला होता, त्या हुकूनाम्या वरून **रिस्पोंडेंटानें** * साहा दुकानांवर जप्ती बसविली आहे, ती जप्ती उठवावी. जी वडिलोपार्जित जिनगी मला व माझे भावांस आमचे तीर्थरुपांनीं देऊन तीजबाबद मृत्यूपत्र करून ठेविलें आहे, त्या जिनगीपैकीं हीं साहा दुकानें आहेत, आणि †मृत्युपत्रांतील ठरावावरून सदरहू जिनगीपैकीं कांहींसुद्धां दुसऱ्याचे सत्तेंत देतांयेत नाहीं. जिनगीची वांटणी करून द्यावी, ह्मणून आह्मांपैकीं एका भावानें सन १८१२त व दुसरे भावानें सन १८२४सांत फिर्याद केली होती; परंतु मृत्युपत्रांतील करारावरून दोन्ही फिर्यादींत ठराव झाला, कीं जिनगीची वांटणी होणार नाहीं. ह्यास्तव कर्जाबाबद सावकारांस सदरहू जिनगीपैकीं कांहीं मिळणार नाहीं.

**रिस्पोंडेंट्** (प्रतिवादी) ह्यानें जबाब दिला, कीं अशा प्रकारचें मृत्युपत्र मंजूर धरिलें असतां अन्याय होईल, कारण त्यांतील ठराव भावांच्या सावकारांचे अनहित करण्यासारखे आहेत, हें उघड आहे, आणि वादीचा भाऊ **पुंजीभाई** ह्याचे कबजांत तंटच्यांतील दुकानें बहुत वर्षें आहेत, व तो भाडें घेत आहे, ह्यावरून जिनगीची वांटणी झाली असेल ह्यांत संशय नाहीं.

मुनसफानें असें लिहिलें, कीं सदरहू जिनगी कोणास देतां येत नाहीं, कारण वादीचे दोघा भावांनीं मागें फिर्यादी केल्या हो-

---

* ह्याबाबद हकीकत मुकद्दम्याचे शेवटीं दिली आहे.

† मृत्युपत्राचा तरजुमा मुकद्दम्याचे शेवटीं दिला आहे, तो पाहावा.

ण्या, कीं मृत्युपत्रांतील करार एकेबाजूस ठेवून जिनगीची वांटणी करून द्यावी. तेव्हां **सदर अदालती**पर्यंत सर्व कोडतांत त्यांचे दावे रद्द झाले; व त्यानें आणखीं असें लिहिलें आहे, कीं तंटच्यांतील सहा दुकानांचा **पुंजी भाईच** मालक आहे अगर तीं **रिस्पांडेंट्** ( प्रतिवादी ) ह्यापाशीं गहाण आहेत असा कांहींच पुरावा झाला नाहीं; व जिनगिच्या दुसरे कांहीं भागावर **कल्याणभाई द्वारका** ह्यानें जप्ती बसविली होती, ती उठविण्या करितां ह्याफिर्यादी प्रमाणेंच वादीनें फिर्याद केल्यावरून ती जप्ती उठली. सदरहू कारणांवरून मुनसफानें ठराव केला, कीं प्रतिवादीनें जप्ती उठवावी, व रुपये ५०० बाबद दुकानांवर जप्ती बसली होती तितके रुपयांची फिर्याद वादीनें करावी, ती त्यानें दुकानांचे किमतीची ह्मणजे रुपये १५००ची फिर्याद केली, ही त्यानें खर्च वाढविण्याचे हेतूनें केली; सबब रुपये ५००ची फिर्याद केली असती तर जो खर्च झाला असता त्याहून जो ज्यास्त खर्च झाला असेल तितका वादीनें सोसावा.

ह्यानंतर जिल्हाजडूजाचे कोडतांत वादी **दादाभाई** ह्यानें अपील केलें, कीं सर्व खर्च प्रतिवादीवर घालावा; व प्रतिवादीनें अपील केलें, कीं जप्ती केलेला माल माझे हवाली करावा.

ह्या अपिलाची चौकशी **कीज** साहेब ह्यांनीं करून हुकूमनामा केला, कीं कनिष्ट कोडताचा निवाडा फार गैरवाजवी आहे. ज्यां दाखल्यांवरून विशेषेंकरून मुनसफानें निवाडा केला असें दिसतें, ते दाखले ह्या मुकद्दम्यास लागू नाहींत. मृत्युपत्रांत असा मजकूर आहे, कीं जिनगीची वांटणी करूं नये. तिघा भावांपैकीं दोघा भावांनीं आपले हिताकरितां व सोईकरितां नंबर २१३० सन १८१२ची व नंबर ४३७९ सन १८२४ची अशा फिर्यादी केल्या

होत्या, कीं मृत्युपत्रांतील मजकूर एकीकडेस ठेवून जिनगीची वांटणी करून द्यावी. तेव्हां तें मृत्युपत्र मंजूर धरलें होतें; परंतु ह्या मुकदम्यांत मृत्युपत्रांतील मजकूर मंजूर धरला जाणार नाहीं. प्रतिवादी **अरदेसर** ह्याचा हुकूमनामा मृत्युपत्र करणाराचे पुत्रांपैकीं एका पुत्रावर झाला आहे, आणि ह्या पुत्राचा हिस्सा जिनगींत आहे, असें वादी स्वतां कबूल करीत आहे; ह्याकरितां आपला हुकूमनामा पुराकरून घेण्याकरितां जिनगीची जप्ती करण्याचा प्रतिवादीस हक्क आहे. नि ॥५४चा निवाडा दाखल्या करितां दिला आहे. त्यांत ते वेळेचे प्रिन्सिपाल सदर अमिनानें जें मत दिलें आहे, तें ह्या मताहून भिन्न आहे; परंतु तो मुकद्दमा व हा मुकद्दमा हे एकसारखेच नाहींत. त्या मुकद्दम्यांत जी जिनगी जप्त झाली होती ती जंगम होती, ह्याकरितां ज्या जिनगीबद्दल मृत्युपत्र झालें आहे, त्या जिनगीपैकीं सदरहू जंगम जिनगी आहे, असा पुरावा करण्यास फार कठीण पडलें असतें. ह्याशिवाय त्या हुकूमनाम्यावर अपील झालें नाहीं, व जो निवाडा हल्लींचे मुकद्दम्यांत दाखल केला आहे, व जो ह्या फिर्यादीस लागू नाहीं ह्मणून वर लिहिलें आहे, त्या निवडयावरून नि. ५४चा हुकूमनामा झाला आहे, सबब तो दाखल्यास घेण्याचे उपयोगी नाहीं. प्रतिवादीचा हुकूमनामा **पुंजीभाई रतनजी** ह्यावर झाला आहे. तो पुरा करून घेण्याकरितां त्यानें जिनगीची जप्ती केली, त्यावेळेस **पुंजीभाई** दिवाणी तुरंगांत होता. **पुंजीभाई** ह्याचे बापानें ज्या जिनगीबाबद मृत्युपत्र केलें ती जिनगी ६,०००,००ची आहे. ती पैकीं **पुंजीभाई**चे हिश्शास रुपये २,०००,००ची जिनगी येते; ती **पुंजीभाई**चे कर्जाचे फेडीस लाविली असतां त्याचें सर्व कर्ज फिटन कांहीं जिनगी शिलक राहील. ज्याज्या वेळेस सावकार लो-

क आपला ऐवज घेण्याकरितां फिर्याद करितील, त्याऱ्या वेळेस जर ठराव झाला, कीं मृत्युपत्रांतील ठरावाप्रमाणें जिनगीवर तुमचा दावा चालावयाचा नाहीं; तर त्यांचा जो वास्तविक ऐवज येणें तो त्यांस कधीं मिळावयाचा नाहीं. सदरहू कारणांवरून कनिष्ठ कोडताचा हुकूमनामा रद्द करून जप्त झालेला माल प्रतिवादीचे हवालीं करावा, ह्मणून ठराव केला आहे. दोन्ही कोडतांतील खर्च वादी **दादाभाई रतनजी** ह्यावर घातला आहे. वादीनें ही फिर्याद केली, हें त्यानें अयोग्य काम केलें असें दिसतें.

नंतर **दादाभाई रतनजी** ह्यानें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील केलें. अर्जींत त्यानें मुख्यत्वें करून ह्याप्रमाणें मजकूर लिहिला, कीं जिनगीची वांटणी होऊंनये असा माझे तीर्थरुपांचा हेतु मृत्युपत्र करण्यांत होता हें उघड आहे, व जिनगीची वांटणी होण्याविषयीं माझे दोघा भावांनीं फिर्यादी केल्या होत्या, त्यांचा निकाल कसा झाला आहे, हें पहावें, व जिल्हाजड्जानें माजी जड्जाचे हुकूमनामे रद्द केले, व कोडताची चाल अशी आहे, कीं सावकाराचे कर्जाचे फेडीकरितां समाईक जिनगीची जप्ती करूं देत नाहीं ही चाल त्यानें मोडली, व मी आपले तीर्थरुपाचें मृत्युपत्र चालविणारा सबब त्याचे हेतुप्रमाणें चालणें हा माझा धर्म, तोही जड्जानें मोडिला, हीं कामें त्यानें गैरशिस्त केलीं.

**जोन्स** साहेबांनीं तारिख १७ माहे जून सन १८२६ रोजीं नंबर ४३७९चे *मुकद्दम्यांत हुकूमनामा केला आहे, कीं जिनगीची वांटणी होणार नाहीं, तर हा हुकूमनामा जिल्हा जड्जाचे

---

***पुंजीभाई रतनजी** ह्याचे भावानें जिनगीची वांटणी व्हावी ह्मणून सन १८२४ सालीं फिर्याद केली होती, त्या मुकद्दम्यांत.

हुकूमनाम्यावरून रद्द झाल्यासारिखा आहे, ह्याकारणावरून **बेल** साहेबांनीं स्पेशल अपील मंजूर केलें. पुढें **वार्डिन** साहेबां समोर मुकद्दमा आल्यावर त्यांनीं चौकशी करून अभिप्राय दिला, कीं तंट्यांतील सहा दुकानें **रिस्पांडेंट्** ( प्रतिवादी ) ह्यास द्यावीं, असा कनिष्ठ कोडतानें ठराव केला; ह्यावरून अर्थातच जिनगी-चा विभाग होतो, ह्याकरितां सदरहू जिनगीची वांटणी करूं-नये, ह्मणून जो निवाडा झाला आहे तो कनिष्ठ कोडतानें मोडला असें ह्मटलें पाहिजे, कारण वखारींत पुत्रांनीं एकत्र व्यापार करावा असें मृत्युपत्रांत आहे, व **जोन्स** साहेबांनीं ठराव के-ला आहे, कीं जिनगीची वांटणी होऊंनये असा मृत्युपत्र करणा-राचा हेतु आहे. आतां ह्या ठरावाचे परिणामाविषयीं ज्या जिल्हा जड्जानें गोष्टी लिहिल्या आहेत त्या आह्मी कबूल करितो; परंतु त्याचा ठराव आमच्यानें कायम करवत नाहीं. कारण त्या ठरावा-नें अखेरचा निवाडा रद्द केल्याप्रमाणें होत आहे, सबब विचार होण्या करितां मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोड-तानें निवाडा केला, कीं **लार्ड एलडन** ह्यानें लिहिलें आहे, कीं जिनगी पुत्रांस दिली अस-ली तर त्याजिनगीला सामान्य मालमतेला ज्या गोष्टी लागू आहेत त्या लागू आहेत; ह्मणजे ती गहाण ठेवि-तां येईल, विकतां येईल, व बक्षीस वगैरे देतां येईल, व ती जिन-गी कोणास दिलेली नसली तरी सावकार ती जप्त व लिलांव क-रूं शकतील.

वार्डिन साहेब लि-जिट् व ग्रांट्साहेब.

मृत्युपत्रांत जिनगी पुत्रांचे मागें अमुकाला मिळेल असें लिहिलें नाहीं, ह्याकरितां जे समाईक मालक आहेत त्यांपैकीं एकानें फिर्याद केली असतां जिनगीची वांटणी जरी होणार नाहीं, तरी त्यांचे सावकारानें फिर्याद केली असतां त्या जिनगीची ज-

र्सी व लिलांव होईल. सदरहू कारणांवरून जिल्हाजड्जाचा हुकूमनामा खर्चासुद्धां कायम केला असे.

इतक्यांत **अपिलेंट्** मरण पावला. तेव्हां त्याचे दोघेपुत्र **जाहांगीरभाई** व **रतन्जीभाई** व तिसऱ्या मयत पुत्राचा वारस ह्या तिघांनीं सदरहू हुकूमनाम्यास राजी न होऊन सन १८२७चा कायदा ४ कलम ७१ व ९६ ह्यां प्रमाणें **सदर अदालतींत** तपासणी अर्ज केला. त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.

सन १८४९चे सालांत आक्टोबर महिन्यांत **दादाभाई** मरण पावला. त्याचे आह्मी पुत्र आहों.

आमचा चुलता **मेरवान्जी** ह्यानें आमचे तीर्थरूप **दादाभाई** व अमचा दुसरा चुलता **पुंजीभाई** ह्यांवर सन १८१२रांत सुरतेचे जिल्हाकोडतांत फिर्याद केली होती, कीं माझे तीर्थरूपाचे जिनगीपैकीं तिसरा हिस्सा मला देववावा, तेव्हां जिल्हाजड्जानें ठराव केला, कीं मृत्युपत्रांतील मजकुरावरून जिनगीची वांटणी होऊं शकत नाहीं, सबब दावा रद्द असे. हा ठराव * **प्राविन्शल अपील** कोडतानें तारीख १७ माहे जुलई सन १८१३रांत व ह्या अदालतीनें तारीख १९ माहे मे सन १८१५रांत मंजूर केला आहे.

आमचा चुलता **मेरवान्जी** ह्यानें आमचे तीर्थरूप **दादाभाई** व चुलता **पुंजीभाई** ह्यांवर सदरीं लिहिलेली फिर्याद करण्याचे पूर्वीं संवत् १८६५त तिघां बंधूंनीं ऐकमेकांस दस्तऐवज लिहून दिले आहेत, कीं आपले बापाचे मृत्युपत्रांतील ठरावांप्रमाणें एकमेकांनीं चालावें, ह्मणजे आपले तीर्थरूपांचे जिनगीची वांटणी करूं नये, तर तीर्थरूपांनीं योजलेले कामास लावावी; ह्मणजे तीवर दु-

* हें कोडत पूर्वीं सुरतेंत होतें. हल्लीं बंद आहे.

कान चालवावें, आणि जो नफा होईल तो तिघां भावांचे व त्यांचे वारसांचे खर्चाकडे सारखा खर्चावा, व घराण्यांतील दुसरे मनुष्यांचा व त्यांचे संततीचा नित्य व नैमितिक खर्च जिनगी पासून जो नफा होईल त्यांतूनच करावा. ह्या बाबद तपशीलवार मजकूर तिघां भावांत करारनामे झाले आहेत, ते पाहिले ह्मणजे समजेल.

जिनगीची वांटणी होणार नाहीं, असें सदरीं लिहिलेले मृत्युपत्रांत असतां, व निरनिराळे कोडतांचे निवाड्यांत ठरलें असतां, व आपण वर सांगितलेला करारनामा लिहून दिला असतां, आमचा चुलता **पुंजीभाई** ह्यानें आमचे तीर्थरूप **दादाभाई** ह्यांवर **सुरते**चे जिल्हाकोडतांत नंबर ४३७९ची फिर्याद केली, कीं जिनगीपैकीं माझा हिस्सा मला देववावा, तेव्हां जिल्हाजड्ज **जोन्स** साहेब ह्यानें तारीख १७ माहे जून सन १८२६ रोजीं हुकूमनामा केला, कीं जिनगीची वांटणी होणार नाहीं, आणि ह्या कारणास्तव माझा जिनगीचा हिस्सा मला मिळावा ह्मणून **पुंजीभाई**नें फिर्याद केली आहे ती रद्द असे.

आमचा चुलता **पुंजीभाई** हा इन्सालवंट झाला, आणि त्याला घराण्यांतील पेढीचें पुष्कळ कर्ज झालें. त्यानें सन १८२७-चा कायदा ४ कलम ६४ व ९६ ह्यांप्रमाणें आपली सर्व जिनगी सावकारांचे फडीस दिली. तींत त्यानें तंटच्यांतील जिनगीही लाऊन दिली; परंतु पुष्कळ योग्य कोडतांनीं आमचे वडिलांचे मृत्युपत्राचा जा अर्थ केला आहे त्याप्रमाणें व त्याचे (**पुंजीभाई**चे) स्वतांचे करारनाम्याप्रमाणें तंटच्यांतील जिनगीवर त्याची सत्ता फक्त ताहांहयात आहे.

**पुंजीभाई** ह्यानें आपली ह्मणून जिनगी सावकारांस लावून देऊन त्यांचे हातून सुटल्यावर सावकार ह्यांनीं साधारण मालम-

तेची अंशभूत जी तंटच्यांतील मालमत्ता हीवर जप्ती बसविली. ती उठविण्याकरितां आमचे बापानें फिर्याद केली, तेव्हां मुनसफानें त्याचे ( अपिलेंटाचे ) वतीनें हुकूमनामा करून जप्ती दूर केली, परंतु अपील झाल्यावर जिल्हाजडूजानें मुनसफाचा हुकूमनामा रद्द करून ठराव केला, कीं मालमत्ता विभाग होण्या सारखी आहे, ह्या करितां जप्ती कायम ठेविली असे.

ह्या हुकूमनाम्यावर **अपिलेंट्** ह्यानें **सदर अदालतींत स्पेशल** अपील केलें, तें **बेल** साहेबांनीं अशा कारणावरून मंजूर केलें, कीं जिनगीची वांटणी होणार नाहीं, ह्मणून **जोन्स** साहेबांनीं तारीख १७ माहे जून सन १८२६ नंबर ४३७९चे मुकद्दम्यांत निवाडा केला आहे, तो निवाडा जिल्हा जडूजाचे हुकूमनाम्यावरून रद्द झाल्या सारखा आहे. ज्या मितीस जडूजानें हुकूमनामा केला त्या मितीस जड्जाला **पुंजीभाई** ह्याचे रुपये २०,००० कर्ज देणें होतें. पुढें **वार्डिन** साहेबांनीं विचार होण्या करितां अपील फुल कोडताकडे पाठविलें. तें अशा कारणावरून पाठविलें, कीं **पुंजीभाई** व **दादाभाई** ह्यांचा बाप मयत **रतन्जी** ह्यानें मृत्युपत्र केलें आहे, तें करण्यांत त्याचा हेतु होता, कीं जिनगीची वांटणी होऊं नये, व दुकानांची वांटणी करावी ह्मणून जो कनिष्ट कोडतानें हुकूमनामा केला आहे, त्यावरून तारीख १७ माहे जून सन १८२६चा हुकूमनामा जिनगीची वांटणी होणार नाहीं ह्मणून आहे तो रद्द होतो.

**सदर दिवाणी अदालतीचे** फुल कोडतानें गेल्या सप्तंबर महिन्याचे ७वे तारखेस जडूजाचा हुकूमनामा अशा कारणांवरून कायम केला, कीं **लार्ड एलडन** ह्यानें असें लिहिलें आहे, कीं जिनगी पूत्रांस दिली असली तर त्या जिनगीला सामान्य माल-

मत्तेला ज्या गोष्टी लागू आहेत त्या लागू आहेत, ह्मणजे ती गहा-
ण ठेवितां येईल, विकतां येईल, व बक्षिस वगैरे देतां येईल, व ती
जिनगी कोणास दिलेली नसली तरी सावकार ती जप्त व लिलां-
व करूं शकतील. मृत्युपत्रांत जिनगी पुत्रांचे मागें अमुकाकडे
जावी असें लिहिलेलें नाहीं, ह्या करितां जे समाईक मालक आहे-
त त्यांपैकीं एकानें फिर्याद केली असतां जिनगीची वांटणी जरी
होणार नाहीं, तरी त्यांचे सावकारांनीं फिर्याद केली असतां त्या
जिनगीची जप्ती व लिलांव होईल.

आतां, आमचा अर्ज असा आहे, कीं सन १८२७चा कायदा
४ कलम ७१ व ९६ ह्यांप्रमाणें ह्या हुकूमनाम्याचे तपासणी बा-
बद आमचा अर्ज मंजूर करावा, कारण आमचे आज्यानें जें मृ-
त्युपत्र केलें आहे त्या मृत्युपत्राचा बरोबर अर्थ योग्य अमलदारां-
नीं केला आहे, त्यास त्या मृत्युपत्रावरून तंटयांतील जिनगीची
वांटणी होणार नाहीं, व सदरीं लिहिलेले कोडतांनीं हुकूमनामे
केले आहेत, त्यांत व मुख्यत्वें करून तारीख १७ माहे जून सन
१८२६ रोजीं **जोन्स** साहेबांनीं जो हुकूमनामा केला आहे, त्यांत
असें ठरलें आहे, कीं **मेरवान्जी** व **पुंजीभाई** ह्यांचे बापाचे जि-
नगींत जो त्यांचा हिस्सा आहे, त्या हिशाचे उत्पन्नावर त्यांची
सत्ता त्यांचे हयातीपर्यंत आहे, ह्या करितां ते जिवंत आहेत तों-
पावेतों त्यांचे सावकारांस त्यांचे हिशाचें उत्पन्न मात्र मिळेल, जि-
नगी मिळणार नाहीं, व मृत्युपत्र निशाण **अ** वरून व भावांचे
मध्यें नि॥ **ब**चा करारनामा झाला आहे त्यावरून, व **मेरवान्जी**-
नें फिर्याद केल्या वरून जिल्हा कोडतानें व **प्राविन्शल अपि-
ल** कोडतानें व **सदर अदालतीनें** जे हुकूमनामे केले आहेत
यांवरून व पुंजीभाईनें फिर्याद केल्या वरून तारीख १७ माहे

जून सन १८२६ रोजीं **जोन्स** साहेबांनें जो हुकूमनामा केला आहे त्यावरून, सदरहू जिनगीची वांटणी होणार नाहीं, व घराण्यांतील दुसरे मनुष्यांस ह्या जिनगीचे उत्पन्नांतून कांहीं उत्पन्न द्यावें लागतें.

आह्मी आणखीं असें सुचवितों, कीं जो **सदर अदालतीचा** हुकूमनामा रद्द करावा ह्मणून हल्लीं आह्मी अर्ज करितों, तो हुकूमनामा जो कायदा व जी वहिवाट जिल्हानिहाय चालू आहे त्यास विरुद्ध आहे.

सदरहू तपासणी अर्ज मंजूर झाला, आणि त्या अर्जाचा बरोबर निकाल करतां यावा ह्मणून **सदर अदालतीनें सुरतेचे** जिल्हा जडूजास लिहून पाठविलें, कीं **सुरत** शहरचे मोदीस व पारसी पंचाइतीस विचारावें, कीं पारसी लोकांत एखादे अविभक्त घराण्यांतील एका मनुष्यानें कर्ज केलें असतां त्या कर्जाबाबद त्या घराण्याचे जिनगीची जप्ती त्यांचे चालीवरून होईल किंवा नाहीं. **सुरतेचा** मोदी **अपिलेंटाचा** नातलग आहे, असें कोडतास समजल्यावरून कोडतानें सदरहू प्रश्न **मुंबईतील** पारसी पंचाइतीकडे लिहून पाठविला. दोन्ही पंचाइतीकडून जवाब आले, कीं जोंपावेतों घराण्यांतील जिनगी त्यांतील मनुष्यास वांटून दिली नाहीं तोंपावेतों त्या घराण्यांतील एका मनुष्यानें अगर एकाहून ज्यास्त मनुष्यांनीं कर्ज केलें असतां त्या कर्जाच्या फेडीकरितां ती जिनगी जप्त होणार नाहीं; परंतु वांटणी झाली असली तर जो मनुष्य कर्ज करील त्याचे कर्जाचे फेडीकरितां त्याचे हिशाची जिनगी जप्त होईल.

तपासणीचे अर्जावर व पुढें जी काय हकीकत झाली ती बाबद **रिस्पोंडेंटानें** खालीं लिहिल्या प्रमाणें तकरार केली.

१. सुरतेचा मोदी **अपिलेंटा**चा नातलग आहे, सबब त्या मोदीचे अभिप्रायावर भरवसा ठेवूं नये. जे प्रश्न त्या एकट्याकडे पाठविले आहेत ते सदरहू मोदी व दस्तूर ( उपाध्याय ) व **अकबर** ( वृद्ध ) ह्यांकडे पाठवावे, व ह्याविषयीं कोडतानें तारीख ७ माहे जानेवारी सन १८२७ रोजीं हुकूम दिला आहे.

२. पन्नास वर्षांचे देवघेवीबद्दल बहूत हुकूमनामे झाले आहेत, ते सर्व हुकूमनामे कोडतांनींच केले आहेत, मोदीनें केलें नाहींत. सन १८२७चा कायदा ४ कलम २५ ह्यावरून पैशाचे देवघेवीबावद फिर्यादीचे फैसले *स्त्याटु प्रमाणें व कायद्या प्रमाणें झाले पाहिजेत. ते मोदीच्या अभिप्राया वरून कसे होतील; व ह्या मुकद्दम्याचा फैसला मोदीचे अभिप्रायाप्रमाणें केला असतां सरकारावरील लोकांचा भरवसा उडेल व अन्याय होईल.

३. पूर्वीचे मुकद्दम्यांत जे कागदपत्र दाखल झाले आहेत त्यांवरून साबीत झालें आहे, कीं जिनगीची वांटणी झाली आहे. मृत्युपत्र करणाराचें व त्याचे पुत्रांचें कर्ज फिटे तोंपावेतों **दादाभाई**चे पुत्राचा जिनगीवर वारसा चालणार नाहीं. जिनगीची वांटणी कधींच होऊं नये असा मृत्युपत्र कर्त्याचा उद्देश नाहीं; व मागील मुकद्दम्यांत हुकूमनामे झाले आहेत, कीं जिनगीची वांटणी होऊं नये; परंतु हुकूमनामे बरोबर आहेत, असें ह्मणतां येत नाहीं, ह्या गोष्टीविषयीं अंदेशा आहे.

४. माझें कूळ **पुंजीभाई** हा मृत्युपत्र करणाऱ्याचा वडील पुत्र आहे, व घराण्यांतील पैशाचा कारभार करण्यास अधिकारी आहे, आणि माझें कर्ज त्याकडे येणें आहे तें त्याचे व त्याचा भाऊ **दादाभाई** ह्याचे नांवें लिहिलें आहे.

---

*पारलमेंट कायदे करतात त्या कायद्यांस स्त्याटु ह्मणतात.

५. मृत्युपत्र व पुढें भावांमध्यें झालेला करारनामा ह्यांच्याच कायद्या आधारानें **अपिलेंट्** वाद सांगत आहे; तर हे दस्तऐवज छापील कागदावर लिहिलेले नाहींत; साधे कागदावर लिहिलेले आहेत, व त्यांत करारनाम्यावर कोणाची साक्षी नाहीं.

६. पेढीचा पैसा **पुंजीभाई**कडे येणें आहे, असें लिहिलें आहे हें खोटें आहे, व सन १८२७चा कायदा ४ कलम ६४ ह्या प्रमाणें **पुंजीभाई**नें जिनगी सावकारांस लाऊन दिली, हें ह्मणणेंही खोटें आहे. त्यानें कांहीं जिनगीमात्र सावकारांस लावून दिली आहे. बाकीची जिनगी **पुंजीभाई** व त्याचे दोघे भाऊ ह्यांनीं घेतली. **पुंजीभाई**चा जिनगींत हिस्सा आहे, सबब त्या हिशांतून माझे कर्जाची फेड झाली पाहिजे.

मुकद्दम्याची सुनावणी होऊन **सदर अदालतीनें** हुकूमनामा केला तो येणे प्रमाणे. ता० ७ माहे सप्तंबर सन १८५९ रोजीं नंबर २४७९च्या हुकूमनाम्यांत जो आह्मी अभिप्राय दिला आहे, तोच हल्लीं आह्मी कायम ठेविला आहे; परंतु जिल्हा जड्जानें आपले हुकूमनाम्यांत लिहिलें आहे, कीं **रिस्पोंडेंट्** ह्याचें कूळ **पुंजीभाई** ह्याला घराण्यांतील जिनगीपैकीं हिस्सा अद्यापि घेणें आहे; पण ह्याचा निर्णय झाला नाहीं, ह्या कारितां ह्याचा निर्णय सन १८२७चा कायदा ४ कलम ६२ रकम १ ह्यांवर तारीख २ जून सन १८२९चें समजूतपत्र झालें आहे, त्यांत लिहिल्या प्रमाणें तजवीज केली असतां होईल, ह्या कारणास्तव कोडतानें तंटयांतील सहा दुकानांवरील जप्ती उठविली आहे, कारण **रिस्पोंडेंट्** जें ह्मणतो, कीं हीं सहा दुकानें **पुंजीभाई**च्या हिशाचींच आहेत, त्याला त्याच्या ह्मणण्याशिवाय दुसरा आधार

वार्डिन साहेब,
लिजिट् साहेब,
ग्रांट् साहेब.

नाहीं. आतां रिस्पोंडेंटानें सदरीं लिहिलेले समजूतपत्रांत जो मार्ग सांगितला आहे त्याप्रमाणें तजवीज करावी.

---

*हकीकत; तिघां भावांस त्यांचे बापानें मरतेवेळेस साहालाख रुपयांची जिनगी ठेविली होती, त्या तिघांपैकीं आपेलेंट हा एक भाऊ होता, व तटच्यांतील दुकान त्या जिनगी पैकीं होतें. सदरहू जिनगीबाबद मागें दोनवेळां फिर्यादी झाल्या होत्या. सन १८१२त तिघां भावांपैकीं एका भावानें दुसरे दोघांवर फिर्याद केली, कीं जिनगीपैकीं माझा हिस्सा मला देववावा; तेव्हां असा ठराव झाला, कीं निराळा हिस्सा मागीतला असतां मृत्युपत्रांतील पहिले कलमाप्रमाणें १ घर दोनहजार रुपये रोख, व घरांतील कांहीं स्वयपाकाचीं भांडीं इतकें मिळेल.

पुनः सन १८२४सांत दुसरे भावानें सदरहू प्रमाणेंच फिर्याद केली; परंतु सुरतेचे जडूज जोन्स साहेब ह्यांनीं ही फिर्याद असे कारणावरून रद्द केली, कीं वादीचे बापाचे मृत्युपत्रावरून व सदरीं लिहिलेले हुकूमनाम्यांतील मजकुरावरून जिनगीची वांटणी होणार नाहीं.

---

मृत्युपत्रांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता. कार्तीक वद्य १ शुक्रवार संवत् १८६५ तारीख ४ माहे नवंबर सन १८०८ ते दिवशीं मी पारकर रतनजी मृत्युपत्र करितों ऐसाजे माझें वित्त ह्मणजे बागा, शेतें, घरें, गाडया, घोडे, गुरें, घरांतील सामान वगैरे जें ईश्वरानें मला दिलें आहे व जें मीं स्वकष्टानें मिळविलें आहे त्याचे माझे पुत्र खालीं लिहिलेल्या कलमां प्रमाणें वागल्यास त्या सर्वांस सारखे विभाग मिळतील, त्यांप्रमाणें त्यांनीं वागावें, न वागल्यास मीं त्यांस पातकी समजेन.

कलम ७ ह्यांतील मजकूर येणेंप्रमाणें.

माझा पुत्र **मेरवानजी** फार दुरव्यसनी आहे. तो माझे लिहिल्या प्रमाणें वागणार नाहीं. त्यानें वाईट कामांत बहुत द्रव्य उडविलें, व तो बतफेली झाला आहे. जो ऐवज मीं त्यास दिला तो त्याचे हिशेबीं मीं लिहिला आहे. त्याविषयीं मला फार काळजी वाटते. जें चांगलें नांव मिळविलें आहे तें नांव राखावें, असें माझे पुत्र **पुंजीभाई** व **दादाभाई** ह्यांचें लक्ष्य दिसतें; सबब ह्यापुढें त्यांनीं वखारीचें काम चालवावें, आणि हें काम चालविण्याकरितां मीं आपले जिनगीची वहिवाट त्यांकडे दिली आहे. जर **मेरवानजी** आपले भावांचें ऐकेल, खराब चाल सोडून देईल, माझे नावास काळिमा आणणार नाहीं, व आपले दोघे भाऊ चालतात त्या प्रमाणें चालेल, तर माझी जिनगी तिघांनीं सारखी वांटून घ्यावी. एकेभावाचा हिस्सा दुसरे भावाचे हिश्शाहून ज्यास्त असूनये; परंतु जर **मेरवानजी** आपले भावांचे ऐकणार नाहीं, दुर्व्यसन सोडणार नाहीं, आणि माझे जिनगीपैकीं आपला हिस्सा निराळा मागेल, तर **हाजी हुसेन** ह्यापासून घर विकत घेतलें आहे तें व रोख दोनहजार रुपये व स्वयंपाकाचे भांडयांपैकीं कांहीं भांडीं इतकेंमात्र त्याला द्यावें. इतकें घेतल्यावर त्यानें माझे घरापासून व घराण्यापासून विभक्त व्हावें. पुढें माझे जिनगीवर त्याचा आणखी बिलकुल दावा नाहीं.

मृत्युपत्राचे शेवटीं खालीं लिहिल्या प्रमाणें मजकूर होता.

ह्या मृत्युपत्रांत निरनिराळीं सात प्रकरणें लिहून मीं तें समाप्त केलें आहे. जो नावलौकीक मी मिळविला आहे तो लक्ष्यांत ठेवून माझे पुत्र **पुंजीभाई** व **दादाभाई** हे वखारीचें काम चालवितील. ह्या माझे दोन पुत्रांवर माझा भरवसा आहे. सबब मीं

जिनगीची वहिवाट व वखारीचें कामकाज करण्याची कुल मुखत्यारी त्यांकडे दिली आहे, व घरचा खर्च त्यांस योग्य दिसेल तसा त्यांनीं करावा. घरांत लग्न निघालें असतां खर्च समाईक करावा. तुह्मा तिघांभावांचें मन मिळून माझे इच्छेप्रमाणें व घराण्याचे लौकिकाप्रमाणें तुह्मीं एके ठिकाणीं सौरस्यानें जर रहाल तर मीं पूर्ण सुखी होईन, व ईश्वर तुमचें कल्याण करील. माझे भावाचा मुलगा **अरदेसर दादाभाई मुंबईत** रहातो. त्याकडे मीं सर्व कुटुंबाचा सांभाळ करण्याचें काम सोपलें आहे. ईश्वरापाशीं पदर पसरून माझें मागणें असें आहे, कीं त्यानें माझा व माझे मुलाबाळांचा नावलौकीक राखावा. **अरदेसर दोसाभाई** ह्यापाशीं माझी विनंती आहे, कीं त्यानें माझे कुटुंबाचा सांभाळ करावा. हें मृत्युपत्र मीं आपले स्वसंतोषानें व शुद्धींत असतां लिहून दिलें असे.

मृत्युपत्र करणाराचे स्त्रीयेस व बहिणीस काय द्यावें व धर्मास पैसा कोठून खर्च करावा व लग्नास व उत्तरकार्यास खर्च कोठून करावा वगैरे मजकूर बाकीचे मृत्युपत्रांत आहे.

---

## स्पेशल अपील नंबर २५०७.

अपिलेंट्

**जेटिंगा** वल्लद **जाना** महार

रिस्पोंडेंट्

**विठू** वल्लद **हैबती** महार.

दावा रुपये ५१०.

### ठराव.

महारकीच्या वतनाबाबद शेत व हक्क होते त्यापैकीं हिस्सा घेण्याकरितां ही फिर्याद झाली होती, तेव्हां अपिलांत जिल्हाजड्जानें

अशा कारणावरून दावा रद्द केला, कीं अशा प्रकारचे सर्व हक्क सन १८३९चा अकूट २० व सन १८४४चा अकूट १९ ह्यांवरून रद्द झाले आहेत, सबब अशाप्रकारचे फिर्यादींची चौकशी करण्याचा अखत्यार कोडतास आहे किंवा नाहीं ह्याबद्दल आह्मास अंदेशा आहे. स्पेशल अपिलांत **सद्र दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं जिल्हाजड्जानें जो अभिप्राय दिला, तो बरोबर नाहीं, कारण सन १८३९चा अकूट २० ह्यामुकद्दम्यास अगदीं लागू नाहीं, व तंट्यांतील हक्क गांवचे महारांस चाकरी बाबद दिलेले आहेत ते सन १८४४चा अकूट १९ ह्यावरून रद्द झाले नाहींत.

**अपिलेंट्** व त्याचा भाऊ **शेटी** ह्यांनीं फिर्याद केली, कीं **सोलापूर** जिल्ह्यांतील **मंद्रुप** परगण्यांत **कंदल** गावांतील महारकीचे वतनाचा हिस्सा देववावा. ह्या वतनाबाबद ४ रुक्के शेत आहे, त्यापैकीं तीन हिस्से ह्मणजे ३ रुक्के शेत आमचे घराण्यापैकीं दुसरे तिघे हिस्सेदारांचे आहे. बाकी १ हिस्सा राहिला त्यापैकीं निमे हिस्सा आमचा आहे. **रिस्पोंडेंट्** (प्रतिवादी) आमचे घराण्यांतील दासीपुत्र आहे; परंतु त्यास गांवचे पाटील व कुळकर्णी ह्यांचीफूस व मदत आहे, सबब तो आमचे वतनास हरकत करितो. सर्व वतनाबद्दल ३६ चाहूर शेत आहे, त्यापैकीं ९ चाहूर शेत आमचें व **मुरार नाईक** ह्याचें आहे. आमचे हिश्शास ४॥ चाहूर शेत येतें, परंतु आमचे कबजांत फक्त १$\frac{1}{8}$ चाहूर शेत आहे, त्यांत पावखंडी धान्य व १,००० कडबा उत्पन्न होतो. बाकीचें ३$\frac{1}{8}$ चाहूर शेत परत मिळण्याकरितां रुपये ५१०ची ह्मणजे सदरहू शेताचे एकसालचे उत्पन्नाचे दसपटीची आह्मी ही फिर्याद केली आहे. **रिस्पोंडेंट्** ह्मणजे प्रतिवादी ह्यानें जबाब दिला, कीं

तारीख २८ माहे सेपटेंबर सन १८५०.

मी दासीपुत्र आहे अशी वादीची तकरार आहे ती खरी नाहीं, व वतनापैकीं तंटयांतील हिस्सा माझा वंशपरंपरेचा आहे.

सोलापुरचे सदर अमिनानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून अपिलेंट् व त्याचा भाऊ ह्यांचे वतीनें निवाडा केला, कीं रिस्पों डेंट् हा दासीपुत्र आहे, असें शाबीत झालें आहे, सबब वतनापैकीं हिस्सा मिळण्या विषयीं त्यास हक्क नाहीं. सोलापुरचे अक्टिंग जड्जानें अपिलांत ठराव केला, कीं रिस्पोंडेंट् हा दासीपुत्र आहे, असा तर पुरावा होत नाहीं; परंतु वतनाचे हक्कांपैकीं हिस्सा मिळण्यास त्यास हक्क आहे, व पुष्कल वर्षे त्यानें हिस्सा घेतला आहे असा मात्र उलटा पुरावा होतो, व सर्व गोष्टींचा विचार करून पहातां अपिलेंटाचे पुराव्यापेक्षां रिस्पोंडेंटाचा पुरावा मजबूत दिसतो, व ह्यांत अपिलेंटाचे पुराव्यापेक्षां फरक थोडा आहे, ह्याकारणास्तव प्रिन्सिपाल सदरअमीन ह्याचा निवाडा रद्द असे. आणखी त्यानें असें लिहिलें, कीं सन १८३९चा अक्ट २० व सन १८४४ चा अक्ट १९ ह्यांवरून सर्व हक्क रद्द झाले आहेत. ह्याकरितां अशा हक्कांबाबद फिर्यादींची चौकशी करण्याचा अख्त्यार कोडतास आहे किंवा नाहीं, ह्याबाबद आह्मास अंदेशा आहे; कारण अशा फिर्यादींचे फैसले केले असतां जे लोक सदरहू हक्क घेण्याबाबद दावा सांगतात त्यांस सदरहू हक्क घेतजावा असा अख्त्यार दिल्यासारखें होईल, व अशा फिर्यादी बाबद निवाडे अमलांत आले असतां सदरीं लिहिलेले अक्ट रद्द केल्या प्रमाणें होईल.

नंतर अपिलेंट् जेटिंगा वल्लद जाना ह्यानें स्पेशल अपील केलें, तेव्हां ज्या हक्कांबाबद ही फिर्याद आहे ते हक्क रद्द झाले नाहींत, व अक्टिंग जड्जा- सिमसन साहेब.

नें लिहिलेले अकूट ह्यामुकद्दम्यास लागू नाहींत, ह्याकारणावरून अपील मंजूर झालें. हा खटला **वार्डिन साहेबांकडे** सुनावणीस आला, तेव्हां त्यांनीं कायदा लागू करण्यांत सदरीं लिहिलेली चूक झाली आहे ती दुरस्त होण्या करितां मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला.

वार्डिन साहेब व लिजिट् साहेब व ग्रांट साहेब.

फुलकोडतानें चौकशी करून ठराव केला, कीं सन १८४४चा अकूट १९ ह्याचा अर्थ जिल्हाजड्जानें बरोबर केला नाहीं, ह्मणून **सिमसन** साहेबांनीं अपील मंजूर करतेवेळेस जो अभिप्राय दिला आहे तो बरोबर आहे, कारण ज्या वतनी हक्कांबावद ही फिर्याद आहे, ते हक्क शेत व नेमणूकमिळून आहेत, व ते गांवचे महारांस चाकरी बावद दिलेले आहेत. महारांच्या अगर बलुतेदारांच्या गांवच्या नेमणुकांस सन १८४४चा अकूट १९ लागू नाहीं, तर सदरहू बलुत्यांवर मागें कर घेत असत त्याकरांस लागू आहे. आतां हा भेद दक्षिणेंतील गांवांची चाल कशी असते हें ज्या लोकांस माहीत नाहीं, त्यांनीं लक्ष्यांत ठेविला पाहिजे. तंटच्यांतील हक्कांस सन १८३९-चा अकूट २० बिलकूल लागू नाहीं, व ह्या मुकद्दम्यास जो कायदा जिल्हाजड्जानें लागू केला आहे, त्या कायद्यावरून त्यानें आपले अभिप्रायास किती बळकटी धरली आहे हें दिसत नाहीं. ह्या सर्व कारणांवरून जिल्हाजड्जाचा हुकूमनामा रद्द केला आहे, व सन १८४४चा अकूट १९ ह्याकडे लक्ष्य न देतां मुकद्दम्याचे गुण दोष पाहून चौकशी करण्याकरितां तो कनिष्ट कोडताकडे परत पाठविला आहे. **सदर दिवाणी अदालतींत** जो खर्च झाला आहे त्याबद्दल ठराव नवीन हुकूमनामा करते समयीं जिल्हाजड्जानें करावा.

## स्पेशल अपील नंबर २५१५.

अपिलेंट्

**बापूजी विश्वनाथ.**

रिस्पोंडेंट्

**अंताजी बापूजी.**

दावा रुपये ४३६६६८.

### ठराव.

कोणी एक गृहस्थ कालीकडील अंमलदारास जामीन झाला होता, त्या जामिनकीबाबद त्याला कांहीं रुपये सरकारांत भरावे लागले. त्या रकमेचें व्याज घेण्याकरितां त्यानें सदरहू अंमलदारावर फिर्याद केली. अपिलांत **रत्नागिरीचे सिनियर** असिष्टन् जड्जानें ठराव केला, कीं सदरहू फिर्याद नुकसानीबद्दल समजली पाहिजे, व फिर्यादीचें कारण उत्पन्न झाल्यावर सातवर्षे पावेतों वादीनें फिर्याद केली नाहीं; ह्यास्तव मुदतीचें कायद्याप्रमाणें ही फिर्याद चालावयाची नाहीं. स्पेशल अपिलांत ठराव झाला, कीं सदरहू फिर्याद लेखी दस्तैवजावरून ह्मणजे जामीनकदब्यावरून आहे, सबब सन १८२७चा कायदा ५ कलम ४ ह्यांत लिहिलेल्या प्रकारची ही फिर्याद आहे, ह्मणजे ती बारावर्षे पावेतों चालेल.

ता० २८ सपटेंबर सन १८५०

कोंकणजिल्ह्यांत **रत्नागिरीचे** सदरअमीनाचे कोडतांत **अपिलेंटानें** फिर्याद केली, कीं **रिस्पोंडेंट्** (प्रतिवादी) ह्याबद्दल सरकारानें मजपासून कांहीं रुपये घेतले. त्या रुपयांचें व्याज रुपये ४४८५६९ प्रतिवादी कडून देववावें. **रिस्पोंडेंट्** हा सरकारचा माहालकरी होता, आणि त्यास मी जामीन झालों होतों.

ग्यानें सरकारचा महसूल वसूल केला नाहीं, सबब मला रुपये ७९६८४८१ सरकारांत भरावे लागले. सदरहू ऐवज पुढें वसूल करून **रिस्पांडेंटानें** मला दिला, परंतु तो व्याजदेत नाहीं; सबब मीं ही फिर्याद केली आहे. **रिस्पांडेंटानें** जबाब दिला, कीं मुदतीचे कायद्याप्रमाणें ही फिर्याद चालावयाची नाहीं, आणि व्याज मिळण्याविषयीं **अपिलेंटास** हक्क असल्यास त्यानें सरकारापाशीं व्याज मागावें, कारण ज्या जामीनकदब्यावरून तो ही फिर्याद करितो त्या कदब्यावरून तो मजविषयीं मात्र जबाबदार होता, परंतु रयतेकडे सरकारचा महसूल येणें राहिल्यास त्या महसुलाबाबद जबाबदार नव्हता.

सदर अमिनानें निवाडा केला, कीं **रिस्पांडेंट्** ह्याकडून महसूल वसूल करण्यांत तफावत झाल्यास त्याबद्दलची जबाबदारी **अपिलेंटावर** होती, हें जामीनकदब्यावरून स्पष्ट होतें, व **रिस्पांडेंट्** ह्यानें जामीनकदबा कबूल केला आहे व त्यानें ज्यावेळेस व्याजाचा दावा कबूल केला त्या वेळेवरून सन १८२७चा कायदा ५ कलम ७ रकम १ हींत सांगितलेल्या मुदतीच्या आंत ही फिर्याद येते, सबब व्याजाबद्दल रुपये ४३८६६८. **रिस्पांडेंटानें** **अपिलेंटास** द्यावें.

नंतर कोंकणांतील **रत्नागिरीचे सिनियर** असिष्टन् जड्जाचे कोडतांत **रिस्पांडेंटानें** अपिलांत तकरार दिली, कीं ह्या फिर्यादीस लेखी दस्तैवजाचा आधार नाहीं, सबब ती कायद्यास विरुद्ध आहे, व व्याजाबाबद माझी कबुलायत सदर अमिनानें जमा धरली आहे; परंतु ती कबुलायत कोडतांत चालण्याकरितां ५वे कायद्याप्रमाणें लेखी असली पाहिजे. तेव्हां **सिनियर** असिष्टन् जड्जानें चौकशी करून ठराव केला, कीं **अपिलेंटानें**

वहींतील उतारे पूराव्यास दिले आहेत, त्यांवरून साफ दिसतें, कीं **अपिलेंटास** ऐवज दोन सवादोन वर्षेपर्यंत मिळाला नाहीं, आणि इतके वर्षांचे त्याचें व्याज बुडालें. आतां त्यास व्याज मिळावें ही गोष्ट न्याय्य आहे, पण फिर्यादीचें कारण उत्पन्न झाल्यापासून सातवर्षे पावेतों त्यानें फिर्याद केली नाहीं, व हिशेबांतील उतारे व जामीनकतबा ह्यांस लेखी कबुलायतीप्रमाणें मोजतां येत नाहीं, ह्मणून बारावर्षांचे मुदतीचे आंत ही फिर्याद येत नाहीं. व्याजाबद्दल दावा **रिस्पांडेंटानें** कबूल केला होता असें शाबीत करण्यास लेखी पुरावा नाहीं, व अशा कबुलायतीची शाबीती ५वे कायद्यावरून फक्त साक्षीदारांनीं होत नाहीं. सबब सन १८२७चा कायदा ५ कलम ३ रकम १ हींत लिहिलेल्या प्रकारची ही फिर्याद नुकसानीबद्दल समजली पाहिजे, व ती साहावर्षांचे आंत करावयास पाहिजे होती. सदरहू कारणांवरून सदर अमीन ह्याचा हुकूमनामा रद्द करून खर्च **अपिलेंटावर** घातला असें.

नंतर **अपिलेंटानें सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील मंजूर होण्याकरितां अर्जी केली. तींत त्यानें असें लिहिलें, कीं **रिस्पांडेंट** ह्यास मी जामीन होऊन जामीनकतबा सरकारास लिहून दिला. त्या जामीनकतब्यावरून मी १२ वर्षे पावेतों जबाबदार आहें. तेव्हां **बेल** साहेबांनीं ( सिटिंगजज ) अपील मंजूर करतांना असें लिहिलें, कीं **अपिलेंटानें** सरकारास जो जामीनकतबा लिहून दिला आहे त्यावरून तो १२ वर्षे पर्यंत जबाबदार आहे. त्यास जामिनाची फिर्याद तो ज्याला जामीन झाला असेल त्यावर जामीनकतब्यावरून १२ वर्षे पर्यंत चालेल किंवा साहा वर्षे पर्यंत चालेल, ह्या गोष्टीचा हल्लीं विचार

करणें आहे. आतां ह्या प्रकरणी कोंडताचे दसरा दाखला नाही, ह्याकरितां ह्याचा निर्णय करणें अवश्य आहे, ह्मणून अपील मंजूर केलें असे.

प्रथम चौकशी करणारे जड्जानें मुकद्दम्याची चौकशी करून अभिप्राय दिला, कीं सिनियर आसिष्टन् जड्जाचे मत्ताप्रमाणें आमचें मत्त आहे; परंतु ज्या बाबतींत दाखले नाहींत त्याबाबतीबद्दल विचार होऊन ठराव व्हावा ह्मणून स्पेशल अपील मंजूर झालें आहे; ह्याकरितां

वार्डिन साहेब.

मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें ठराव केला, कीं सदरहू फिर्याद दस्तऐवजावरून ह्मणजे जामीनकतब्यावरून आहे, सबब तीं सन १८२७चा कायदा ५ कलम ४ ह्यांत लिहिलेल्याप्रकारची आहे, नुकसानीबाबद नाहीं. ह्याकारणावरून सिनियर असिष्टन् जड्जाचा हुकूमनामा रद्द करून खर्च रिस्पोंडेंट् ह्यावर घातला असे.

वार्डिन साहेब; लाजट् साहेब व ग्राट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २६६३.

अपिलेंट्

**नाना तुळजाराम** मयत, ह्याचे वारस **गिरधरलाल सुंदरलाल** व **ब्रिजलाल**, पैकीं **गिरधरलाल सुंदरलाल** मयत.

रिस्पोंडेंट्

**वल्लभदास राजाराम.**

दावा रुपये २००.

**ठराव.**

कांहीं मालावरील जप्ती उठविण्याविषयीं गहाणखतावरून

फिर्याद झाली. त्या फिर्यादींत अव्वल कोडतानें व अपील झाल्या-वर जिल्हाजड्जानें असा ठराव केला, कीं जप्तींतील माल दोघे भावांचा आहे व ते दोघेभाऊ विभक्त नाहींत, आणि त्यांतून एके-भावानें कर्ज केलें, तें ह्या मालमत्तेसाठीं केलें नाहीं, सबब एकानें केलेल्या कर्जाचे फेडीस ही मालमत्ता लावतां येत नाहीं, ह्याकरितां मालावर बसविलेली जप्ती बरोबर नाहीं. पुढें सदर दिवाणी अ-दालतींत स्पेशल अपील झालें, तेव्हां असा ठराव झाला, कीं कनिष्ट कोडतांनीं ज्या कारणावरून जप्ती उठविली त्याचा व फिर्यादींतील मजकुराचा आगदीं संबंध नाहीं, आणि अशा कारणावरून त्या कोडतांस ठराव करण्याचा अखत्यार नाहीं, सबब त्यांचे ठराव रद्द केले आहेत.

कांहीं मालावरील जप्ती उठविण्याविषयीं वादी बल्लभदास राजाराम ह्यानें ही फिर्याद केली. ती अशी, कीं जप्तींतील माल नारो बापूजी ह्यानें प्रथम गणेशपंत जोग ह्यापाशीं गहाण ठेविला. नंतर तो माल गणेशपंत जोग ह्यानें माझे पाशीं गहाण ठेविला, सबब जप्ती दूर व्हावी.

तारीख २८ माहे सप्तंबर सन १८५०.

नाना तुळजाराम मयत, ह्याचे वारस अपिलेंट गिरधरलाल सुंदरलाल (हल्लीं मयत) व ब्रिजलाल ह्या दोघांनीं प्रतिवादी ह्मणून जाब दिला, कीं जप्तींतील माल नारो बापूजी ह्याचा वडील भाऊ वामन बापुजी ह्याचा आहे, व वामन बापूजी ह्यावर कर्जाबद्दल अमचा हुकूमनामा होऊन हा माल त्याचे कबज्यांत असतां त्या हुकूमनाम्यावरून जप्त झाला आहे, सबब जप्ती कायम रहावी.

अहंमदनगर एथील मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी

करून अभिप्राय दिला, कीं वादी **वल्लभदास राजाराम** ह्याकडे तंटयांतील माल गहाण आहे, असें शाबीत झालें व तो माल त्याचे कबज्यांत आहे; परंतु तो **वामन बापूजी** व **नारो बापूजी** ह्यांचा समाईक आहे, असें चौकशी करतेसमयीं नजरेस आल्यावरून **अदालतीचे** शास्त्री ह्यांस त्याबद्दल सवाल केला. त्यांनीं त्याचा जबाब दिला, कीं जर मिळकत समाईक असेल आणि एका भावानें केलेलें कर्ज त्या मिळकतीबद्दल नसेल तर ती मिळकत त्या कर्जाचे फेडीस लावतां येत नाहीं. ह्यावरून मुनसफानें जप्ती उठवावी ह्मणून ठराव केला.

पुढें अपील झालें, तेव्हां जिल्हाजड्जानें मुनसफाचा ठराव कायम केला आणि असें लिहिलें, कीं तंटयांतील माल अविभक्त कुटुंबाचा आहे एवढ्या गोष्टीनें पहिलें गहाणखत जरी नामंजूर झालें नाहीं, तरी दुसरें गहाणखत चालावयाचें नाहीं, कारण जी मिळकत एकानें गहाण ठेवली, ती मिळकत त्यास दुसऱ्याकडे गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं.

नंतर **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील घेण्याविषयीं अर्जी झाली. तेव्हां ज्या गहाणखतावरून जप्ती उठविण्याविषयीं फिर्याद झाली तें गहाणखत कोडतांत चालणार नाहीं, ह्मणून ठराव झाला असून जप्ती दूर करण्याविषयीं हुकुमनामा होतो; आणि ज्या कारणावरून तो हुकूमनामा होतो त्या कारणाचा सदरहू गहाणखत कोडतांत चालेल किंवा न चालेल ह्या गोष्टीकडे संबंध नाहीं, त्यास अशा प्रकारचा हुकूमनामा कायद्यास व वहिवाटीस अनुसरून आहे किंवा कसें हें ठरविण्याकरितां **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील मंजूर झालें.

वार्डिन साहेब.

पुढें ह्या मुकद्दम्याची चौकशी **बेल साहेब** ह्यांनीं करून आपला अभिप्राय दिला, कीं जप्ती उठविण्याचा जो हुकूमनामा झाला आहे, तो सर्टिफिकिटांत लिहिलेल्या कारणावरून कायद्यास व वहिवाटीस विरुद्ध आहे, सबब हा मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे.

कोडताचे नजरेस असें आलें, कीं गहाणखतावरून ही फिर्याद जप्ती उठविण्याविषयीं झाली आहे, आणि तें गहाणखत कोडतांत चालणार नाहीं, ह्मणून ठराव झाला आहे, असें असून दोन्ही कोडतांनीं जप्ती दूर करण्याविषयीं हुकूमनामे केले; आणि ज्या कारणावरून हुकूमनामे केले त्याचा व फिर्यादींतील मजकूर ह्याचा अगदीं संबंध नाहीं; आणि कोडतांस अशा कारणा वरून ठराव करण्याचा अधिकार बिलकूल नाहीं. तें कारण असें, कीं अव्वल कोडतांतील प्रतिवादी ह्मणजे हल्लींचे **अपिलेंट्** ह्यांनीं जी जप्ती बसविली ती बरोबर नाहीं.

वार्डिन साहेब, लिजिट साहेब व ग्रांट साहेब.

सदरीं लिहिलेल्या सबबेवरून कनिष्ठ कोडतांचे हुकूमनामे रद्द झाले.

---

## स्पेशल अपील नंबर २७२७.

अपिलेंट्

**बाळपा नाईक रांजणे कर.**

रिस्पोंडेंट्

**अंताजी विरूपाक्ष** (हा मयत) ह्याचा वारस पुत्र

**आबाजी अनंत.**

दावा रुपये ८,२३६६१२६२.

## ठराव.

एका मनुष्याच्या नांवचा दस्तऐवज होता, तो त्यानें दुसऱ्या मनुष्यास दिला; त्या दुसऱ्या मनुष्यानें त्या दस्तऐवजावरून पैसा मिळण्याविषयीं फिर्याद केली. त्या फिर्यादीची चौकशी नेटीव जडूजानें करून वादीचे वतीनें निवाडा केला; परंतु अपिलांत तो निवाडा युरोपियन जडूजानें असे कारणावरून रद्द केला, कीं ज्या मनुष्याचे नांवाचा दस्तऐवज आहे त्यासमात्र त्या दस्तऐवजावरून फिर्याद करण्याचा अधिकार आहे. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां असा ठराव झाला, कीं कोणी मनुष्यानें आपला हक्क दुसऱ्यास दिला असतां ती गोष्ट सरकारास कबूल आहे.

**अपिलेंटानें** (वादीनें) व्याजमुद्दलासुद्धां १७,५९१ रुपये ८ आणे घेण्याकरितां ही फिर्याद केली. त्यानें आपले अर्जीत मजकूर लिहिला होता, कीं **रिस्पोंडेंट्** (प्रतिवादी) ह्यानें १४,६२५ रुपयांचें हप्तेबंदीचें खत **द्वारकादासा**स लिहून दिलें, आणि त्यांचे फेडीस कांहीं इनाम गांवचें उत्पन्न लावून दिलें. पुढें त्या खताचा पैसा वसूल करण्याकरितां मुखत्यारनामा **द्वारकादास** ह्यानें मला करून दिला. त्यावरून मीं ही फिर्याद केली आहे, व त्यानें आणखी असें लिहिलें होतें, कीं सदरहू कर्जापैकीं इनाम गांवाकडून ४,७६० रुपये पावले आहेत; ह्याकारितां मुदलापैकीं ९,८६५ रुपये व व्याजाबद्दल १०,९८४६४ एकूण रुपये २०,८४९६४ ह्मणजे सुरती रुपये १७,५९१६८ येणें आहेत ते देववावे.

ता० २३ डिसेंबर सन १८५०.

**रिस्पोंडेंटानें** जबाब दिला, कीं कर्जापेक्षां जास्ती **अपिलेंटा**स गांवचे उत्पन्नांतून पैसा पोहंचला आहे, आणि जरी असें झा-

लें नसलें तरी फिर्याद करण्याचा अधिकार **द्वारकादास** ह्यासच आहे, कारण ज्या दस्तऐवजावरून फिर्याद झाली आहे, तो दस्तऐवज त्याचे नांवचा आहे, आणि सदरहू दस्तऐवज व **द्वारकादास** ह्यानें **अपिलेंटास** लिहून दिलेला मुखत्यारनामा हे दोन्ही साधे कागदावर आहेत सबब ते कोडतानें मंजूर धरूं नयेत.

**धारवाड** जिल्ह्यांतील प्रिन्सिपाल सदर अमीन ह्यानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून अभिप्राय दिला, कीं कर्जाबद्दल शाबिती झाली, पण **अपिलेंटानें** हजर केलेला मुखत्यारनामा साधेकागदावर असल्यामुळें कोडतांत चालणार नाहीं, सबब तो नामंजूर आहे; परंतु **द्वारकादास** ह्यास पोलिटिकल येजेंट साहिबाचे मार्फत सदरहू मुखत्यारनाम्याविषयीं जे सवाल घातले त्या सवालांचे जबाबांवरून असें पुरतेपणीं शाबीत होतें, कीं सदरीं लिहिलेल्या दस्तऐवजाचा पैसा मिळण्याविषयीं फिर्याद करण्यास **द्वारकादास** ह्यानें **अपिलेंटास** पुरा अधिकार दिला आहे. ह्याप्रमाणें अभिप्राय देऊन प्रिन्सिपाल सदरअमीन ह्यानें **अपिलेंटाचे** वतीनें हुकूमनामा केला. त्या हुकूमनाम्यांत त्यानें **अपिलेंटास** मुद्दलाबद्दल रुपये ८,२३६८१२८२ मिळण्याचा ठराव करून सन १८३९चा अक्ट नंबर ३२ ह्यावरून व्याजाबद्दल **अपिलेंटाचा** दावा नामंजूर केला.

सदरहू ठरावावर **रिस्पोंडेंट्** ( प्रतिवादी ) ह्यानें **धारवाड** जिल्ह्यांतील जड्जाचे कोडतांत अपील अर्जी करून तींत जास्ती तकरार अशी लिहिली, कीं मुद्दतीचे कायद्यावरून ही फिर्याद चालण्यास हरकत आहे. ह्या तकरारीविषयीं सदरहू जड्जाचे नजरेस असें आलें, कीं ही फिर्याद चालण्यास हरकत नाहीं, कारण जर दस्तऐवज चालण्या सारखा समजला तर त्या दस्तऐवजांतील

शेवटले हप्त्यावरून ही फिर्याद मुद्दतीचे आंत येते, व जड्जानें आणखी असें लिहिलें, कीं दस्तऐवज **आपिलेंटाचे** नांवानें झालेला नाहीं, **द्वारकादास** ह्याचे नांवानें झाला आहे; आणि **द्वारकादास** ह्यानें तो दस्तऐवज **आपिलेंटास** वेचन दिला नाहीं, तेव्हां अशा दस्तऐवजावरून **आपिलेंटास** फिर्याद करण्याचा अधिकार नाहीं हें उघड आहे, आणि ह्याकरितां ही तकरार मुद्दतीचे तकरारीपेक्षां बलवत्तर आहे. हीवरून **आपिलेंटाची** फिर्याद चालण्यास हरकत येते, परंतु जड्जानें अशा प्रकारची फिर्याद मंजूर झाल्याबद्दल दाखले हजर करण्याकरितां **आपिलेंटास** दोन महिन्यांची मुद्दत दिली.

पूर्वी **सदर दिवाणी अदालतीनें** स्पेशल अपील नंबर २२४८ ह्यांत तारीख २१ माहे ज्यानेवारी सन १८४८ इसवी रोजीं निवाडा केला, कीं दोघांचे नांवचें खत असतां त्यांतून एकानें दुसऱ्यास मुख्त्यारनामा दिला असल्यास त्याला फिर्याद करण्यास हरकत नाहीं. हा निवाडा **आपिलेंटानें** आपल्या मुकद्दम्यांत दाखल केला. त्याविषयीं जड्जानें असें लिहिलें, कीं ज्या मुकद्दम्यांतील हा निवाडा **आपिलेंटानें** प्रत्यंतरास दिला आहे, तो मुकद्दमा व हल्लींचा मुकद्दमा हे सजातीय नाहींत; कारण प्रत्यंतराचे मुकद्दम्यांत ज्यानें स्पेशल अपील केलें त्याचें नांव व दुसऱ्याचें नांव खतांत दाखल होतें, आणि हल्लींचे मुकद्दम्यांत फक्त **द्वारकादास** ह्याचेंच नांव खतांत दाखल आहे, व दुसरें असें, कीं खत कमी किंमतीचे स्टांपावर असल्यामुळें तें जड्जास नामंजूर करण्याचा अख्त्यार नाहीं, इतक्याच गोष्टीबद्दल त्या वेळेस **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला आहे, सबब प्रत्यंतरास दिलेला निवाडा ह्या मुकद्दम्यास लागू नाहीं. आणखी जड्जानें असें

लिहिलें, कीं **आपिलेंट** ह्मणतो, कीं फिर्याद होण्याचे पूर्वी **द्वारकादासानें** मला साधे कागदावर मुखून्त्यारनामा लिहून दिला होता; परंतु त्याचा उपयोग फिर्यादीचेसमयीं मजकडून झाला नाहीं. त्यास जर त्या मुखून्त्यारनाम्याचा उपयोग **अपिलेंटाकडून** त्या वेळेस झाला नाहीं, तर हल्लींही होणार नाहीं, हें खचित आहे. **अपिलेंट** आणखी असें ह्मणतो, कीं ह्यामुकद्दम्यांत जो दोष आहे, तो वारसास नोटीस दिली असतां जाईल, परंतु कोडताचा अभिप्राय तसा नाहीं. कोडताचे नजरेस असें येतें; कीं ज्या मनुष्याचे नावें खत झालें आहे; त्यास मात्र त्या खतावरून फिर्याद करण्याचा अधिकार आहे, आणि ही गोष्ट **अपिलेंटाला** त्यानें तारीख २५ माहे जून सन १८४७चा **द्वारकादासाचा** मुख्त्यारनामा हजर केला तेव्हां माहीत होती; परंतु तारीख २ माहे अप्रेल सन १८४७ इसवी रोजीं **रिस्पोडेंटानें अपिलेंटास** फिर्याद करण्याचा अधिकार नाहीं, अशी तकरार केल्यानंतर मुखून्त्यारनामा झाला, तोंपावेतों झाला नव्हता. तेव्हां ह्यावरून स्पष्ट होतें, कीं ज्यावेळेस **अपिलेंटानें** फिर्याद केली त्या वेळेस त्यास फिर्यादकरण्याचा अधिकार नव्हता. मुकद्दमा सुनावणीकरितां तयार होतांक्षणींच प्रिन्सिपाल सदर अमिनानें फिर्याद काढून टाकावयाची होती, आणि त्यानें फिर्याद फैलावर चढविल्या नंतर **अपिलेंटास** फिर्याद करण्याबद्दलचा मुखून्त्यारनामा दाखल करण्याकरितां नऊ महिन्यांची सवड द्यावयाची नव्हती. ह्याप्रमाणें जड्जानें अभिप्राय देऊन प्रिन्सिपाल सदर अमीन ह्याचा हुकूमनामा रद्द केला, आणि **अपिलेंटाचा** दावा नामंजूर करून सर्व खर्च त्यावर घातला.

एका मनुष्याचे नावानें गहाणखत झालें आहे; त्यानें त्यावरी-

ले आपला दावा सोडून त्या मनुष्याचें नुकसान होत होतें, त्यासं त्या खतांतील ऐवज फिर्याद करून वसूल करून घेण्याकरितां मुखून्यारनामा लिहून देऊन तें खत त्याचे हवाली केलें, तेव्हां त्या गहाणखतावरून फिर्याद झालीअसतां ती रद्द करणें हें कायद्यास व वहिवाटीस अनुसरून आहे किंवा कसें, व जी फिर्याद लागू करण्याकरितां मुखून्यारनामा लिहून दिला, ती फिर्याद झाल्यावर तो लिहिला आहे, तेव्हां असा मुखून्यारनामा कोडतांत मंजूर धरावा किंवा कसें, ह्या दोन कलमांचा ठराव होण्याकरितां **वार्डिन** साहेबांनीं **सदर दिवाणी अदालतींत अपिलेंटाच्या** अर्जीवरून स्पेशल अपील मंजूर केलें. **बेल** साहेब ह्यांनीं ह्या मुकद्दम्याची प्रथम चौकशी केली, आणि हा मुकद्दमा चौकशीकरितां जिल्हे जड्जाकडे परत पाठवावा, ह्या हेतूनें त्यांनीं तो फुलकोडताकडे पाठविला, कारण त्यांचे नजरेस असें आलें, कीं जर कोणी मनुष्य आपला दावा तिऱ्हाइतास देईल, तर ही गोष्ट सरकारास कबूल आहे, आणि फिर्याद झाली तेव्हां **अपिलेंटानें** मुखून्यारनामा हजर न केल्या मुळें जो गैरशिस्तपणा झाला तो पुढें प्रिन्सिपाल सदर अमीन ह्यानें मुखून्यारनामा घेतल्यावरून नाहींसा झाला.

हा अभिप्राय फुलकोडतानें कबूल करून त्याप्रमाणें मुकद्दमा चौकशीकरितां जिल्हे जड्जाकडे परत पाठविला, आणि त्यास लिहिलें, कीं नवीन हुकूमनामा करून त्यांत **सदर दिवाणी अदालतींत** झालेल्या खर्चाची हिस्सेरशी ठरवावी.

बेल साहेब, वार्डिन साहेब व लिजिट् साहेब.

## स्पेशल अपील नंबर २४९८.

अपिलेंट्

**नैनसुख** व त्याचा पुत्र **सुबराम** हे दोघे मयत, **सुबरामा-ची** वारस **रखमाबाई**, त्याची बायको.

रिस्पोंडेंट्

**नवलजी** वल्लद **रोहिदास.**

दावा रुपये ४९४६५.

### ठराव.

खातें ह्मणजे चालता हिशेब, ह्यास छापविण्याची गरज नाहीं.

तारीख १७ माहे सप्तंबर सन १८५०.

**सुबराम** ह्यानें ही फिर्याद **सोलापूर** एथें सदर अमिनाचे कोडतांत केली, कीं प्रतिवादी **नवलजी** वल्लद **रोहिदास** ह्याचें व माझा बाप **नैनसुख** ह्याचें देणें घेणें होतें, त्याबद्दल खातेबाकीवरून रुपये ४९४६५ येणें निघतात ते मला देववावे.

प्रतिवादीनें जाब दिला, कीं ज्या खात्यावरून वादीनें दावा केला आहे तें खातें बनावू आहे, आणि तें बनावू जरी नसलें तरी वादी ह्यास वारसपणाचें सर्टिफिकिट् घेतल्यावांचून फिर्याद करण्याचा अधिकार नाहीं.

सदर अमिनानें निवाडा केला, कीं ज्या दुकानाचें हें कर्ज आहे, तें दुकान **नैनसुख सुबराम** ह्याचें नावानें चालत होतें, व फिर्याद झाली त्या तारखेस तें दुकान वादी **सुबराम** ह्याकडे होतें, आणि खात्यांत जेथें बाकी काढली आहे, तेथें प्रतिवादी **नवलजी** ह्याची सही आहे, ह्या तीन गोष्टींविषयीं पुरावा झाला आहे, ह्याकरितां वादीचा दावा शाबीत आहे. आणखी सदर अमिनानें

असें लिहिलें, कीं **सुबराम** ह्यास आपले बापाचे मालमत्तेविषयीं वारसपणाचें सर्टिफिकिट्‌ घेण्याची जरूर नाहीं.

पुढें **नवलजी** ह्यानें सदरहू ठरावावर जिल्हा जडूजाचे कोडतांत अपील केलें, कीं खातें माझे हातचें नाहीं. **सुबराम** ह्याचे हातचें आहे, तेव्हां त्यानें पाहिजे तें त्यांत लिहून ठेविलें असेल. सदरहू खात्यावर माझी सही नाहीं व मीं साक्षीही घालविल्या नाहींत. ज्या साक्षी त्यावर आहेत, त्या **सुबराम** ह्याचे चाकरांच्या आहेत, आणि ही फिर्याद साहा वर्षांचे मुद्दतीचे आंत आणण्याकरितां सदरहू लिहिलेली देवघेव झाल्यावर पांच वर्षांनीं वादीनें खात्यावर सही केली आहे.

जिल्हे जडूजानें अपिलाचा फैसला करतेसमयीं अभिप्राय दिला, कीं खात्यावर सही व साक्षी आहेत; परंतु जर देवघेव खरोखरी झाली असेल, तर वादीस **नवलजी**कडून छापील कागदावर खत लिहून घेण्यास काय अशक्य होतें, कारण खात्यावर सही घालण्यास जो राजी आहे तो खत करून देण्यास कांहीं हरकत सांगता ना. तेव्हां अशा प्रकारचे दस्तऐवज छापविल्यावांचून कोडतांत मंजूर धरतां येत नाहींत. ह्याप्रमाणें अभिप्राय देऊन जिल्हे जड्जानें खात्यावरील सही **नवलजी** ह्याची आहे किंवा नाहीं, ह्याविषयीं चौकशी न करितां सदर अमिन ह्याचा हुकूमनामा रद्द केला.

पुढें **सुबरामा**ची बायको **रखमाबाई** हिनें अर्जी केल्यावरून **शिमसन्‌** साहेबांनीं स्पेशल अपील घेतलें, आणि घेण्यास असें कारण लाविलें, कीं खातें न छापविल्यामुळें तें नामंजूर करणें हें मामूल वहिवाटीस विरुद्ध आहे. देशचाल अशी आहे, कीं ज्याचे

ऱ्या ह्मणजे तें खातें मंजूर धरतात, ऱ्यास्ती पुरावा लागत नाहीं; आणि ह्या मुकद्दम्यांतील खात्यावर सही व साक्षी ह्या दोन्ही आहेत, सबब जिल्हे जडूजानें हें खातें मंजूर धरावयाचें होतें.

प्रथम चौकशी करणारे जडूज **वार्डिन** साहेब ह्यांनीं सदरहू अभिप्राय कबूल करून सर्टिफिकिटांत लिहिल्याप्रमाणें ह्या मुकद्दम्याची तजवीज व्हावी ह्मणून तो फुलकोडताकडे पाठविला. फुलकोडतानेंही तो अभिप्राय कबूल करून जिल्हे जडूजाचा हुकूमनामा रद्द केला, आणि **शिमसन्** साहेब ह्यांनीं लिहिल्याप्रमाणें तजवीज होण्याकरितां फुलकोडतानें जिल्हे जडूजाकडे मुकद्दमा परत पाठवून ऱ्यास लिहिलें, कीं नवीन हुकूमनामा करून **सदर दिवाणी अदालतींत** झालेल्या खर्चाबद्दल ठराव ऱ्यांत करावा.

वार्डिन साहेब,
लिजिट् साहेब,
व ग्रांट् साहेब.

---

## स्पेशल अपिल नंबर २५११.

अपिलेंट्

**माणिकचंद आत्माराम.**

रिस्पोंडेंट्

**पितांबर बेचर.**

दावा रुपये ७५.

### ठराव.

एका मनुष्यानें दुसऱ्याची कांहीं जागा साधून घेतली, ती परत मिळण्याविषयीं दुसऱ्या मनुष्यानें फिर्याद केली होती. ऱ्या फिर्यादींत जिल्हे जडूजानें कनिष्ट कोडतांचे निवाडे रद्द करून वादीचे वतीनें निवाडा अशाकारणावरून केला, कीं **अमदाबाद**

शहरातील लोकांच्या वहिवाटीप्रमाणें घराचे पाख्याच्या खाल-च्या जागेवर त्या घराचे मालकाची सत्ता असते; परंतु **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां जिल्हे जडूजाचा निवाडा रद्द होऊन दोन्ही कनिष्ठ कोडतांचे निवाडे कायम झाले, कारण जिल्हा जडूजानें आपले निवाडयांत जी सबब लाविली ती वादीनें आपले अर्जींत लिहिली नव्हती, आणि ती मजबूत आहे, असेंही जिल्हा जडूजानें दाखविलें नाहीं; ह्या शिवाय **अमदाबाद**सारखे शहरांत ही चाल असणें असंभवी आहे, कारण तेथें वस्ती दाट असल्यामुळें घरांचीं पाखीं दुसऱ्या घरांवर गेलेलीं आहेत.

**पितांबर बेचर** ह्यानें ही फिर्याद केली, कीं **माणिकचंद आत्माराम** ह्याचा सोपा, सोप्यावरील खोली व पाण्याचा नळ हीं माझे जागेंत आलीं आहेत, तर तीं काढवून माझी जागा मला देववावी.

ता० २८ सप्तंबर सन १८५०.

**माणिकचंद आत्माराम** ह्यानें जबाब दिला, कीं मीं वादीची जागा साधून घेतली नाहीं.

**अमदाबाद**चे मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून वादी **पितांबर** ह्याचा दावा अशाकारणावरून रद्द केला, कीं वादी ह्याकडून अपल्या दाव्याची शाबिती झाली नाहीं, व ज्या इमारतीबद्दल ही फिर्याद झाली आहे, ती फिर्यादीचे तारखेपूर्वीं कित्येक वर्षें अगोदर बांधलेली आहे, असें साक्षीवगैरे पुराव्यावरून दिसतें.

पुढें प्रिन्सिपाल सदर अमिनाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां [illegible]

ल्या ह्मणजे तें खातें मंजूर धरतात, त्यास्ती पुरावा लागत नाहीं; आणि ह्या मुकद्दम्यांतील खात्यावर सही व साक्षी ह्या दोन्ही आहेत, सबब जिल्हे जडूजानें हें खातें मंजूर धरावयाचें होतें.

प्रथम चौकशी करणारे जडूज **वार्डिन** साहेब ह्यांनीं सदरहू अभिप्राय कबूल करून सर्टिफिकिटांत लिहिल्याप्रमाणें ह्या मुकद्दम्याची तजवीज व्हावी ह्मणून तो फुलकोडताकडे पाठविला. फुलकोडतानेंही तो अभिप्राय कबूल करून जिल्हे जडूजाचा हुकूमनामा रद्द केला, आणि **शिमसन्** साहेब ह्यांनीं लिहिल्याप्रमाणें तजवीज होण्याकरितां फुलकोडतानें जिल्हे जडूजाकडे मुकद्दमा परत पाठवून त्यास लिहिलें, कीं नवीन हुकूमनामा करून **सदर दिवाणी अदालतींत** झालेल्या खर्चाबद्दल ठराव त्यांत करावा.

वार्डिन साहेब,
लिजिट् साहेब,
व ग्रांट् साहेब.

---

## स्पेशल अपिल नंबर २५११.

अपिलेंट्
**माणिकचंद आत्माराम.**
रिस्पोंडेंट्
**पितांबर बेचर.**
दावा रुपये ७५.

**ठराव.**

एका मनुष्यानें दुसऱ्याची कांहीं जागा साधून घेतली, ती परत मिळण्याविषयीं दुसऱ्या मनुष्यानें फिर्याद केली होती. त्या फिर्यादींत जिल्हे जडूजानें कनिष्ट कोडतांचे निवाडे रद्द करून वादीचे वतीनें निवाडा अशाकारणावरून केला, कीं **अमदाबाद**

शहरांतील लोकांच्या वहिवाटीप्रमाणें घराचे पाख्यांच्या खाल-च्या जागेवर त्या घराचे मालकाची सत्ता असते; परंतु **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां जिल्हे जडूजाचा निवाडा रद्द होऊन दोन्ही कनिष्ठ कोडतांचे निवाडे कायम झाले, कारण जिल्हा जडूजानें आपले निवाडयांत जी सबब लाविली ती वादीनें आपले अर्जांत लिहिली नव्हती, आणि ती मजबूत आहे, असेंही जिल्हा जडूजानें दाखविलें नाहीं; ह्या शिवाय **अमदाबादे**सारखे शहरांत ही चाल असणें असंभवी आहे, कारण तेथें वस्ती दाट असल्यामुळें घरांचीं पाखीं दुसऱ्या घरांवर गेलेलीं आहेत.

**पितांबर बेचर** ह्यानें ही फिर्याद केली, कीं **माणिकचंद आत्माराम** ह्याचा सोपा, सोप्यावरील खोली व पाण्याचा नळ हीं माझे जागेंत आलीं आहेत, तर तीं काढवून माझी जागा मला देववावी.

ता० २८ सप्तंबर सन १८५०.

**माणिकचंद आत्माराम** ह्यानें जबाब दिला, कीं मीं वादीची जागा साधून घेतली नाहीं.

**अमदाबाद**चे मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून वादी **पितांबर** ह्याचा दावा अशाकारणावरून रद्द केला, कीं वादी ह्याकडून अपल्या दाव्याची शाबिती झाली नाहीं, व ज्या इमारतीबद्दल ही फिर्याद झाली आहे, ती फिर्यादीचे तारखेपूर्वी किन्येक वर्षे अगोदर बांधलेली आहे, असें साक्षीवगैरे पुराव्यावरून दिसतें.

पुढें प्रिन्सिपाल सदर अमिनाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां त्यानें जातीनें जाऊन सदरहू जागा पाहिली, आणि सदरीं जी

कारणें लिहिलीं आहेत, त्याच कारणांवरून मुनसफाचा ठराव कायम केला.

नंतर **पितांबर** ह्यानें दुसरें अपील जिल्हे जडूजाचे कोडतांत केलें, तेव्हां जडूजानें सदरहू दोन्ही ठराव रद्द करून असा ठराव केला, कीं सोपा, त्यावरील खोली, आणि नळ हीं **पितांबर** ह्याचे जागेवर जितकीं आलीं असतील तितकीं काढून टाकावीं. आणखी जडूजानें असें लिहिलें, कीं जाग्याचे नकाशांत सोपा **पितांबराचे** घराच्या भिंतीलगत काढला आहे, ह्यावरून असें खचित दिसतें, कीं त्या सोप्याखालीं **पितांबराची** कांहीं जागा आली आहे, कारण **अमदाबाद** शहरांत अशी चाल आहे, कीं घराच्या पाख्याखालची जागा घराच्या मालकाची असते. आतां अशी चाल असतां **माणिकचंदानें** इमारत बांधली, तर ती कोणत्या आधारानें बांधली, हें त्यास दाखविलें पाहिजे, परंतु त्यानें **पितांबराचे** भिंतीकडे आपल्या जागेची हद्द कोठपर्यंत आहे, ह्याचा पुरावा करण्याकरितां कोणत्याही प्रकारचे दस्तऐवज हजर केले नाहींत. ह्यावरून असें अनुमान होतें, कीं फिर्यादींत लिहिल्याप्रमाणें **माणिकचंदानें** जागा साधून घेतली आहे; दुसरें असें आहे, कीं प्रिन्सिपाल सदर अमिनानें जातीनें जाऊन जागा पाहिल्यावर त्यास असें वाटलें, कीं ह्या ठिकाणीं जुन्या सोप्याची खूण आहे, त्यावरून पूर्वीं एथें सोपा होता, असा त्यानें निश्चय केला; परंतु सोपा असला तरी तो **माणिकचंदाचा** होता, असें होत नाहीं. आणखी असें आहे, कीं **अमदाबादेसारख्या** शहरांत भुईंत पुष्कळ विटा सांपडतात, तेव्हां केवळ असल्या खुणेवरून पूर्वीं इमारत होती किंवा नव्हती, ह्याचा निश्चय करतां येत नाहीं; मग मालकीचा विचारच नको. सोप्यावरील खोली आणखी च-

ढविली असतां ती **पितांबर** ह्याच्या घराचे वाशांस जाऊन भिडेल, आणि तेणेंकरून त्याच्या घरास उपद्रव होईल.

नंतर **माणिकचंद** ह्यानें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील घेण्याविषयीं अर्जी केली, ती **हट्ट** साहेबांनीं अशा कारणावरून मंजूर केली, कीं घराचे पाख्याखालची सर्व जागा त्या घराचे मालकाची असते, ह्या चालीच्या आधारावरून जिल्हे जड्जानें ताब्यांतील कोडतांचे निवाडे रद्द करून जो ठराव केला, तो कायद्यास व कोडतांतील वहिवाटीस विरुद्ध आहे, कारण सदरहू चालीचीं सबब फिर्यादींत लिहिलेली नाहीं व ती चाल मजबूत आहे, असेंही जड्जानें दाखविलें नाहीं, आणि **अमदाबादे**सारखे शहरांत ही चाल असणें असंभवी आहे, कारण तेथें वस्ती दाट असल्यामुळें घरांचीं पाखीं बहुदां दुसऱ्या घरांवर गेलेलीं आहेत.

हा मुकद्दमा **वार्डिन** साहेबांकडे आल्यावर त्यांनीं तो फुलकोडताकडे पाठविला. तेव्हां फुलकोडतानें **हट्ट** साहेबाचा अभिप्राय कबूल करून जिल्हे जड्जाचा निवाडा रद्द केला, आणि ताब्यांतील दोन्ही कोडतांचे निवाडे कायम केले.

वार्डिन साहेब, लिजिट् साहेब व ग्रांट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २५२०.

अपिलेंट्

**आपा वल्लद कुशाबा मगर.**

रिस्पोंडेंट्

**जगू वल्लद मल्हारी मगर.**

दावा रुपये २५.

## ठराव.

कोणी मिरासदार आपली जमीन सोडून २५ वर्षें गेला असतां तेणेंकरून त्याचा त्या जमिनीवरील हक्क बुडत नाहीं.

**अपिलेंट् आपा** ह्यानें आपली मिरासजमीन परत मिळण्याविषयीं **रिस्पोंडेंट् जगू** ह्यावर अर्जी केली.

तारीख २८ माहे सप्तंबर सन १८५०.

तींत मजकूर असा लिहिला, कीं मी लहान असतां माझा बाप मला घेऊन गांव सोडून गेला, त्यासमयीं माझा आजा सदरहू जमिनीची वहिवाट करीत होता, आणि ती जमीन माझे वाडवाडलांकडे २०० वर्षें चालत होती व तितक्या वर्षांत त्यांनीं पुष्कळ पैसा खर्च करून ती जमीन लागवडीस आणली.

त्यावर जगू ह्यानें जबाब दिला, कीं तंटयांतील जमीन माझे आजापासून मला मिळाली आहे, आणि ती माझे घराण्यांत ४५ वर्षें आहे, आणि मला पक्कें माहीत आहे, कीं **आपाचे** घराण्यांतील कोणाकडेही ही जमीन नव्हती, व त्या घराण्यांतील कोणी ह्या गावांत राहिलासुद्धां नाहीं.

ह्या मुकद्दम्याची चौकशी **माहाड** एथील मुनसफाकडे झाली. तेव्हां त्यानें असा ठराव केला, कीं **आपा** ह्यानें जो पुरावा दिला त्यावरून तंटयांतील जमीन त्याचे आजाकडे चालत होती, असें शाबीत होतें; आणि प्रतिवादी जगू ह्यानें ३० वर्षें भोगवटा झाल्यामुळें जमिनीवर आपला हक्क आहे असें शाबीत केलें नाहीं, सबब वादी व प्रतिवादी हे एकाच घराण्यांतील आहेत, ह्मणून जमीन दोघांस वांटून द्यावी हा उत्तम मार्ग आहे; ह्याकरितां दोघांनीं निमेनिम जमीन वांटून घ्यावी.

पुढे जिल्हा जडजाचे कोर्टांत अपील झाल्यावर त्यानं मुन-सफाचा ठराव रद्द करून असा अभिप्राय लिहिला, कीं फिर्याद होण्यापूर्वी सुमारें २५ वर्षांमागें तंटयांतील जमीन आपाचे आज्याकडे लागवडीस होती. ह्याच कारणावरून आपा ती ज-मीन मागत आहे, व आपानें असें कबूल केलें आहे, कीं सदरहू जमीन माझे बापाकडे कधींही नव्हती. तेव्हां ह्यावरून आपा ह्याचे कुटुंबांतील माणसें जमीन सोडून गेलीं, अशी कल्पना वाटते, आणि नवीन पैमाष झाल्यामुळें जमिनीचा सारा फार कमी झाला आहे, ह्मणून आपा आतां जमीन मागत आहे, असें उघड दिस-तें. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून पहातां असें दिसतें, कीं ज्या वेळेस आपा ह्याचें कुटुंब जमीन सोडून गेलें त्या वेळेपासून जगू जमिनीचा एकसारखा भोगवटा करीत आहे, तेव्हां आपा ह्याचा हक्क कबूल करून जगू ह्याचें नुकसान करावें, हें गैरवाज-वी आहे.

पुढें आपा ह्यानें जिल्हा जडजाचे निवाडयावर सदर दिवा-णी अदालतींत स्पेशल अपील केलें, तें शिमसन् साहेबांनीं अशा कारणावरून घेतलें, कीं मिरासदार ह्यानें आपली वडिलो-पार्जित जमीन परत मिळण्याविषयीं दावा केला, तो जिल्हा जड-जानें ज्या सबबेवरून नामंजूर केला ती सबब कायद्यास विरुद्ध आहे.

नंतर हा मुकद्दमा वार्डिन साहेब ह्यांकडे आल्यावर त्यांनीं अभिप्राय दिला, कीं शिमसन् साहेबांनीं जें कारण लिहिलें आहे, तें बरोबर आहे, आणि जर कोणी मिरासदार आपली मिरास-जमीन सोडून २५ वर्षें बाहेर जाईल तर त्याचा त्या जमिनीवरील

हक्क बुडेल, असें जिल्हा जड्जास वाटलें, परंतु तसें होत नाहीं;

वार्डन साहेब, लिजिट् साहेब व ग्रांट् साहेब.

सबब हा मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें त्यांचा अभिप्राय कबूल करून जिल्हेजड्जाचा हुकूमनामा रद्द केला.

---

## स्पेशल अपील नंबर २७५०.

अपिलेंट्

**अमरचंद वल्लद भोपशिंग.**

रिस्पोंडेंट्

**विश्वनाथ पद्माकर.**

दावा रुपये १,४९१६८.

**ठराव.**

अनें बचा कांहीं माल गहाण ठेवला होता, त्या मालावर त्यानें जप्ती बसविली. तेव्हां बचा बाप ड ह्याकडून अच्या गहाणखताच्या पूर्वीचे तारखेचें गहाणखत कनें लिहून घेतलें होतें. त्यावरून त्यानें जप्ती उठविण्याविषयीं फिर्याद केली. कनिष्ट कोडतांनीं बाप जीवंत असतां मुलास माल गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं, ह्या कारणावरून कचा दावा मंजूर केला; परंतु सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील झाल्यावर कनिष्ट कोडतांचे ठराव रद्द झाले. कारण कनें फिर्याद केली, तेव्हां त्याचें खत छापविलें नव्हतें, सबब तें खत त्या तारखेस मंजूर करून अचा दावा नामंजूर करतां येत नाहीं, आणि जो हुकूमनामा अनें ब ( मुलगा ) वर करून घेऊन जप्ती बसविली, तो हुकूमना-

मा होण्याचे पूर्वी ड ( बाप ) मरण पावला, ह्यामुळे अच्या हक्काला जो अडथळा होता, तो दूर झाला.

रिस्पोंडेंट् विश्वनाथ पद्माकर ह्यानें अपिलेंट् अमरचंद वल्लद भोपशिंग व त्याचाभाऊ ह्यांवर घरावरील जप्ती उठविण्याकरितां ही फिर्याद केली, कीं घराचा मालक सदाशीव बल्लाळ ह्यानें घर मजपाशीं गहाण ठेवून खत मिती माघवद्य ३ शके १७५० ( सन १८२८–२९ इसवी )चें लिहून दिलें आहे, व प्रतिवादीनें सदाशीव बल्लाळाचा मुलगा धोंडदेव सदाशीव ह्यावर दुसरे कामांत हुकूमनामा करून जप्ती बसविली आहे, त्यास ती जप्ती उठवावी.

तारीख १३ नवंबर सन १७५०.

ह्यावर प्रतिवादींनीं जबाब दिला, कीं धोंडदेव सदाशीव ह्याकडे आमचें कर्ज येणें होतें, त्याबद्दल त्यानें सदरहू घर शके १७५२ (सन १८३०–३१ इसवी) सालीं आह्मांजवळ गहाण ठेवून खत लिहून दिलें, त्याखतावरून आह्मीं त्यावर फिर्याद करून हुकूमनामा करून घेतला आहे, आणि वादीनें बनावू खत करून त्यावर आमच्या खताच्या पूर्वीची मिती घातली आहे.

नासिकच्या सदर अमिनानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून ठराव केला, कीं धोंडदेव सदाशीव ह्यास आपला बाप सदाशीव बल्लाळ जीवंत असतां तंट्यांतील घर गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं, आणि वादी विश्वनाथ पद्माकर ह्यानें आपलें गहाणखत खरें आहे, असें शाबीत केलें, ह्याकरितां जप्ती उठवावी.

पुढें असिष्टन् जड्जाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां सदर अमीन ह्यांनीं ज्या कारणांवरून् निवाडा केला होता त्याच कारणांवरून तो कायम झाला. असिष्टन् जड्ज ह्याचे कोडतांत प्रतिवा-

दी ह्यांनीं अशी तकरार केली, कीं जेव्हां घोंडदेव सदाशीव ह्यानें आह्माजवळ घर गहाण ठेविलें, तेव्हां सदाशीव बल्लाळ ह्यानें आह्मास असें लिहून दिलें, कीं माझा मुलगा जें करील त्याबद्दल मी तकरार सांगणार नाहीं, आणि ज्या खतावरून जप्ती उठविण्याविषयीं हुकूम झाला आहे तें खत कर्ज देऊन करून घेतलें असा पुरावा वादीकडून झाला नाहीं.

पुढें **अमरचंद** (दुसरा प्रतिवादी) ह्यांनें जिल्हे जड्जाकडे अपील करून तकरार केली, कीं **विश्वनाथ पद्माकर** ह्याचे खतावर **सदाशीव बल्लाळ** ह्याची सही नाहीं, व तंटयांतील माल **विश्वनाथ** ह्याचे कबजांत नाहीं व आमचें खत त्याचे खतापूर्वी छापविलें आहे; सबब सन १८२७चा कायदा १८ कलम १४ रकम १ हींतील ठरावाअन्वयें आमचें खत अगोदर मंजूर व्हावें; आणि **विश्वनाथ** ह्याचें खत बनाऊ आहे, त्याबद्दल आह्मांस आतां पुरावा मिळाला आहे तो हजर करण्याविषयीं हुकूम व्हावा, परंतु जड्जानें असा ठरार केला, कीं **विश्वनाथ पद्माकर** ह्याचे खताचे खरेपणाविषयीं पुरतेपणीं पुरावा झाला आहे, आणि तंटयांतील घर बापानें गहाण ठेविल्यावर तेंच घर मुलानें मागाहून गहाण ठेविलें, ह्यावरून बापाचे हातचें गहाणखत रद्द होणार नाहीं, असा ताल्यांतील कोडतांनीं जो ठराव केला तो बरोबर आहे, सबब प्रतिवादीचें अपील रद्द केलें असे.

नंतर **अमरचंद** ह्यानें एकटयानेंच **सदर दिवाणी अदालतींत स्पेशल** अपील घेण्याविषयीं अर्जी केली, ती नामंजूर झाली; परंतु त्यानें दुसरी अर्जी केल्यावर **जान वार्डन** साहेब ह्यांचे नजरेस असें आलें, कीं **सदाशिव बल्लाळ** ह्यानें **विश्वनाथ पद्माकर** ह्यास जें खत लिहून दिलें तें **विश्वनाथ पद्माकर** ह्यानें

जेव्हां उगविण्याविषयीं फिर्याद केली, तेव्हां छापविलें नव्हतें. सबब तें खत फिर्याद केल्या तारखेस मंजूर धरून **अमरचंद** ह्याचा दावा रद्द करता येत नाहीं, ही गोष्ट पहिल्या अर्जीची चौकशी करतेवेळीं लक्षांत आली नाहीं; आणि ह्यावरून **वार्डिन साहेबांनीं** असा अभिप्राय दिला, कीं फिर्याद झाल्यावरही जें खत वादीनें छापविलें नाहीं, तें खत मंजूर करून प्रतिवादीचा दावा नामंजूर केल्याबद्दल जे हुकूमनामे ताब्यांतील कोडतांनीं केले, ते सन १८२७चा कायदा १८ कलम १४ ह्यांतील ठरावाप्रमाणें आहेत किंवा नाहींत, हें पहाण्याकरितां स्पेशल अपिलाबद्दलची ही अर्जी मंजूर केली आहे.

हा मुकद्दमा चौकशीकरितां पुनः **जान वार्डिन** साहेब ह्यांकडे आल्यावर त्यांनीं तो सदरहू कारणावरून फुलकोडताकडे पाठविला. तेव्हां फुलकोडतानें विचार करण्याचें दुसरें एक कलम काढलें तें असें, कीं ज्या मनुष्याकडून **अपिलेंट् अमरचंद** ह्यानें घर गहाण घेतलें, त्या मनुष्याचा बाप मरण पावला, आणि त्या मनुष्यावर **अपिलेंट्** ह्याचा हुकूमनामा झाल्यापूर्वी तो मनुष्य आपल्या बापाच्या मागें घराचा मालक झाला, असें असतां कनिष्ट कोडतांनीं **अमरचंद** ह्याचा दावा नामंजूर केला, तेव्हां हा ठराव कायद्यास विरुद्ध आहे किंवा कसें.

विचार करण्याच्या सदरहू दोन कलमांपैकीं पहिल्या कलमाबद्दल फुलकोडतानें असा अभिप्राय दिला, कीं कनिष्ट कोडतांनीं जे हुकूमनामे केले ते **जान् वार्डिन्** साहेब ह्यांनीं लिहिलेल्या कारणावरून सन १८२७चा कायदा १८ कलम १४ ह्यांतील ठरावास विरुद्ध आहेत, आणि दुसरे कलमाबद्दल

वार्डिन् साहेब, लिजिट साहेब व ग्रांट साहेब.

असा अभिप्राय दिला, कीं ज्या मनुष्यानें अपिलेंट् अमरचंद ह्या जवळ घर गहाण ठेविलें त्यावर अमरचंद ह्याचा हुकूमनामा होण्यापूर्वी त्या मनुष्याचा बाप मरण पावला, ह्यावरून अमरचंद ह्याचा गहाण घरावरील दावा कमी होता तो पुरा झाला. ह्याप्रमाणें अभिप्राय देऊन फुलकोडतानें ताब्यांतील कोडतांचे हुकूमनामे रद्द करून रिस्पोंडेंट् विश्वनाथ पद्माकर ह्यावर खर्च घातला.

## स्पेशल अपील नंबर २७५७.

अपिलेंट्

हणमंता, मयत. ह्याचे वारस पुत्र धोंडी व नाना
हे अज्ञान, पालन करणार त्यांची आई गाउ-
कोम हणमंता.

रिस्पोंडेंट्

संतराम बिन भवानूशिग.

दावा रुपये ७२.

### ठराव.

पूर्वीच्या गहाणदाराच्या ताब्यांत जर गहाण माल नसला आणि तो पुढच्या गहाणदाराच्या ताब्यांत असला तर पुढच्या गहाणदाराचा हक्क मंजूर होईल.

तारीख १३ नवंबर सन १८५०

रिस्पोंडेंट् संतराम बिन भवानूशिग ह्यानें मार्त्तंड कांसार ह्याच्या घरावर जप्ती बसविली, ती उठविण्याकरितां धोंडी व नाना हे अज्ञान होते, सबब त्यांची आई गाउ हिनें ही फिर्याद केली, कीं तंट्यांतील घर प्रथम संतराम ह्याकडे गहाण होतें, तें सोडविण्याकरितां माझा मयत नवरा हणमंता ह्यानें घराच्या मालकास

पैसा देऊन घर आमचेकडे गहाण ठेविलें, सबब जप्ती उठवावी.

प्रतिवादी संतराम ह्यानें जवाब दिला, कीं तंट्यांतील घर मजकडे अजून गहाण आहे, कारण माझे कर्जाची फेड अद्यापि पूरी झाली नाहीं, आणि ज्यावेळेस माझा हुकूमनामा मार्तंड ह्यावर होऊन घरावर ही जप्ती बसली, त्यावेळेस सदरहू घर मार्तंडाचे कबजांत होतें व वहिवाटीस होतें.

सोलापुर जिल्ह्यांतील बारशीचे मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून जप्ती उठविण्याविषयीं ठराव केला, कारण त्याचे नजरेस असें आलें, कीं मयत हणमंता ह्यानें तंट्यांतील घर गहाण ठेवण्याचेपूर्वी तें घर संतराम ह्याजवळ गहाण होतें तें त्यानें मार्तंडाकडून संतरामापासून सोडविलें, असा पुरावा झाला आहे.

पुढें जिल्हे जड्जाचे कोर्टांत अपील झालें, तेव्हां त्यानें सदरहू ठराव अशा कारणावरून रद्द केला, कीं संतराम ह्यास गहाणाचा पैसा परत दिल्या बद्दल पुरावा नाहीं, आणि संतराम ह्यापाशीं गहाण खत राहिलें, ह्यावरून असें अनुमान होतें, कीं कर्जाची फेड झाली नाहीं.

नंतर नाना व धोंडी ह्यांचे आईनें स्पेशल अपील केलें, तेव्हां संतराम ह्याचें गहाणखत पूर्वींच्या मितीचें आहे; परंतु गहाणमाल त्याचे कबजांत नाहीं आणि धोंडी व नाना ह्यांचा बाप हणमंता ह्याचें गहाणखत नंतरचें आहे, पण गहाणमाल त्याचे कबजांत आहे. ह्यास्तव गहाणमालावर संतराम ह्याचे हक्का पेक्षां हणमंता ह्याचा हक्क जास्ती पोहंचतो, असें वार्डन् साहेब ह्यांस वाटल्यावरून त्यांनीं सदरहू कलमाचा निर्णय करण्या करितां स्पेशल अपील मंजूर केलें.

नंतर प्रथम चौकशी करणारे जड्ज **वार्डिन्** साहेबच होते. त्यांकडे तो मुकद्दमा पुनः आला, तेव्हां त्यांनीं तो फुल कोडता-कडे पाठविला. फुलकोडतानें **हणमंता** ह्याचें गहाण मंजूर धरण्याविषयीं जो अभिप्राय **वार्डिन्** साहेबांनीं दिला होता तो पसंत करून जिल्हे जड्जाचा हुकूमनामा रद्द केला, आणि मुनसफाचा ठराव बाहाल केला.

वार्डिन् साहेब,
लिजिट साहेब,
व ग्रांट् साहेब,

## स्पेशल अपील नंबर २७६८.

अपिलेंट्

**परशराम गोपाळ भट**, ह्याचा वारस **महादाजी परशराम भट.**

रिस्पोंडेंट्

**भिकू फकीर पाटील**, ह्याचे वारस **दामू** व **बापू**

दावा रुपये २२८१२.

### ठराव.

जे पाक पुढे येणार तें गहाण लावून घेणें हिंदुशास्त्राचे विरुद्ध आहे.

कांहीं भातावरील जप्ती उठविण्या विषयीं रिस्पोंडेंट् **दामू** व **बापू** ह्यांनीं ही फिर्याद केली. तींत त्यांनीं लिहिलें, कीं ज्या शेतांतील भाताची जप्ती झाली आहे, तें शेत **धर्मा** बिन **विठुजी पाटील** ह्यानें आमचे बापास विकलें, आणि शेताचें उत्पन्न देण्याचा करार केल्यावरून आमचे बापानें **धर्मा** बिन **विठुजी पाटील** ह्याचे हातांत तें शेत ठेविलें. पुढें आमचा बाप मेल्यावर **धर्मा** बिन

ता० १३ नवंबर सन १८५०.

**विठूजी पाटील** ह्यानें आह्मास सदरहू कराराबद्दल निराळा द-स्तऐवज करून दिला आहे.

**अपिलेंट महादाजी परशुराम** ( प्रतिवादी ) ह्यानें जबाब दिला, कीं ज्या वेळेस **धर्मा बिन विठूजी पाटील** ह्यावर माझा हुकूमनामा झाला, त्या वेळेस सदरहू शेत त्याचे वहिवाटींत होतें, आणि जी जप्ती उठविण्याविषयीं हल्लींची फिर्याद झाली आहे ती जप्ती त्या हुकूमनाम्यावरून बसली आहे. तेव्हां तंटच्यांतील मालावर वादी **दामू** व **बापू** ह्यांचा बिलकुल हक्क नसून त्यांनीं तो माल वांचविण्या करितां खोटे दस्तऐवज करून ते हजर केले आहेत.

कोंकण जिल्ह्यांतील **तारापुरचे** मुनसफानें ह्या मुकदम्याची चौकशी करून ठराव केला, कीं वादीनें जे दस्तऐवज हजर केले, ते खरे आहेत, आणि प्रतिवादीनें जबाबांत लिहिलें, कीं ते दस्त-ऐवज तंटच्यांतील माल वांचविण्या करितां बनावू केले आहेत, तर अशी कल्पना करण्यास कांहीं अधार नाहीं, आणि **धर्मा** बिन **विठूजी पाटील** ह्याकडे **माहादाजी** ह्याचें येणें ज्या मितीचें आहे, तिच्या फार अगोदरच्या मितीचे सदरहू दस्तऐवज आहेत, सबब जप्ती उठवावी.

**दामू** व **बापू** ह्यांचे करारनाम्यांत जितकें भात लिहिलें आहे त्यापेक्षां जप्तींतील भात जास्ती आहे, अशी **महादाजी** ह्यानें तकरार केली, तेव्हां त्या बद्दलची चौकशी होण्याकरितां हा मुकद्दमा परत गेला, आणि ज्या मुनसफानें पहिला ठराव केला होता, त्याचे जाग्यावर दुसरा मुनसफ आला, त्यानें तो ठराव कायम केला.

कोंकण जिल्ह्यांतील जड्जाकडे अपील झाल्यावर त्यानें ही तो ठराव त्याला जीं मुनसफानें कारणें लावलीं होतीं, त्याच-कारणांवरून बहाल केला.

नंतर महादाजी ह्यानें जिल्हेजड्याचे निवाडयावर सद्दर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील केलें. तें लिजिट् साहेबांनीं अशा कारणावरून घेतलें, कीं दामू व बापू हे निशाण १४ चे करारावरून तंटयांतील मालावर दावा करतात, आणि त्या करार नाम्यांत एका शेताचे पुढील उत्पन्नापैकीं कांहीं उत्पन्न रद कर्जी गहाण लाऊनदिलें आहे; परंतु हिंदुशास्त्राप्रमाणें अशा प्रकारचा करारनामा गहाणखतासारखा समजतां येत नाहीं, कारण गहाणखत मंजूर होण्यास गहाण ठेवलेला माल गहाणदाराचे कबज्यांत असला पाहिजे, आणि ह्या प्रकरणांत असें होऊं शकत नाहीं, हें उघड आहे.

वार्डिन् साहेबांनीं ह्या मुकदम्याची प्रथम चौकशी करून अभिप्राय दिला, कीं हें पिकाबद्दलचें गहाणखत मंजूर धरण्या सारखें नाहीं, असा लिजिट् साहेबांनीं संशय घेतला तो बरोबर आहे, सबब हा मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला आहे. फुलकोडतानें वार्डिन् साहेबांचा अभिप्राय पसंत करून जिल्हेजड्जाचा हुकूमनामा रद्द केला.

वार्डिन् साहेब लिजिट् साहेब व ग्रांट् साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८१३.

अपिलेंट

हरारुपा.

रिस्पोंडेंट्

मनोर हंसराज, नोनजी हंसराज, व सामल हंसराज, ह्यांपैकीं सामल हंसराज, अज्ञान अ-

सल्या मुळे त्याचें पालन करणारे मनोर हंसरा-
ज, व शेट द्वारका भगा.

दावा रुपये ५०.

**ठराव.**

एका मनुष्यानें कोडतांत हुकूमनामा करून घेऊन त्यावरून कांहीं मालावर जप्ती बसविली, ती उठविण्याकरितां त्या मालाचे गहाणदारानें फिर्याद केली. पुढें असिस्टन् जड्जाकडे अपील झालें, तेव्हां व **सद्र दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें तेव्हां असें ठरलें, कीं जप्ती बसल्यामुळें गहाणदाराचे हक्कास व्यन्यय येत नाहीं, सबब गहाणदारास जप्ती उठविण्याबद्दल फिर्याद करण्याची जरूर नाहीं. ह्याप्रमाणें ठराव होऊन गहाणदाराचा दावा रद्द झाला.

तारीख १३ नवंबर सन १८५०

**मनोर हंसराज**, वगैरे **रिस्पोंडेंट्** ह्यांनीं **पिरजा दाद्दामिया** ह्यावर आणि दुसरे दोन असामींवर कोडतांत हुकूमनामा करून घेऊन त्यावरून त्यांचे शेतावर जप्ती बसविली. नंतर **अपिलेंट् हरीरुपा** ह्यानें तंटयांतील शेत त्याकडे गहाण होतें, सबब जप्ती उठविण्याविषयीं फिर्याद करून **मनोर हंसराज**, वगैरे **रिस्पोंडेंट्** ह्यांनीं ५० रुपयांबद्दल तंटयांतील शेतावर जप्ती बसाविली होती, सबब तितक्याच रुपयांचा दावा केला.

**अमदाबाद** जिल्ह्यांतील तालुका **दंदुका** एथील मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी केली. त्यानें **हरीरुपा** ह्याकडें तंटयांतील शेत गहाण आहे, असा पुरावा झाल्यावरून जप्ती उठविण्या विषयीं ठराव केला; परंतु अशिस्टन् जड्जाचे कोडतांत अपील झाल्यावर त्यानें ठराव केला, कीं **हरीरुपा** ह्यानें शेताचा मालक

ह्मणून फिर्याद केली नाहीं, गहाणदार ह्मणून फिर्याद केली आहे; सबब त्याचे गहाणदारीचे हक्कास जप्ती बसल्यावरून व्यत्यय येत नाहीं, ह्यास्तव मुनसफाचा निवाडा रद्द असे.

नंतर सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील झाल्यावर असिस्टंट जड्जाचा ठराव कायद्यास व वहिवाटीस विरुद्ध आहे किंवा कसें, हें पाहाण्याकरितां बेल साहेबांनीं स्पेशल अपील मंजूर केलें. नंतर लिजिट् साहेबांनीं ह्या मुकद्दम्याची प्रथम चौकशी करून अभिप्राय दिला, कीं एक शेत एकाकडे गहाण असतां गहाण देणाराचे दुसरे सावकारास त्या शेतावर जप्ती बसविण्याचा व तें शेत विकण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं, ह्याकलमाचा विचार करतां आह्मास असें वाटतें, कीं त्यास अधिकार नाहीं, आणि कायदा व वहिवाट ह्यांवरून पाहिलें असतां गहाणदाराचा हक्क कायम होतो. ह्याकारणांवरून असिस्टंट् जड्जाचा हुकूमनामा आमच्यानें कायम करवत नाहीं, सबब हा मुकद्दमा फुल कोडताकडे पाठविला आहे; परंतु फुल कोडतानें असें ठरविलें, कीं ताल्यांतील कोडतांचे ठरावानें अपिलेंट् हरीरुपा ह्यांचे गहाणदारीचे हक्कास व्यत्यय येत नाहीं, सबब अपील रद्द करून खर्च अपिलेंट् ह्यावर घातला असे.

वार्डिन साहेब, लिजिट् सादेब, व ग्रांट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २६२७.

अपिलेंट्

**नारायण रामचंद्र.**

रिस्पांडेंट्

## लक्ष्मीबाई अपिलेंटाची बायको.

### दावा रुपये १०००.

### ठराव.

काणा एक ब्राह्मण ख्रिस्ती झाल्यावर त्यानें आपला मुलगा मिळण्याविषयीं बायकोवर फिर्याद केली. त्या फिर्यादींत **अदालतीच्या शास्त्री** ह्यानें असा शास्त्रार्थ दिला, कीं जो मनुष्य आपला धर्म सोडून परधर्मांत जातो, त्यास महापातक लागून तो जातिभ्रष्ट होतो, परंतु प्रिनूसिपाल सदर अमिनानें फिर्यादीची चौकशी करून अभिप्राय दिला, कीं ह्या मुकद्दम्यास कोणताही शास्त्रार्थ अथवा कायदा किंवा देशचाल लागू होत नाहीं, आणि बापास मुलाचें पालन पोशण करण्याचा अधिकार सिद्धच आहे, ह्याविषयीं संशय नाहीं; तेव्हां त्यानें ख्रिस्तीधर्म स्विकारिल्या मुळें त्याचा तो अधिकार जात नाहीं. पुढें जिल्हेजड्जाकडे अपील झालें तेव्हां त्यानें असा अभिप्राय दिला, कीं जो ब्राह्मण आपला धर्म सोडतो तो जातिभ्रष्ट होतो, आणि त्यामुळें त्याचे व्यवहारांतील सर्व हक्क बुडतात, असें धर्मशास्त्रावरून स्पष्ट दिसतें. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां असा ठराव झाला, कीं धर्म सोडल्यामुळें अथवा जात सोडल्यामुळें मालमत्ता किंवा हक्क बुडतात अशा विषयीं जें शास्त्र असेल किंवा जी देशचाल असेल ती सन १८५०चा अक्टूनूंबर २१ ह्यावरून अमलांत आणतां येत नाहीं.

ता० २१ फेब्रूवारी सन १८५१.

**अपिलेंट** ह्यानें आपला धर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारिला, तेव्हां पासून त्याची लग्नाची बायको **रिस्पोंडेंट** ही त्यापासून वेगळी राहात होती, पुढें ती आपला मुलगा घेऊन **गणेश बाळकृष्ण** जोशी **ह्या बरोबर काशीस** जाऊं लागली, तेव्हां अ-

पिलेंटाने आपला मुलगा मिळण्याविषयीं ही फिर्याद रिस्पोंडेंट् हीवर व सदरहू जोशावर एक हजार रुपयांची केली.

अपिलेंटानें अर्जींत मजकूर लिहिला, कीं माझा मुलगा न- म्मावयाचे सुमारास मी ख्रिस्ती धर्म स्वीकारून नगरास जाऊन राहिलों, आणि माझी बायको मुलासुद्धां पुण्यांतच राहिली. मीं धर्म सोडल्यावर माझ्या बायकोनें मजवळ येऊन रहावें, ह्मणून यत्नकरून पाहिला, आणि माझा मुलगा माझे हवालीं करून दे- ववावा, ह्याविषयीं मीं माजिस्त्रेटाकडेही अर्जी केली,परंतु माझा सर्व उद्योग व्यर्थ गेला. आतां माझी बायको मुलगा घेऊन नगराव रून जात असतां मी तिजपासून मुलगा घेतला. तो सुमारें सा त वर्षांचा आहे; परंतु माजिस्त्रेटानें मुलगा परत देण्या विषयीं हु कूम केला, ह्यास्तव मुलावर माझा हक्क शाबीत करण्याकरितां मैं ही फिर्याद केली आहे.

रिस्पोंडेंट् हिनें जबाब दिला, कीं जेव्हां मी गरोदर झालें तेव्हां अपिलेंट् माझे जातींत होता; परंतु पुढें त्यानें आपला ध सोडून तो जातिभ्रष्ट झाला, ह्यामुळें त्याचे व्यवहारांतील सर्व हक्क बुडाले. मीं आपल्या मुलाचें लहानपणापासून पालन पोषण करू त्याची मुंज केली आहे.

दुसऱ्या प्रतिवादीनें सदरहू मुलावर माझा हक्क नाहीं, अस जबाब दिल्या वरून त्याचें नांव वादीनें अर्जीतून काढून टाकिलें

ह्या मुकद्दम्याची चौकशी प्रिन्सिपाल सदरअमीन ह्याक झाली, तेव्हां सदरहू खटल्याविषयीं हिंदुशास्त्राचा काय अभिप्रा आहे, हें समजण्याकरितां त्यानें अहमदनगरचे अदालतीचा शा स्त्री ह्यास सवाल केला. तेव्हां त्यानें असें लिहिलें, कीं अपिलें (वादी) ह्यानें हिंदुधर्म सोडल्या मुळें महापातक केलें, आणि ते

करून तो जातिभ्रष्ट झाला. ह्याविषयीं शास्त्रांत वचनें आहेत. तीं येणें प्रमाणें.

शास्त्रांत जें करावें ह्मणून सांगितलें आहे, तें जो करीत नाहीं तो, आणि जें नकरावें ह्मणून सांगितलें आहे तें जो करितो तो हे जातिभ्रष्ट होतात. याज्ञवल्क्य अध्याय ३ स्मृति २२. ब्रह्महत्या करणारा, मद्यप्राशन करणारा, उपाध्यायाचें सुवर्ण चोरणारा, आणि मातृगमन करणारा, हे सर्व महापातकी होत. मनु अध्याय ९ स्मृति २३५.

शास्त्रांत जें निषिद्ध आहे तें खाणें, स्वधर्माची अथवा परधर्माची निंदा करणें, आपलें महत्व वाढविण्याविषयीं अनृत बोलणें, आणि रजस्वलेशीं संगकरणें, हीं सर्व मद्यप्राशन केल्याप्रमाणें आहेत, आणि हीं महापातकें होत. याज्ञवल्क्य अध्याय ३ स्मृति २३०.

प्रिन्सिपाल सदर अमिनानें सदरहू शास्त्रार्थाबद्दल पुष्कळ वाटाघाट केली, ती अशी कीं सदरीं लिहिलेल्या दुसऱ्या आणि तिसऱ्या वचनांत सांगितलेल्या अपराधांपैकीं अमुक अपराध अपिलेंट् ( प्रतिवादी ) ह्यानें केला, हें शास्त्री ह्यानें स्पष्ट लिहिलें नाहीं, आणि पहिलें वचन फक्त हिंदूस लागू आहे. कारण हिंदुशास्त्रांत जें नकरावें ह्मणून सांगितलें आहे तें केल्याबद्दल, व जें करावें ह्मणून सांगितलें आहे तें न केल्याबद्दल जो दंड होणार तो हिंदूस मात्र लागू आहे, दुसरे कोणास लागू नाहीं. ह्या प्रमाणें प्रिन्सिपाल सदर अमिनानें विचार करून त्यास हिंदुधर्म सोडल्या बद्दल दंड करावा ह्याविषयीं शास्त्रांत कोठें स्पष्ट लेख आहे किंवा कसें, ह्याप्रकर्णी शास्त्री ह्यास सवाल करणें जरूर वा-

हून त्यानें त्यास पुनः सवाल केला. त्याचा जबाब शास्त्री ह्यानें दिला, तो येणें प्रमाणें.

" जरी कोणास आपला धर्म हलका वाटत असला तरी तो त्यास चांगला आहे, आणि त्यापासून त्याचें कल्याण होतें, आणि दुसरा धर्म स्वीकारून त्याप्रमाणें जरी बरोबर आचरण केलें, तरी त्यापासून त्याचें कल्याण होणार नाहीं, कारण दुसरा धर्म स्वीकारून जो पोट भरतो, तो लागलाच धर्म भ्रष्ट होतो." मनु आध्याय १० स्मृति ९७, आणि भगवद्गीता आध्याय ३ श्लोक ३५

प्रिनूसिपाल सदरअमीन ह्यांस असें वाटलें, कीं सदरहू वचनांचा अर्थ शास्त्री ह्यानें धर्मपर लावला, परंतु पुर्वापर संबंधावरून पहातां तीं वचनें फक्त प्रपंचपर आहेत, आणि पार्लमेंटाचे आक्ट किंवा सरकारचे कायदे, अथवा दुसरा कोणताही कायदा ह्या मुकदम्यास लागू होत नाहीं, व देश चालीचाही आधार नाहीं, ह्या करितां सन १८२७ चा कायदा ४ कलम २६ ह्या अन्वयें मुकदम्याचा योग्य व वाजवी दिसेल आसा निकाल केला पाहिजे. आतां अपिलेंट वादी ह्यास आपले मुलाचें पालन करण्याचा अधिकार आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे, आणि नीति पाहिली आसतां हा अधिकार त्यास नसावा, असें त्यानें कांहीं काम केलें नाहीं. ह्याप्रमाणें नजरेस आल्यावरून प्रिनूसिपाल सदरअमिनानें अपिलेंटाचे स्वाधीन मुलगा करावा ह्मणून ठराव केला.

पुढें जिल्हे जड्जाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां त्यानें सदरहू ठराव ज्या कारणांवरून रद्द केला तीं कारणें येणें प्रमाणें.

कोडताचे नजरेस असें येतें, कीं सदरीं हिंदुशास्त्रांतील वचनें

लिहिलें आहे, ह्यांवरून उघड दिसतें, कीं जो ब्राह्मण आपला धर्म सोडतो, तो जातिभ्रष्ट होतो, आणि तेणेंकरून त्याचे स्वव- ह्यासंत [illegible] सोडून देण्यापूर्वी त्यास जीं अवरस मुलें असतील, त्यांचें पालन करण्याचा हक्कही बुडतो. बघा, ब्राह्मणानें हिंदुधर्म सोडला ह्मणजे तेव- ढ्यानेंच हिंदुशास्त्रांत जें करूं नये ह्मणून सांगितलें आहे, तें त्यानें केलें, व जें करावें ह्मणून सांगितलें आहे,तें न केलें,असें अर्थातच होतें, आणि ह्यावरून तो जातिभ्रष्ट होतो. दुसरी गोष्ट अशी आहे, कीं ब्राह्मण ख्रिस्ती होऊन ख्रिस्ती लोकांबरोबर राहूं लाग- ला, ह्मणजे तो अभक्ष्य पदार्थ अर्थातच खातो, आणि तेणेंकरून तो जातिभ्रष्ट होतो. कारण जो ख्रिस्ती झाला तो दुसऱ्या ख्रिस्ती लोकांबरोबर राहो अथवा एकटा राहो, तो हिंदुशास्त्रांत ब्राह्मणास जे अभक्ष्य पदार्थ सांगितले आहेत, ते तो खाल्या शिवाय राहील, असें संभवत नाहीं. आतां ह्यापदार्थांच्या आंगीं अभक्ष्यत्व ते जातीनें निषिद्ध असल्यामुळें आलेलें असो, किंवा ते यथायोग्य रीतीनें तयार न केल्यामुळें आलेलें असो.

**सरटामस स्टेंज** साहेब व **मकनाटन** साहेब ह्यांनीं हिंदु- शास्त्राविषयीं जे ग्रंथ केले आहेत त्यांत व बंगाल्यांत दिवाणी मुकद्दमे जे फैसल झाले त्यांविषयीं **मकनाटन** साहेब ह्यांनीं बूक केलें आहे, त्यांत अनेक ठिकाणीं असें साफ लिहिलें आहे, कीं हिं- दुशास्त्राप्रमाणें जे लोक जातिभ्रष्ट होतात त्यांत दोन प्रकार आ- हेत. एक असा, कीं भ्रष्टझालेल्या मनुष्यानें प्रायश्चित केलें, ह्मण- जे त्याचे हक्क त्यास पुनः प्राप्त होतात, दुसरा असा, कीं भ्रष्टझा- लेल्या मनुष्यास प्रायश्चित नाहीं. जो स्वधर्म सोडतो, तो ह्या दु- सऱ्या प्रकारांत येतो, आणि त्याला मेल्यासारखें समजतात. ह्या

प्रमाणें हिंदूचें धर्मशास्त्र आहे; आतां सूज्ञ जे लोक आहेत, ते ह्या शास्त्रास दोष लावतील, हें खरें आहे; पण असें शास्त्र आहे, आणि तें शास्त्र प्रतिवादीचे धर्माचें आहे, ह्याकरितां सदरहू मुकद्दम्याचा निकाल त्याप्रमाणेंच केला पाहिजे.

ताव्यांतील कोडताचें ह्मणणें असें आहे, कीं जेव्हां वादी ख्रिस्ती झाला, तेव्हां तो ब्राह्मण नव्हता, कारण त्यानें ख्रिस्ती होण्यापूर्वींच आपलें जानवें काढून टाकिलें होतें. त्यास ही गोष्ट खरी असेल, परंतु ह्यागोष्टीनें त्याच्या दाव्यास बिलकुल मजबुती येत नाहीं, कारण त्यास ख्रिस्ती होण्यापूर्वी जानवें काढून टाकणें अवश्य होतें, आणि ही गोष्ट धर्म सोडण्याचाच एक अंश होता.

"प्रिनसिपाल सदर अमीन असें लिहितो, कीं ब्राह्मणास कोणत्याही अपराधाबद्दल देशपार करणें झाल्यास त्यास त्याचें कुटुंबासुद्धां देशपार करावें, असें शास्त्र आहे, ह्यारितां वादी ह्यास त्याचा मुलगा दिला पाहिजे. कारण हिंदुशास्त्रामध्यें ब्राह्मणास त्याचें शरीर व कुटुंब आणि मालमत्ता ह्याविषयीं पुष्कळच चमत्कारिक हक्क आहेत, परंतु हे सर्व हक्क सरकार कबूल करीत नाहीं. ह्यांतून पुष्कळ हक्क फौजदारी कायद्यावरून रद्द होतात. ब्राह्मणानें महाअपराध केले असतां त्यांप्रमाणें त्यास हिंदुशास्त्रांत शिक्षा सांगितली नाहीं. त्यास अत्यंत मोठी शिक्षा ह्मटली ह्मणजे त्याच्या मालमत्ते सुद्धां व कुटुंबासुद्धां देशपार करणें ही आहे. त्यानें कसाही अपराध केला तरी राजानें त्याचा जीव व मालमत्ता घेऊनये.

"परंतु हल्लींचा कायदा असा नाहीं. त्यावरून ब्राह्मणास हलक्या अपराधाबद्दल सुद्धां बेअब्रूची शिक्षा होते; मोठे अपराधा

बद्दल तर त्यास देहांत दंड होतो, त्याच्या कुटुंबावांचून त्यास काळ्या पाण्यावर पाठवितात. त्यानें फितूर केला असल्यास त्याची मालमत्ता जप्त करितात, व ती मालमत्ता बेवारसी असल्यास सरकारांत घेतात. आणखी असें आहे, कीं सदरीं ब्राह्मणाच्या ज्या हक्कांचा उल्लेख केला आहे, ते जरी सरकारानें कबूल केले तरी ते हल्लींच्या मोकद्दम्यास लागू होत नाहींत, कारण त्या हक्कांवरून ब्राह्मणानें आपला अधिकार आपल्या वारसास देऊ नये असें होत नाहीं, व तो मरण पावला असतां किंवा त्यानें स्वधर्म सोडला असतां अथवा त्यानें सन्यास अगर दुसरा आश्रम घेतला असतां त्याचे व्यवहार संबंधी हक्क बुडूनयेत असेंही होत नाहीं; सन्याशी झाला ह्मणजे त्यास व्यवहारदृष्टीनें मेला असें समजावें असें शास्त्र आहे. पुढें **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील झालें, तेव्हां ब्राह्मण ख्रिस्ती झाला असतां त्याची मुलें स्वाधीन असण्याविषयीं त्याचा अधिकार बुडतो किंवा कसें ह्याची चौकशी होण्याकरितां **बार्डिन** साहेब ह्यांनीं स्पेशल अपील मंजूर केलें.

नंतर **लिजिट्** साहेब ह्यांनीं ( सिटिंग जड्ज ) ह्या मुकद्दम्याची चौकशी करून अभिप्राय लिहिला, कीं ज्या निवाड्यावर हें स्पेशल अपील झालें आहे, तो झाल्या नंतर सन १८५० चा अकट नंबर २१चा चालू झाला आहे, आणि कोणी मनुष्यानें आपला धर्म सोडला, किंवा तो जातिभ्रष्ट झाला, तर त्याचे हक्क किंवा मालमत्ता दंडाबद्दल घ्यावी, अशाविषयीं जें शास्त्र अथवा कायदा किंवा देशचाल असेल, ती पुढें अमलांत येणार नाहीं, असें सदरहू अकटांत साफ लिहिलें आहे. ह्याकरितां **अपिलेंटास** आपले मुलांचें पालन पोषण करण्याचे जे हक्क व अधि-

कार मुळचे आहेत, ते त्यानें हिंदुधर्म सोडल्यामुळें न बुडवितां सदरहू अक्टावरून कायम ठेविले पाहिजेत, सबब हा मुकद्दमा फुलकोडताकडे चौकशीकरितां पाठविला आहे. फुलकोडतानें लिजिट् साहेब ह्यांचा अभिप्राय पसंत करून जिल्हेजड्जाचा हुकूमनामा रद्द केला, आणि सर्व खर्च रिस्पोंडेंट् हीवर घातला.

बेल साहेब वार्डिन साहेब व लिजिट् साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २५८१.

अपिलेंट्

**खंडेराव बल्लाळ ओक.**

रिस्पोंडेंट्

**किसनशिंग बिन छटूरामशिंग.**

दावा रुपये ५२६१५.

**ठराव.**

खत कोडतांत चालण्या सारखें आहे, असा त्याविषयीं बरोबर पुरावा झाल्यावर त्याखताचे शाबितीकरितां हिशेबाचा पुरावा देण्याची गरज नाहीं, कारण त्या खताचा ऐवज न पोहोंचल्या बद्दल पुरावा करण्याचें काम प्रतिवादीचें आहे.

कोंकण जिल्ह्यांत **पनवेलचे** मुनसफाचे कोडतांत **खंडेराव** ह्यानें **किसनशिंग** ह्यावरही फिर्याद केली, कीं मीं प्रतिवादीस पैसा देऊन त्याबद्दल खत लिहून घेतलें आहे, तर तो पैसा त्याकडून व्याजसुद्धां मला देववावा.

ता० १ फेब्रुवारी सन १८५१.

किसनशिंग ह्यानें जबाब दिला, कीं मी वादीचें देणें लागत नाहीं, आणि बारा वर्षे होत आलीं तरी वादीनें पैसा वसूल करण्याविषयीं कांहीं तजवीज केली नाहीं.

मुनसफानें ह्या मोकद्दम्याची चौकशी केली, तेव्हां त्यानें वादीचा दावा अशा कारणांवरून रद्द केला, कीं वादीनें पैसा दिल्याबद्दल पुरावा केला नाहीं, आणि मुदतीचे कायद्यावरून पहातां ही फिर्याद मुदती बाहेर जाण्यास थोडे दिवस मात्र राहिले आहेत.

नंतर असिस्टंट जड्जानें मुदतीचे कायद्यावरून ही फिर्याद चालण्यास हरकत नाहीं, ह्या कारणावरून सदरहू मुकद्दमा मुनसफ कोडतांत पुनः चौकशी करण्याकरितां परत पाठविला. तेव्हां मुनसफानें दावा केलेल्या रुपयांपैकीं जितके रुपये देणें वाजवी दिसले तितके रुपये प्रतिवादीनें द्यावे, ह्मणून ठराव केला.

पुढें अपील झालें, तेव्हां जिल्हेजड्जानें सदरहू ठराव रद्द करून अभिप्राय दिला, कीं वादीनें पुष्कळ दिवस गेल्या वर ही फिर्याद केली आहे, ह्याकरितां त्यास आपले दाव्याचे खरेपणाविषयीं मजबूत पुरावा करणें आवश्यक आहे. त्यानें जे हिशेब हजर केले आहेत, त्यांवरून कांहीं पुरावा होत नाहीं; परंतु उलटा असा भास होतो, कीं ते हिशेब बिलकुल भरवसा ठेवण्या सारखे नाहींत, आणि प्रतिवादीकडे पैसा मागितल्याबद्दल जो पुरावा वादीनें दिला आहे तोही बरोबर नाहीं.

नंतर जिल्हेजड्जाचे निवाड्यावर सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील झालें, तें हट्ट साहेब ह्यांनीं अशा कारणावरून मंजूर केलें, कीं खत कोडतांत चालण्या सारखें आहे, असा बरोबर पुरावा झाल्यावर त्याखताचे शाबितीकरितां हिशेबाचा पुरावा देण्याची गरज नाहीं, कारण सन १८२७ चा कायदा ५

कलम ९ रकम १ हीप्रमाणें त्या खताचा भरऐवज न पोंहचल्या बद्दल पुरावा करण्याचें काम प्रतिवादीचें आहे.

पुढें हा मुकद्दमा **वार्डिन** साहेब ह्यांकडे चौकशीकरितां गेला, तेव्हां त्यांनीं **हट्** साहेब ह्यांचा अभिप्राय कबूल करून तो फुल कोडताकडे पाठविला. फुलकोडतानें ही सदरहू अभिप्राय पसंत करून जिल्हे जड्जाचा हुकूमनामा रद्द केला.

बेल साहेब वार्डिन् साहेब व लिजिट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २५८२.

अपिलेंट्

**अंताजी सदाशीव जोशी.**

रिस्पोंडेंट्

**बाळशेट विठशेट.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

हप्तेबंदीचे खतांतील जे हप्ते मुदतीचे कायद्याचे आंत येतील, त्यांबद्दल फिर्याद चालण्यास त्या कायद्यावरून अटकाव होणार नाहीं.

हप्तेबंदीच्या खतावरून मुद्दल व व्याज मिळण्याविषयीं **अंताजी** ह्यानें कोंकण जिल्ह्यांतील **पेण**चे मुनसफाचे कोडतांत ही फिर्याद केली. ता० २१ फेब्रूवारी सन १८५१

**बाळशेट** ह्यानें जबाब दिला, कीं मीं सदरहू खत लिहून दिलें नाहीं.

मुनसफानें ठराव केला, कीं सदरहू खत सन १८३०चे सालचें आहे, आणि ही फिर्याद सन १८४५ सालीं झाली आहे; सबब सन १८२७चा कायदा ५ ह्यावरून ही चालावयाची नाहीं.

पुढें असिस्टंट् जड्जाचे व जिल्हाजड्जाचे कोडतांत अपिलें होऊन सदरहू ठराव कायम झाला. जिल्हेजड्जानें ठराव कायम करते समयीं असा अभिप्राय लिहिला, कीं तारीख ३ माहे मे सन १८३०चे खतावरून ही फिर्याद तारीख १५ माहे जानेवारी सन १८४५ रोजीं ह्मणजे खताचे तारखेपासून पंधरा वर्षे भरत आलीं तेव्हां वादीनें केली. खत हप्तेबंदीचें आहे. अपिलेंटाच्या हिशेबावरून असें दिसतें, कीं प्रतिवादीनें एकरुपया वसूल दिला आहे; परंतु हा रुपया प्रतिवादीनें देऊन तेरावर्षे झालीं आहेत, आणि जर प्रतिवादीनें खत झाल्यावर देणें कधीं कबूल केलें असेल तर ती कबुलायत सन १८२७चा कायदा ५ कलम ९ रकम १ हिच्या अन्वयें लेखी पाहिजे. ह्यांत व ह्यासारख्या दुसऱ्या मुकद्दम्यांत पांचवे कायद्याचे चवथे कलमावरून अशी तकरार करतात, कीं हप्तेबंदीचे खतांत दरहप्त्यास फिर्यादीची सवड असते. ह्मणजे जर अनें बस हप्तेबंदीचें खत लिहून दिलें असलें, कीं खताचा ऐवज दाहा वर्षांनीं एकहप्ता ह्याप्रमाणें साहा हप्त्यांनीं देईन, तर जरी खताचे तारखेपासून पन्नासवर्षें पर्यंत बस हप्ता पोंहोचला नसला किंवा त्यानें हप्त्यांचा पैसा वसूल करण्याविषयीं कांहीं तजवीज केली नसली, तरी कायद्याचे मुदतींत जे हप्ते येतील त्यांबद्दल बची पन्नास वर्षांनंतर अवर फिर्याद चालेल, असा सदरहू तकरारीचा अभिप्राय आहे, परंतु ही गोष्ट कोडतानें कबूल केल्यास जे पक्के लबाड आहेत व जे दु-

सत्याचें हरण करण्यास मागें पुढे पाहात नाहींत; ते लोक बहुत-करून सर्वांची मिळकत पाहिजे तेव्हां लुटतील. आणि तेणें-करून कोडतांत विनाकारण फिर्यादी निरंतर चालून लोकांवर जुलूम होईल. ह्याकरितां कोडतास सदरीं लिहिलेली गोष्ट साक्षात् हुकमाशिवाय कबूल करतां येत नाहीं. मुदतीचा कायदा कर-ण्याचा हेतु असा आहे, कीं जें वास्तविक कर्ज आहे तें एका वर्षानंतर जसें वाजवी देणें आहे तसें वीस वर्षांनींही देणें वाजवी आहे, हें उघड आहे; परंतु तें कर्ज अमुक मुदतीचे आंत सा-वकारानें मागितलें नाहीं, तर त्याचा त्या कर्जावरील दावा बु-डेल, असें लोकांमध्ये बंदोबस्त रहाण्यासाठी केलें पाहीजे, व असें न केलें तर बंदोबस्त रहाणार नाहीं, आणि कर्जाचें नाव करून धडधडीत लुटण्याविषयीं लोकांस सवड सांपडेल; कारण खोटें खत जितकें जितकें जुनें होतें तितकें तितकें तें खोटें करून दाखविणें कठीण पडतें, कां कीं खोटें खत करणारा आपले साक्षी पुराव्या निशीं तयार असतो, आणि ज्याचें नांवाचें खोटें खत असतें त्याची कांहींच तयारी नसते. ह्यास्तव **अपिलेंट** ह्मण-तो त्याप्रमाणें सदरहू कायद्याचा हेतु आहे असें कबूल केलें असतां विधवा स्त्रिया, अज्ञान मुलें आणि वारस ह्यांचा बचाव हो-ण्यास थोडा बहुत धोका येईल, आणि मतलबी लुचे लोक पाहि-जे तेव्हां त्यांस लुटतील.

नंतर **अंताजी** ह्यानें सदरहू निवाड्यावर सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील घेण्याविषयीं अर्जी केली, तेव्हां खतां-तील शेवटले तीन हप्ते ह्मणजे सन १८३३, ३४ व ३५ ह्या सालचे हे मुदतीचे आंत असून त्यावरील दावा जिल्हे जड्जानें नामंजूर केला, त्यास जिल्हे जड्जाचा ठराव कायद्यास विरुद्ध आहे किंवा

कसें, हें पहाण्याकरितां हदू साहेब ह्यांनीं स्पेशल अपील केलें.

नंतर पहिल्यानें बॉर्डिन साहेब ह्यांनीं व मागून फुलकोडतानें

बेल साहेब बॉर्डिन साहेब व लिजिट साहेब.

ह्या मुकदम्याची चौकशी करून अभिप्राय दिला, कीं जिल्हे जडूजाचा ठराव कायद्यास विरुद्ध आहे, आणि ह्या कारणावरून त्यांनीं तो ठराव रद्द करून पुनः चौकशी करण्याकरितां मुकदमा जिल्हे जडूजाकडे परत पाठविला, आणि त्यास लिहिलें, कीं नवीन निवाडा करून त्यांत सदर दिवाणी अदालतींत झालेल्या खर्चाची हिस्सेरशी ठरवावी.

---

## स्पेशल अपील नंबर २६४५.

अपिलेंट्

केशवलछीराम नाईक.

रिस्पोंडेंट्

गोविंदअपाजी.

दावा रुपये २९८१५.

## ठराव.

पेढीवरच्या कारकुनाचे लबाडीमुळें किंवा गफलतीमुळें जें नुकसान होईल त्या बद्दल त्याला धन्यास जाब द्यावा लागेल.

---

केशवलछीराम ह्यानें पुण्यांतील सदर अमिनाचे कोडतांत

तारीख २१ माहे फेब्रूवारी सन १८५१.

ही फिर्याद केली, कीं माझी मावसी मथूराबाई हिनें द्वारकेच्येयात्रेस जाते समयीं आपले सावकारीचें काम प्रतिवादी गोविंद आपाजी ह्या कडे सोंपविलें; परंतु त्यानें विश्वा-

सबात करून जे असामी मुळींच नाहींत, त्यांचे नावांवर एकंदर रुपये २६८ १५ वहींत लिहून ठेविले आहेत, ते देववावे.

प्रतिवादीनें जबाब दिला, कीं वादी स्वतः ह्या कामाची वहि-वाट करीत होता, आणि मी त्याचे हाता खालीं फक्त कारकुनीचें काम करीत होतों.

अव्वल कोडतांत व अपील झाल्यावर अशिस्टन जड्जाचे कोडतांत असें ठरलें, कीं प्रतिवादी मुखूत्यार ह्मणून काम करीत होता, असें साक्षी पुराव्यावरून साफ शाबूत झालें आहे. तेव्हां जे असामी कोठें सांपडत नाहींत व ज्यांकडून कांहीं दस्तऐवज क-रून घेतले नाहींत, त्या असाम्यांचे नावांवर त्यानें जो पैसा व-हींत लिहून ठेविला आहे, त्याबद्दल तोच जबाबदार आहे.

पुढें जिल्हे जड्जाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां त्यानें वा-दीचा दावा अशा कारणावरून नामंजूर केला, कीं प्रतिवादी दर-रोज फक्त हिशेब लिहीत होता, आणि वादी अपल्या मावशी कडू-न मालकीपत्र घेऊन व पैशाचे पेटीच्या किल्या घेऊन काम चाल-वीत होता, सबब तो जबाबदार आहे, आणि ह्याकरितां रोजचा जमाखर्च बरोबर केला आहे किंवा नाहीं, हें दररोज संध्याकाळीं पाहून आपली खातरी करून घेण्याचें काम वादीचें होतें.

नंतर वादीनें जिल्हे जड्जाचे निवाड्यावर स्पेशल अपील घेण्याविषयीं अर्जी केली, तेव्हां मालक आपल्या कारकुनापाशीं वेळचे वेळेस हिशेब मागत नसेल तर कारकून मालकास आप-ल्या कामाबद्दल जबाबदार असतो किंवा नाहीं, ह्या गोष्टीचा नि-र्णय करण्याकरितां वार्डिन साहेब ह्यांनीं तें स्पेशल अपील मं-जूर केलें, आणि हा मुकद्दमा लिजिट् साहेबांकडे आल्यावर त्यांनीं अभिप्राय दिला, कीं प्रतिवादी हा पेढीवर कारकून असतां

त्यानें आपले कामांत दंगलबाजी केल्यामुळें जें नुकसान झालें तें भरून देववावें ह्मणून वादीनें फिर्याद केली आहे; आणि सन १८२७चा कायदा ५ कलम ३ रकम १ ह्या अन्वयें ही फिर्याद साहा वर्षांचे आंत चालण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं; सबब हा मुकदमा फुल कोडताकडे चौकशी-करितां पाठविला आहे. फुल कोडतानें सदरहू अभिप्राय कबूल करून जिल्हे जडजाचा हुकूमनामा रद्द केला, आणि पुनः चौकशी करण्याकरितां मुकद्दमा त्याकडे परत पाठविला.

बेल साहेब वार्डिन साहेब व लिजिट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २७०८.

अपिलेंट्

माणिकचंद ऊर्फे मनीराम वल्लद पागदास.

रिस्पोंडेंट्

जेठीराम वल्लद जयशिंग मयत, त्याचेवारस बरदीचंद ऊर्फ सखाराम, रतनचंद ऊर्फ धोंडी, आणि काशीराम; पैकीं काशीराम हा अज्ञान, सबब त्याचें पालन करणार सखाराम व धोंडी.

दावा रुपये ३०००.

### ठराव.

एके व्यापारांत एका मनुष्याची पाती होती. ती शाबीत करण्याकरितां त्यानें फिर्याद केली. ती फिर्याद कनिष्टकोडतांनीं नामंजूर केली, कारण वादीनें अमुक रुपयांची पाती होती असा पुरावा केला नाहीं, परंतु सदर दिवाणी अदालतींत असें ठरलें.

कीं कनिष्टकोर्डतांनीं व्यापारांत वादीची कांहीं पाती होती, असें कबूल केलें, व ती पाती किती रुपयांची होती ह्याचा खुलासा प्रवादींचे हिशेबावरून झाला असता; परंतु त्यांनीं आपले हिशेब हजर केले नाहींत, सबब पाती किती रुपयांची होती ह्याविषयीं ठराव करणें तो वादीची प्रतिज्ञेवर जबानी घेऊन करावा.

---

अपिलेंट माणिकचंद ह्यानें नगर जिल्ह्यांतील सिंनर एथील मुनसफाचे कोर्डतांत ही फिर्याद केली. तींतील हांशील, कीं जेठीराम वल्लद जयशिंग ह्याचा व माझा करारनामा झाला आहे, त्यावरून दोन दुकानांत माझे चारआणे ह्मणजे चवथा हिस्सा आहे. तो शाबूत करण्याकरितां व त्याबद्दल मागील ऐवज मिळण्याकरितां ही फिर्याद केली आहे. जेठीरामाचे वारस सदरहू करारनामा कबूल करितात; परंतु माझा दावा शाबूत होऊंनये ह्मणून ते हरएक प्रकारें हरकत करितात.

तारीख २१ माहे फेब्रूवारी सन १८५१.

ह्यावर प्रतिवादीनें कांहीं जबाब दिला नाहीं. मुनसफाचे नजरेस असें आलें, कीं ज्याहिस्शा बद्दल तंटापडला आहे, तो हिस्सा माणिकचंदाचा होता, असें साक्षी पुराव्यावरून दिसतें, परंतु तो हिस्सा किती रुपयांचा होता, हें माणिकचंदानें शाबूत केले नाहीं, सबब त्यास जो खर्च झाला आहे त्यापेक्षां जास्त देवविण्याविषयीं ठराव करतां येत नाहीं.

पुढें जिल्हेजड्जाचे कोर्डतांत अपील झालें, तेव्हां त्यानें सदरहू ठराव कायम करून खर्च मात्र वादीवर घातला. तो अशा कारणावरून घातला, कीं वादीनें जो साक्षी पुरावा दिला आहे, त्यावरून दुकानांत त्याचा हिस्सा होता, असें दिसतें; परंतु त्याचे वतीनें निवाडा करावा, असें त्या पुराव्यावरून पुरतेंपणीं

उघड होत नाहीं. जड्जानें आणखी असें लिहिलें, कीं वादी जर भागीदार होता तर त्याकडून जितकी शाबुती झाली आहे त्यापेक्षां जास्त शाबुती होत नाहीं, हें चमत्कारिक आहे. ह्मणजे वादी जर भागीदार होता असें मानलें, तर दिपवाळीस दुकानचे हिशेबाची झडती होते, त्यासमयीं मी हजर होतों असा वादीनें पुरावा करावयाचा होता, व मी हलका पातीदार होतों असें वादी-च कबूल करितो, तेव्हां त्याजवळ सरकत नामा असावा. कारण दुकानांत हलक्या भागीदारांचा हिस्सा किती आहे, हें समजण्या-करितां सदरहू प्रकारचा दस्तऐवज करण्याची चाल आहे; अथ-वा निदान पक्षीं सरकत नामा झाला होता, इतका तरी त्याकडू-न पुरावा व्हावा. प्रतिवादींनी आपले हिशेब हजर केले नाहींत, ह्यावरून वादीचे दाव्यास मजबुती येते; परंतु त्याचे वतीनें नि-वाडा करण्या पुरती मजबुती येत नाहीं.

पुढें जिल्हेजड्जाचे निवाड्यावर सदर दिवाणी अदालतीं-त स्पेशल अपील घेण्याविषयीं वादीनें अर्जी केली, तेव्हां दुका-नांत अर्जदाराचा हिस्सा होता असें जड्जानें कबूल केलें असून अर्जदार ह्यास उत्पन्नांतील कांहीं हिस्सा देवविला नाहीं; तेव्हां हा ठराव कोडताचे वहिवाटीस व देशचालीस विरुद्ध आहे किंवा कसें, ह्याची चौकशी करण्याकरितां लिजिट् साहेब ह्यांनीं स्पेशल अपील मंजूर केलें.

नंतर लिजिट् साहेब ह्यांनींच ह्या मुकद्दम्याची प्रथम चौ-कशी केली. तेव्हां त्यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें अभिप्राय देऊन मुकद्दमा फुलकोडताकडे पाठविला.

“तात्यांतील कोडतांचे कागदपत्र पहातां त्यांनीं केलेले ठराव

फार विलक्षण दिसतात. अपिलेंट ह्याचा कांहीं हिस्सा दुका-नांत होता, ह्मणून कनिष्ठ कोडतांनीं कबूल केलें असें दिसतें; परंतु तो हिस्सा किती रुपयांचा होता, हें ठरविण्याकरितां वादीनें कोडतास कांहीं पुरावा दाखविला नाहीं, सबब त्याचा दावा ना-मंजूर झाला, आणि प्रतिवादींचे हिशेबांवरून सदरहू गोष्टीचा बहुतकरून खुलासा झाला असता; परंतु त्यांनीं आपले हिशे-ब हजर केले नाहींत; सबब त्यांनीं सर्व खर्च द्यावा असा मुन-सफाचे कोडतांत ठराव झाला, परंतु तो जड्जानें रद्द करून सर्व खर्च अपिलेंटावर घातला. कोणतेही मनुष्यास मिळकतीचा हिस्सेदार ठरवून त्यास त्या मिळकतीचे उत्पन्नाचा हिस्सा न देव-विणें ही गोष्ट, जें ज्याचें आहे तें त्यास न देवविणें ह्या गोष्टी सा-रखी आहे, आणि जें काम कोडतासमोर येतें त्याची चौकशी पुरी न करणें ही कोडताची कानु किंवा वहिवाट नव्हे, आणि हें कोडताचें कामही नव्हे. आह्मास वाटतें, कीं ज्या मिळकतीवर वादीचा हक्क कोडतांनीं ठरविला आहे, तीपैकीं आपणास किती मि-ळकत मिळावी हें जर त्याला साक्षी पुरावा देऊन शाबीत करतां आलें नाहीं, आणि प्रतिवादींनीं दुराग्रह धरून जर त्या गोष्टीचा खुलासा केला नाहीं, तर पंचाईतदार बोलावून ते वादीचा हिस्सा अमुक रुपयांचा होता ह्याविषयीं जो अभिप्राय देतील तो वाजवी समजून तितक्यावरूनच दाव्याचा निर्णय करावा हा उत्तम मार्ग आहे, आणि फुलकोडतानें विचार करून ही गोष्ट स्वीकारावी, ह्याकरितां मुकद्दमा त्याकडे पाठविला आहे.

फुलकोडतानें ह्यामुकदम्याची चौकशी केली, तेव्हां असा ठराव

झाला, कीं वादीचा कांहीं हिस्सा दुकानांत होता असें शाबूत झालें आहे; परंतु तो हिस्सा किती रुपयांचा होता हें प्रतिवादींनीं आपले हिशेब हजर न केल्यामुळें समजत नाहीं, सबब ह्याबद्दल वादीची प्रतिज्ञेवर जबानी घेऊन निर्णय केला पाहिजे. ह्याप्रमाणें ठराव करून फुलकोडतानें जिल्हेजड्जाचा हुकूमनामा रद्द केला, आणि तो पुनः चौकशी करण्याकरितां त्याकडे परत पाठविला, आणि त्यास लिहिलें, कीं नवीन हुकूमनामा करून त्यांत सदर दिवाणी अदालतींत झालेल्या खर्चाची हिस्सेरशी ठरवावी.

बेल साहेब व वार्डन साहेब व रीजिट् साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २९१७.

अपिलेंट्

**बाईजेनत बिबी अबदुलगनी ह्याची कन्या.**

रिस्पोंडेंट्.

**महंमद अलीबेग बाहादूर अलीबेग.**

दावा रुपये २००.

**ठराव.**

एकामनुष्यानें कांहीं जमीन विकत घेऊन त्या जमिनीचा तो भोगवटा करीत असतां दुसऱ्या मनुष्यानें वारसाचे संबंधानें त्यावर फिर्याद केली. त्या फिर्यादींत असें ठरलें, कीं बेचनपत्र नसलें तरी भोगवटा आणि बेचनाविषयीं तोंडचा पुरावा असला, ह्मणजे मुसलमानांचे शास्त्रावरून बेचन घेणाराचा दावा शाबीत आहे.

---

अपिलेंट् बाइ जेनत हिनें सुरत येथील मुनसफाचे कोड-

तारिख ३ सपबंर सन १८५१.

तांत फिर्याद केली, कीं मौजे कतर गांव परगणा चौऱ्याशी एथे ५५ बिघे जमीन होती, पैकीं ५१ बिघे जमीन विकली, बाकी ४ बिघे जमीन माझे आई कडून मला मिळाली, ती प्रतिवादी **महंमद अलीबेग** ह्यानें अन्यायानें घेतली आहे, सबब ती जमीन माझी मला मिळण्या करितां ही फिर्याद जमिनीचे वार्षिकसाऱ्याचे दसपटीची ह्मणजे २०० रुपायांची केली आहे.

प्रतिवादीनें जबाब दिला, कीं तंट्यांतलि जमीन **सयद्द महंमद्द इद्रुस** ह्याचे वारसांचे वहिवाटीस पुष्कळ वर्षे होती, व सन १८३३ इसवीसालीं त्या वारसांनीं जमीन **मुरार नागर** ह्यास विकली व सन १८४१ इसवी सालीं **मुरारनागर** ह्याकडून मी ती जमीन विकत घेतली, तेव्हांपासून मी त्या जमिनीचा एक सारखा भोगवटा करीत आहे, आणि वादीचा जर जमिनीवर हक्क होता तर तिनें इतके दिवस दावा कां केला नाहीं.

मुनसफाचे नजरेस असें आलें, कीं वादीच्या आईनें ह्मणजे **अबदुलरहिमान** ह्याचे बायकोनें वादीस दस्तऐवज लिहून दिला, कीं माझे मयत नवऱ्याचे जमिनीवरील माझा सर्व हक्क मीं तुला दिला आहे. तेव्हां त्या दस्तऐवजावरून वादीचा हक्क तंट्यांतील जमिनीवर बरोबर पोंहचतो, आणि परगणा चौऱ्याशीं एथील मामलेदाराचे सहीचे कांहीं हिशेबावरून व **कतर** गांवाच्या पाटलाच्या साक्षीवरून असें शाबीत झालें आहे, कीं तंट्यातील जमीन सदरहू जमिनीपैकीं आहे, आणि ज्या मनुष्या कडून प्रतिवादीनें तंट्यांतील जमीन विकत घेतली, त्या मनुष्यास **सयद्द महंमद्द इद्रुस** ह्याचे वारसांनीं ती जमीन विकली; परंतु **सयद्द महंमद्द इद्रुस** ह्याचे हातांत ती जमीन कशी गेली, हें प्र-

तिवादीनें शाबूत केलें नाहीं, सबब प्रतिवादीचा हक्क बरोबर पोंहचत नाहीं. ह्यास्तव जमीन वादीस द्यावी, ह्मणून ठराव करून खर्च प्रतिवादीवर घातला असे.

पुढें जड्जाचे कोडतांत अपील झालें, तेव्हां सदरहू ठराव रद्द झाला, कारण जड्जाचे नजरेस असें आलें, कीं वादीनें आपला वारसपणाचा हक्क शाबूत केला नाहीं, व प्रतिवादीनें जमीन विकत घेतल्याचा आपला हक्क शाबूत केला. जड्जानें मुकद्दम्याची हकीकत लिहिली ती येणेंप्रमाणें.

" तंटयांतील जमीन **अबदुल रहिमान** ह्याच्या जमीनीपैकीं आहे, ह्यांत संशय नाहीं; परंतु **अबदुल रहिमाना**च्या बायकोनें वादीस जो दस्तऐवज लिहून दिला आहे, त्यांत हा मजकूर नाहीं. सदरहू दस्तऐवजांत मौजे **कतर** गांव येथील ५१ बिघे जमिनीबद्दल व दुसरे एके गांवांतील १६ बिघे जमिनीबद्दल मात्र तपशील लावलेला आहे. **अबदुल रहिमाना**च्या वारसांमध्यें त्याचे सर्व जमिनीबद्दल वाद पडला होता, आणि त्या वारसांनीं जी फिर्याद केली त्या फिर्यादींत हल्लींचे तंटयांतील ४ बिघे जमिनीबद्दल तपशील लावलेला होता; परंतु त्या फिर्यादींतील प्रतिवादीनें त्या जमिनीबद्दल कांहीं तकरार केली नाहीं. शेवटीं वादी प्रतिवादी ह्यांनीं आपसांत तोड केली; परंतु पुढें वादीनें किंवा प्रतिवादीनें त्या जमिनीचा भोगवटा कधींतरी केला, असें दिसत नाहीं. आणि जेव्हां वकिलांनीं आपली फी वसुल करण्याकरितां त्या जमिनीवर टांच मारिली, तेव्हां **मुरार नागर** ह्मणजे ज्या मनुष्याकडून **महंमद अलीबेग** ह्यानें ती जमीन विकत घेतली त्यानें जमीन माझी आहे ह्मणून हरकत केली, त्यामुळें ती टांच उठली, आणि ह्याप्रमाणें पुष्कळ वेळां घडलें आहे.

**सय्यद शरीफ शेख** वल्लद **सय्यद महंमद इद्रुस** ह्यानें जबानी लिहून दिली, कीं ह्या फिर्यादीचे तारखेपूर्वी सुमारें ३० वर्षें झाली, तेव्हां माझा भाऊ **सय्यद जाफर** ह्यानें मला सांगितलें, कीं **अबदुल रहिमान** ह्यानें चार बिघे जमीन (तंटयांतील जमीन) आपले स्वाधीन केली, आणि मी जेव्हां आपले भावाबरोबर ती जमीन पहावयास गेलों, तेव्हां **आबदुल रहिमान** तेथें होता तो बोलला, कीं मी ही जमीन **महंमद जाफर** ह्यास दिली आहे. आतां ह्या खटल्यांत **सय्यद शरीफ शेख** ह्याचा कांहीं स्वार्थ नाहीं, व तो वयातीत झाला आहे, आणि मोठा प्रतिष्ठित आहे; ह्या करितां त्याचे साक्षीवर मोठा भरवसा ठेविला पाहिजे. आणि **महंमद अलीबेग** ह्याचा हक्क मंजूर होण्यास जें मुख्यत्वें करून कमी होतें, तें त्याच्या साक्षीनें पुरें झालें आहे.

**मुरार नागरास** ह्मणजे ज्या मनुष्याकडून **महंमद अलीबेग** ह्यानें जमीन विकत घेतली त्यास **सय्यद इद्रुस** ह्याचे वारसांनीं खरेदीपत्र लिहून दिलें, आणि त्या पत्रावरून जमीन त्याचे हातांत गेली, असें बरोबर शाबूत होतें. तळाटीचे हिशेबांत **अबदुल रहिमान** ह्याचेच नांवानें ती जमीन लागत आली आहे; परंतु ह्या गोष्टीवरून जमिनीवर अमुके मनुष्याचा हक्क आहे, किंवा जमीन अमुके मनुष्याचे वहिवाटीस आहे, असा निर्णय होत नाहीं; कारण जमिनीचे नवीन मालक आपलीं नावें सरकार हिशेबीं दाखल करवीत नाहींत, असें पुष्कळदां घडतें; आणि तंटयांतील जमीन धर्म दिली असल्यास तिचा सारा मुळचा मालकच देईल.

नंतर स्पेशल अपील घेण्याविषयीं वादीनें **सदर दिवाणी**

अदालतींत अर्ज केला. तो जानवार्डिन साहेब ह्यांनीं कबूल करून अभिप्राय लिहिला तो येणें प्रमाणें.

" तंटयांतील जमीन अबदुल रहिमान ह्याच्या जमिनी पैकीं आहे, असें ह्यामुकद्दम्यांत ताब्यांतील कोडतांनीं कबूल केलें आहे, व ती जमीन सरकार हिशेबीं अबदुल रहिमान ह्याचे नावें दाखल आहे. अपिलेंट् हिचें ह्मणणें असें आहे, कीं मी आबदुल रहिमान ह्याची वारस ह्मणून जमिनीचा सारा देत असतें. अबदुल रहिमान ह्याच्या बायकोनें अपिलेंट् हिला दस्तऐवज लिहून दिला, कीं मीं आपले नवऱ्याची सर्व जमीन तुझे स्वाधीन केली आहे, त्या दस्तऐवजावरून अपिलेंट् तंटयांतील जमिनीवर दावा करीत आहे; आणि सय्यद जाफर ह्याकडून मुरार नागर ह्यानें तंटयांतील जमीन विकत घेऊन रिस्पोंडेंट् ह्यास विकत दिली; त्यावरून रिस्पोंडेंट् हा त्या जमिनीवर दावा करीत आहे, आणि मुळचा मालक अबदुल रहिमान ह्मणजे ज्याची वारस सध्या अपिलेंट् आहे, त्यानें तंटयांतील जमीन सय्यद जाफर ह्यास दिली अशी जाफर ह्याच्या भावानें मुनसफाचे कोडतांत जबानी लिहून दिली आहे.

" ज्या दस्तऐवजावरून अपिलेंट् दावा करीत आहे, त्या दस्तऐवजांत तंटयांतील जमिनीचा तपशील लागला नाहीं, असें जिल्हेजड्जाचे नजरेस आल्यावरून त्यानें मुख्यत्वें ह्याचकारणावरून असें ठरविलें, कीं अपिलेंट् हिचा हक्क शाबूत झाला नाहीं, आणि रिस्पोंडेंट् ह्यानें ती जमीन विकत घेतल्याचा पुरावा केल्यावरून जिल्हेजड्जानें ती जमीन रिस्पोंडेंट् ह्याची आहे असा ठराव केला.

" ज्या जमिनींपैकीं तंटयांतील जमीन आहे, त्या जमिनीचा

वारस **अपिलेंट्** उघड आहे, तेव्हां वहिवाट पाहिली असतां असें दिसतें, कीं **रिस्पोंडेंट्** ह्यानें तंटच्यांतील जमीन विकत घेतल्याबद्दल पुरावा करावा इतकेंच नाहीं, तर **अबदुल रहिमान** ह्याच्या सर्व जमिनीबद्दल **अपिलेंट्** हीजवळ जो कवाला आहे तो रद्द होण्यासारखा कवाला तंटच्यांतील जमीन ज्या जमिनीचा सारा **अपिलेंट्** देत असते तीबद्दल **मुरार नागर** ह्यापाशीं होता असें ही **रिस्पोंडेंट्** ह्यानें शाबूत केलें पाहिजे. तेव्हां अशी शाबूती होणें जरूर आहे किंवा कसें, ह्याचा ठराव करण्याकरितां स्पेशल अपील घेतलें आहे.

हा मुकद्दमा फुल कोडताकडे आल्यावर त्यानें सन १८४३ चा अकट् ३ कलम ८ ह्या अन्वयें सदरहू सरटिफिकेट दुरुस्त केलें. तें असें, कीं ताब्यांतलि कोडतानें लेखी पुरावा नसतां जमिनीवरील हक्क कबूल केला ही गोष्ट वहिवाटीस व देशचालीस विरुद्ध आहे किंवा कसें, ह्याची चौकशी करण्यारितां स्पेशल अपील घेतलें आहे.

लिजिट् साहेब ग्रांट् साहेब व लार्किन साहेब.

नंतर ह्या कलमाबद्दल असा ठराव झाला, कीं **अबदुल रहिमान** ह्यानें **सय्यद जाफर** ह्यास जमींन विकल्याबद्दल जरी खरेदीपत्र नाहीं, तरी इतर पुराव्या वरून असें शाबूत झालें आहे, कीं तंटच्यांतील जमीन **सय्यद जाफर** ह्याकडे व त्याकडून ज्यांस मिळाली त्यांकडे होती. मिळाल्याबद्दल लेखी पुरावा नसून तोंडचा पुरावा असेल, आणि भोगवटा असेल, तर मुसलमान लोकांच्या शास्त्राप्रमाणें भोगवटा करणाऱ्या मनुष्याचा हक्क मंजूर होतो, सबब जिल्हेजड्जाचे हुकूमनाम्यांत हात घालण्यास कांहीं कारण दिसत नाहीं, ह्याप्रमाणें ठराव करून **सदर दिवाणी अदालतीनें** अपील रद्द करून सर्व खर्च **अपिलेंट्** हीवर घातला.

## स्पेशल अपील नंबर २५९२.

अपिलेंट्

सागरबाई कोम आत्माराम व तिचा

पुत्र ग्यानीराम बिन आत्माराम.

रिस्पोंडेंट्

शंभुदास बावा मयत, ह्याचा वारस पुत्र लक्ष्मण

दास आज्ञान, पालन करणार त्याची आई रामकुवर.

दावा रुपये ५०.

### ठराव.

एकादी गोष्ट कायद्याप्रमाणें पुरावा होऊन शाबीत झाली असतां ती अदालतीचा शास्त्री ह्याचे तोंडचे अभिप्रायावरून रद्द होणार नाहीं.

तारीख ४ सप्टेंबर सन १८५१ इसवी

शंभुदास ह्यानें फिर्याद केली, कीं पेशवे ह्यांनीं गोंदेरावास पुणे शहरांत वेताळ पेठेंत एक घर दिलें. गोंदेरावास संतती नव्हती, सबब त्यानें माझे बापास दत्तक घेऊन त्याला आपली घरसुद्धां सर्व जिनगी दिली; पुढें ती जिनगी मला मिळाली. माझी आत, सागरबाई व आतेभाऊ ग्यानीराम ह्यांस मीं वीस वर्षें पावेतों सदरहू घरांत राहूं दिलें असून आलीकडे ते आपला मालकीचा हक्क त्यावर शाबीत करण्याचे बेतांत आहेत, तर त्यांस घरांतून काढावें.

सागरबाईनें जाब दिला, कीं गोंदेराव ह्यास जोराबाई

ह्मणून एक मुलगी होती. तिला दोन पुत्र होते, त्यांपैकीं वादा **शंभुदास** ह्याचा बाप हा एक, व दोन मुली होत्या त्यांपैकीं एक मी आहे. **जोराबाई** हिला तिचे बापापासून सदरहू घर वारशानें प्राप्त झालें, तें तिनें मरण्यापूर्वी आपले मुलांपैकीं दरएक पुत्रास खण ४ व दरमुलीस खण दोन असें वांटून दिलें. त्यांत जो हिस्सा माझे वांटणीस आला, त्याचा भोगवटा मालकीनें मी सुमारें पंचाहत्तर वर्षे करीत आहे.

**पुणें** एथील प्रिन्सिपाल सदर अमिनानें ह्या खटल्याची चौकशी करून निवाडा केला, कीं वादीनें आपणासच सर्व घराची मालकी मिळाली ह्याविषयीं जी हकीकत लिहून दिली आहे, तीपैकीं कांहीं त्याच्यानें शाबीत झालें नाहीं, उलटें साक्षी पुराव्यावरून असें ठरतें, कीं पक्षकार ज्या गोसाव्यांचे पंथांतले आहेत, त्या पंथाचे लोकांत मुलें दत्तक घेण्याची वहिवाट नाहीं, व असें शाबीत होतें, कीं वादी व प्रतिवादी ह्या उभयतांचे भोगवट्यास पुष्कळ वर्षें घर आहे, सबब कायद्याप्रमाणें दोन्ही पक्षकारांचा त्या घरावर मजबूत हक्क पोंचतो, व प्रतिवादीही वादीचे परवानगीनें रहात नव्हती; तर मालक ह्मणून ४०,५०, वर्षें त्यांत रहात आली आहे, ह्याकरितां वादीचा दावा रद्द आहे.

ह्यानिवाड्यावर वादीनें आसिस्टन्ट जड्जाचे कोडतांत अपील केलें, तेव्हां त्यानें मुकद्दम्याची चौकशी करते समयीं **पुणें अदालतीचा** शास्त्री ह्यास तोंडीं सव्वाल घालून त्यांचे जबाब घेतले, त्यांत मुलें दत्तक घेणें हें पक्षकारांचे जातीचे चालीविरुद्ध नाहीं असें ठरलें. शिवाय पांच वृद्धमनुष्यांनीं आमचे समक्ष **गोंदेराव** ह्यानें **शंभुदास** ह्याचे बापास दत्तक घेतलें, ह्याप्रमाणें साफ लिहून दिलें. त्यावरून असिस्टनानें हुकूमनामा केला, कीं

**गोंदेराव** ह्यानें मुलगा दत्तक घेतला, तेव्हां त्यामुलाची आई **जोराबाई** हिला **गोंदेराव** ह्याचे सदरहू घराची वांटणी करण्याचा अधिकार राहिला नाहीं, सबब तिनें आपली मुलगी **सागरबाई** हिला त्याघराचा हिस्सा दिला असो अगर नसो त्यांत कांहीं अर्थ नाहीं; व **सागरबाई** ह्मणते तितके दिवस ती घरांत आहे, असें शाबीत झालें तरी कांहीं उपयोग नाहीं. ह्यास्तव प्रिन्सिपाल सदर अमिनानें केलेला निवाडा रद्द असे.

पुढें प्रतिवादींनीं जिल्हाजड्जाकडे अपील केलें, तेव्हां जड्जानें चौकशी करून लिहिलें, कीं आसिस्टन जड्जानें जो निवाडा केला तो अगदीं बरोबर आहे, व त्यानें आणखी असें लिहिलें, कीं **शंभुदास** ह्याचे बापास **गोंदेराव** ह्यानें दत्तकघेतलें ही गोष्ट जरी नाशाबीत झटली तरी वारसपणानें **शंभुदासा**चाच त्या घरावर हक्क पोंहचतो. आतां कुटुंबाची स्थावर मिळकत (ह्मणजे तंटचांतील घर) ह्याचीवांटणी करण्याचा अधिकार आपले आईला (**जोराबाईला**) होता व तिनें तें घर मला दिलें, ह्याप्रमाणें **सागरबाई** शाबीत करी तोंपर्यंत तिचा वडीलभाऊ (वादीचा बाप) ह्याच्या हक्कास व्यत्यय येणार नाहीं.

नंतर प्रतिवादींनीं **सदर दिवाणी अदालती**स अर्ज केला.

बेल साहेब.

तेव्हां **अपिलेंट्** (प्रतिवादी) ह्यांनीं घरावर आपला ५० वर्षांचा भोगवटा शाबीत केला आहे, ह्यास्तव कायद्यावरून त्यांचा हक्क घरावर पोंहचतो किंवा कसें, व **रिस्पोंडेंट्** (वादी) ह्याचे बापाचे दत्तविधानानें मामूल चालीवरून घरावर त्याचा हक्क पोंचतो किंवा कसें, ह्या दोन कलमांचीं चौकशी होण्याकरितां **स्पेशल अपील** मंजूर झालें.

फुलकोडतानें सदरहू बाबदींत चौकशी करून ठराव केला, कीं गोसाव्यांचे जातींत दत्तविधान होत नाहीं, हीं गोष्ट कायद्याप्रमाणें साक्षीपुरावा होऊन कनिष्ठ कोडतांत शाबीत झाली असतां, ती असिस्टन जड्जानें शास्त्री ह्याचे तोंडचे अभिप्रायावरून रद्द केली, हें बरोबर नाहीं, ह्याप्रमाणें एक कलमाचा उलगडा झाला, सबब दुसरे कलमाचा विचार करण्याचें कारण नाहीं. ह्यास्तव जिल्हाजड्ज व असिस्टन जड्ज ह्यांचे हुकूमनामे रद्द करून अक्टिंग प्रिन्सिपाल सदर अमीन ह्याचा निवाडा बहाल केला असे.

लिजिट्‌ साहेब, ग्रांट साहेब आणि लॉकिन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २७९५.

अपिलेंट्

भाऊ आणिं च्मिणाजी बिन बगोजी वगैरे.

रिस्पोंडेंट्

भाऊ वल्लद गुणाजी

दावा रुपये ७५.

### ठराव.

पासोडी जमिनीचें उत्पन्न पाटिलकीचे प्राप्तीपैकीं आहे, आणि सन १८४३च्या ११व्या आक्टा अन्वयें त्या उत्पन्नाची वांटणी करण्याचें काम कलेक्टराचें आहे, ह्मणून दिवाणी कोडतास त्याबद्दल चौकशी करण्याचा अखत्यार नाहीं.

ह्या मुकद्दम्यांत **भाऊ** वल्लद **गुणाजीनें** फिर्याद केली, कीं एक दाहा* मण पासोडी जमीन आहे, ती पैकीं ५ मण माझे भाऊबंदांकडे आहे. बाकीचे ५ मणांपैकीं २॥ मण माझे व २॥ मण प्रतिवादी **च्चिमाजी** बिन **बगोजी** **गुंडाजी** बिन **परसोजी** पाटील, व **भाऊ** बिन **बगोजी** ह्यांचे आहेत. पासोडिची वहिवाट ते त्रिवर्ग करतात, व ती त्यांचे नावें दप्तरांत दाखल आहे, ह्यामुळें ५, ६ वर्षे त्यांनीं माझी तक्षीम बळकाविली आहे. माझी तक्षीम २२ एकर २४$\frac{1}{2}$ गुंठे व एक आणा आहे, आणि तींत उत्पन्न साडेसात रुपयांचें होतें, ह्याकरितां सदरहू किमतीचे दसपट रुपये ७५ ह्यांचा दावा केला आहे, तर माझी तक्षीम मला देववावी.

तारीख १८ बर सन १८५१ इसवी.

आमचे कुटुंबांतील वडील घराण्यांत सदरहू पासोडी जमीन आज आठ पिढ्या चालत आली आहे, आणि वडिल घराण्यांतील मुख्यपुरुष **भाऊ** बिन **बगोजी** आहे, ह्यास्तव सर्व जमिनीवर त्याची मालकी आहे, ह्याप्रमाणें प्रतिवादींनीं प्रथम जबाब दिला, पुढें पुरवणी जबाब दिला, कीं हल्लीं **भाऊ** बिन **बगोजी** मयत, झाल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ **च्चिमणाजी** बिन **बगोजी** ह्याची ती जमीन झाली, आणि कुटुंबांतील मुख्यपुरुष पाटिलकीचें काम वहिवाटतो, ह्यास्तव त्याचाच हक्क त्या जमिनीवर आहे, व असा प्रकार असून वादीनें त्या जमिनीवरील आपला दावाही सोडला आहे, ह्याविषयीं आह्मीं पुरावा करूं.

**पुण्यांतील** मुनसफानें ह्यामुकद्दम्याचा इनसाफ करून ठराव केला, कीं सदरहू पासोडी जमिनीपैकीं आपला वाटा मिळण्या-

---

* मण जमिनीचें एक माप आहे.

करितां एका भावाबंदानें मागें फिर्याद केली होती, तेव्हां त्याला त्याचा वांटा द्यावा ह्मणून ठराव झाला, ह्यावरून असें दिसतें, कीं सदरहू जमिनीची वांटणी करण्यास हरकत नाहीं; व अकटिंग् फस्ट असिस्टन् कलेक्टरानें दिलेलें कौलपत्र व दुसरे दस्तऐवज वादीनें पुराव्यास हजर केले, ह्यांवरून वादी पूर्वी पाटिलकीचें काम करीत असून त्याबद्दल प्राप्तिही घेत होता; असें दिसून येतें. आणि इनामांत हल्लीं जी पासोडी जमीन धरली आहे ती चाकरी-बद्दल चालते असें नजरेस येतें. ह्या सर्व गोष्टींवरून वादीचा हक्क शाबीत होतो. आतां भाऊ बिन बगोजी ह्याचेनावें जमीन लागली आहे, त्यास एवढेच कारणावरून वादीचा हक्क नाहींसा होत नाहीं; सबब त्याचे तर्फे निवाडा केला आहे.

पुढें अपील झालें, तेव्हां असिस्टन जड्जानें ठराव केला, कीं जो साक्षी पुरावा झाला आहे, त्यावरून प्रतिवादीचा पक्ष खरा आहे, असें कोडताचे नजरेस येतें, ह्याकरितां मुनसफाचा निवाडा रद्द केला आहे. त्यावर जिल्हाजड्जाकडे अपील झालें, तेंव्हां त्यानें ठराव केला, कीं मुनसफानें जीं कारणें लिहिलीं आहेत त्यांवरून, व सदरहू पासोडी जमिनीचा कांहीं भाग प्रतिवादींनीं तो आपले ताब्यांत घेण्यापूर्वी वादीचे भोगवटच्यास होता असेंही शाबीत झालें आहे, ह्यावरून वादीनें केलेला दावा वाजवी आहे, सबब मुनसफाचा निवाडा काईम केला असे.

लिजिट् साहेब.

"पाटलाचे कुटुंबांतील जो मनुष्य पाटिलकीचें काम करतो त्याकडे पासोडी जमीन भोगवटच्यास असत नाहीं कीं काय, व ती जमीन कुटुंबांत वांटली जात नाहीं कीं काय, आणि सन १८४३चे ११व्या अक्टाचे ११व्या कलमा अन्वयें तीबद्दल दिवाणींत फिर्याद चालत नाहीं,

किंवा कसें, ह्यागोष्टींची चौकशी करण्याकरितां **सदर दिवाणी अदालतींत** स्पेशल अपील मंजूर झालें. नंतर हा मुकद्दमा फुलकोडतानें तपासून ठराव केला, का पाटिलकीचे प्राप्तीपैकींच पासोडी जमीन आहे, असें पक्षकारांचे कबुलायतीवरून होतें, व सन १८४३चा अक्ट नंबर ११ ह्याप्रमाणें तिचे उत्पन्नाची वांटणी करण्याचें काम कलेकटराचें आहे, ह्मणून त्याउत्पन्नांतील तक्सीम घेण्याबद्दल हल्लींची फिर्याद असल्यामुळें तिची चौकशी दिवाणी कोडतांत होणार नाहीं, सबब जिल्हा जड्जाचा निवाडा रद्द करून सर्व खर्च वादीवर घातला असे.

वार्डिन् साहेब लिजिट साहेब आणि लार्किन् साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८६३.

अपिलेंट्

**पनीराम** बिन **हिरानंद** मुनीम निसबत

**हिरानंद शालिग्राम.**

रिस्पोंडेंट्

**मुळचंद सुरचंद.**

दावा रुपये ४२८१२८९.

**ठराव.**

चालते खान्यावरून पैसा घेणें निघत होता तो व त्याचें व्याज वसूल व्हावें, ह्मणून फिर्याद झाली; तेव्हां स्पेशल अपिलांत असा ठराव झाला, कीं सन १८३९च्या ३२व्या अकूटाअन्वयें

व्याजाबद्दल वादीनें नोटीस दिली नाहीं, व सन १८२७चा कायदा ५ कलम १० रकम २ हीप्रमाणें व्याज घेणें खरें आहे, असें देवघेवींतील कोणतेही प्रकारावरून शाबीद झालें नाहीं, सबब सदरहू पैशाबद्दल व्याज मिळणार नाहीं.

चालते खात्यावरून २१६१४ बाकी निघते, ती व तिचें आणि दुसरे कांहीं रकमेचें व्याज मिळून एकंदर रुपये ६२ होतात, ते मला **मुळचंद** ह्याकडून देववावे, ह्मणून **अपिलेंट पनोराम** ह्यानें फिर्याद केली. **मुळचंद** जबाब देण्यास कोडतासमोर हजर झाला नाहीं.

ता० १८ डिसेंबर सन १८५१ इसवी

**बारामतीचे** सदर अमिनानें ह्या खटल्याची चौकशी करून निवाडा केला, कीं चालते खात्यावरून जितकी रकम घेणें निघते तितकी वादीस मिळेल; परंतु व्याजाबद्दल दस्तऐवज कांहीं नाहीं, सबब तें मिळावयाचें नाहीं.

पुढें अपिलांत असिस्टंनू जड्जानें असें लिहिलें, कीं चालते खात्याचे व्यवहारांत व्याजघेण्याविषयीं देशरूढी आहे, व सन १८२७चा कायदा ५ कलम १० रकम २ हींतील ठरावावरून ही व्याज न द्यावें असें होत नाहीं, सबब त्यानें सदर अमिनाचा निवाडा दुरुस्त करून वादीस व्याज मिळावें असें ठरवून अव्वलपासून झालेला खर्च प्रतिवादीवर घातला.

ह्यावर जिल्हाजड्जाकडे अपील झाल्यावर त्यानें असिस्टंनू जड्जाचा निवाडा रद्द करून मुनसफाचा निवाडा बहाल केला, त्यानें असें कारण लावलें, कीं दक्षिणेंत सावकारांची अशी चाल आहे, कीं जें काय व्याज देण्याचा ठराव होतो तें व्याज देवघेवीच्या वेळेस लिहून देतात, किंवा दिपवाळीस तें हिशोबीं दाखल

करतात, परंतु असा कांहीं प्रकार ह्या खटल्यांत दृष्टीस पडत नाहीं. जड्जानें आणखी असें लिहिलें, कीं आमच्या ह्या विचारास स्टीलसाहिबाच्या समरीचा आधार आहे. ( २८५ आणि २८६ हीं पत्रें पहा. )

सदरहू ठरावास राजी न होऊन पन्नीराम ह्यानें सदर दिवाणी अदालतीस अर्ज केला, तेव्हां करारनामा नसतां चालते खात्यावरून व्याज मागणें हें सावकारांचे रिवाजास विरुद्ध आहे, किंवा कसें, ह्याविषयीं चौकशी करण्या करितां स्पेशल अपील मंजुर होऊन फुलकोडतानें त्याबद्दल इनसाफ करून अभिप्राय दिला, कीं सन १८३९चा अकट नंबर ३२ ह्या अन्वयें स्पेशल अपिलेंटानें व्याजाबद्दल नोटीस दिली, असें कोडतास दिसत नाहीं; अगर तें व्याज घेणें निघतें असें सन १८२७ चा कायदा ५ कलम १० रकम २ हीप्रमाणें कोणतेही प्रकारें नजरेस येतनाहीं. ह्यास्तव सदर अमिनानें फिर्यादींतले रकमेचे व्याज ना कबूल केलें तें बरोबर आहे, आणि ज्यारी कायद्यापुढें सावकारांची चाल प्रधान नाहीं, सबब तीविषयीं ह्या खटल्यांत विचारच उत्पन्न होत नाहीं. ह्या सर्व कारणांवरून अपील रद्द केलें असें.

ग्रांटसाहिब

वार्डिन साहेब लिजिट् साहेब व लार्किन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २९४७.

अपिलेंट्

**फकिरापा हेबाल निसबत केंचनगवडा बहादूर देसाई.**

रिस्पोंडेंट्

## मुजियाना डोलिन मयत ह्याचे वारसपुत्र सुरिया, सिद्दा, व भैरू.

दावा रुपये १३६.

### ठराव.

कोणी एका शेतसंदी चाकरानें आपली चाकरी बजाविली नाहीं, ह्मणून त्याकडे चाकरीबद्दल जी जमीन होती तिचें उत्पन्न परत घेण्याकरितां इनामदारानें त्यावर मामलेदाराकडे फिर्याद केली. पुढें अपिलांत कलेकटूरानें ठराव केला, कीं ह्या खटल्याबद्दल फिर्याद माजिस्त्रेटाकडे करावयाला पाहिजे होती, कारण ह्या खटल्याचा निवाडा करण्याचें काम केवळ माजिस्त्रेटाचें आहे. पुढें स्पेशल अपील झालें, तेव्हां सदर अदालतीनें ठराव केला, कीं कलेकटूरानें जो निवाडा केला हा गैरशिस्त आहे, कारण हक्काबद्दल तंटा पडला असतां त्याचा निवाडा करण्याचें काम त्याचें नव्हे.

तारीख १८ डिजेंबर सन १८५१ इ०

धारवाड एथील मामलेदाराकडे फकिरापा ह्यानें फिर्याद केली, कीं मुजियाना हा शेतसंदी चाकर आहे, आणि त्याबद्दल त्याकडे जमीन आहे. त्यानें चाकरी न करितां जमिनीचें उत्पन्न ४ वर्षे खालें आहे, तर तें त्याकडून मला देववावें.

त्यावर प्रतिवादीनें जबाब दिला, कीं तंट्यांतील जमीन ज्या इनामगांवापैकीं आहे त्यागावांतील चवथा हिस्सा मात्र वादीचा आहे, बाकीचा गांव सरकारचा आहे; आणि मी वादीचा चाकर नाहीं, तर सरकारचा शेतसंदी चाकर आहे, आणि त्याबद्दल मला जमीन मिळाली आहे; सबब मजवर फिर्याद करण्याचा अखत्यार वादी ह्यास नाहीं, व कांहीं दिवसांपूर्वी वादीनें सदरहू जमिनीचें उत्पन्न घेतलें होतें तें कलेकटूरानें मला त्याकडून देवविलें.

मामलेदारानें ह्या खटल्याची चौकशी करून ठराव केला, तो असा, कीं बादशाहानें दिलेली सनद वादीनें पुराव्यास हजर केली, तीवरून वादीचे पूर्वजांस सदरहू गांव कुलबाब व कुलकानू इनाम मिळालेला आहे, असें शाबीत होतें; व आणखी असा पुरावा होतो, कीं प्रतिवादी वादीचा चाकर आहे, आणि त्याला पाहिजे तेव्हां वादी घालविण्यास मुखत्यार आहे, व जी चाकरी करण्या बद्दल प्रतिवादीस जमीन मिळाली ती चाकरी केली नसतां आपणास जबाब द्यावा लागेल अशी प्रतिवादीची खातरी असतांही त्यानें चाकरी केली नाहीं. आतां त्याची सदरहू खातरी होती, हें त्यानें आपसांत तोडजोड पाडण्याविषयीं बोलणें लावलें होतें, ह्यावरून स्पष्ट होतें: ह्याकरितां वादीचा दावा बरोबर आहे. तर त्याला दाव्याबद्दल रुपये मिळावे.

ह्यावर कलेकट्राकडे अपील झालें, तेव्हां त्यानें ठराव केला, कीं शेतसंदी चाकर माजिस्त्रेटाचे होत, आणि त्यांस ज्या जमिनी लावून दिलेल्या आहेत त्यांवर माजिस्त्रेटाचाच अधिकार आहे; सबब शेत संदीनें चाकरी न केल्या बद्दल फिर्याद वादीनें माजिस्त्रेटाकडे करावयाची होती, परंतु तसें झालें नाहीं, सबब मामलेदारानें केलेला निवाडा रद्द असे.

नंतर सदर दिवाणी अदालतींत स्पेशल अपील झाले. तेव्हां सन १८४३चा अकट नंबर १२ ह्यांतील ठरावाप्रमाणें ह्या मुकद्दम्यांतील कागद पत्र कलेकट्रानें इंग्रेजींत लिहिले नव्हते, ह्मणून त्या अकट्रा अन्वयें तजविज होण्या करितां सदरहू कोर्डतानें मुकद्दमा कलेकट्राकडे परत पाठविला. त्यावेळेस धारवाड जिल्ह्यांत दुसरा कलेकट्र आला होता, त्यानें सदरहू बद्दल चौकशी करून पहिल्या कलेकट्राचा निवाडा कायम

ठेविला. त्यानें असें लिहिलें, कीं शेत संदीनें आपलें काम न केल्याबद्दल **फकिरापा** ह्यानें कलेकटूर व माजिस्त्रेट ह्यांकडे फिर्याद करावयाची होती. ह्मणजे तिकडून बंदोबस्त झाला असता; परंतु त्या प्रमाणें त्यानें केलें नाहीं, सबब पूर्वींचे कलेकटूरानें केलेला ठराव बरावर आहे, ह्या करितां तोच काईम केला असे.

**फकिरापानें सद्र दिवाणी अदालतींत** पुनः अर्ज करून जाहीर केलें, कीं मी गांवचा इनामदार आहे; आणि असें जें लिहिलें आहे, कीं **मुजियाना** वतनदार चाकर आहे, तें अगदीं खोटें आहे. त्यावरून **लिजिट्** साहेबांनीं अशा कारणा वरून अपील मंजूर केलें, कीं पाहिजे तेंव्हां प्रतिवादी कडून सदरहू जमीन काढण्या जोगा तीवर वादीचा हक्क नाहीं असा जो ठराव कलेकटूरानें केला तो बरोबर आहे, किंवा कसें, ह्या कलमाची चौकशी झाली पाहिजे, मग ह्याकलमाविषयीं फुल कोडातानें अभिप्राय लिहिला, तो येणें प्रमाणें.

वॉडिन साहेब लिजिट साहेब आणि लाकिन साहेब.

**रिस्पोंडेंट्** हा आपला चाकर ह्मणून त्याला चाकरी बद्दल दिलेली जमीन परत घेण्या करितां **स्पेशल अॅपिलेंटानें** मामले दाराकडे फिर्याद केल्या वरून त्यानें **अॅपेलेंटाचा** दावा कबूल केला, त्यावरून **रिस्पोंडेंट्** ह्यानें कलेकटूराकडे अपील केले, तेंव्हां त्यानें ठराव केला, कीं **रिस्पोंडेंट्** हा **अपिलेंटाचा** चाकर नसून कलेकटूराचे हुकमतींतील जमिनीची वहिवाट करीत आहे.

सन १८२७चा कायदा १७ व सन १८३८चा अकटू नंबर १६ ह्यां अन्वये सदरहू हक्का बद्दल तंटयाची चौकशी करून

तोडण्याचा अखत्यार कलेक्टरास नाहीं, ह्याकरितां **रिस्पोंडेंट्** ह्याकडून जमीन काढण्या जोगा त्या जमिनीवर स्पेशल अपीलेंटाचा हक्क पोहंचत नाहीं, असा हुकूम कलेक्टरानें केला, तो गैरवाजवी आहे, ह्मणून तो हुकूम रद्द करून **रिस्पोंडेंट्** ह्यावर खर्च घातला असे.

---

## स्पेशल अपील नंबर. २९१८.

अपिलेंट्

**लालाभाना** मयत, त्याचा वारसपुत्र **लखन**,

व पालनकरणार त्याची आई, **बाई तेजकूवर**.

रिस्पोंडेंट्.

**मुळजी रूपशिंग**.

दावा रुपये २३६४६३.

### ठराव.

**अ** ह्यानें आपला हुकूमनामा **क** ह्यावर करून घेतल्यावर **क**नें आपली मिळकत **ड** ह्याकडे गहाण लाविली. पुढें त्या मिळकतीवर **अ**नें टांच बसाविल्या वरून, ती खुली व्हावी ह्मणून **ड**नें फिर्याद केली, तेव्हां **स्पेशल** अपीलांत **सदर दिवाणी अदालतीनें** ठराव केला, कीं हुकूमनामा झाला असला तरी प्रतिवादीस आपले मिळकतीवर टांच बसण्यापूर्वी तिची पाहिजेतशी व्यवस्था करण्याची मोकळीक आहे.

**मुळजी रूपजीनें वसंजी लालाभाईवर** आपला हुकूमनामा करून घेतला होता, आणि त्यावरून त्यानें **वसंजीचा** देसाईगिरीचे उत्पन्नांत तिसरा हिस्सा होता त्यावर टांच मारली, तेव्हां **लाला भानानें** फिर्याद केली, कीं **वसंजी लाला भाई** व दुसरे दोन भागीदार ह्यांनीं देसाईगिरीचे उत्पन्नाचा सदरहू हिस्सा व आणखी कांहीं दुसरी मिळकत मजकडे व **शामजी जगूकडे** गहाण लावून दिली आहे, सबब टांच दूर व्हावी. त्यानें अर्जांत आणखी असें लिहिलें होतें, कीं **शामजी जगूनें** आपले हिश्शाचे दाव्याची अखत्यारी मला दिली आहे.

तारिख १३ माहे फेब्रुवारी सन १८५२ इसवी.

ह्यावर **मुळजी रूपजीनें** जबाब दिला, कीं ज्या गहाण खतावरून ही फिर्याद झाली, तें खत, मीं आपला हुकूमनामा **वसंजी लालाभाईवर** करून घेतल्यानंतर झालेलें आहे, व त्यांतील करारही पुरे झाले नाहींत, तेव्हां माझा हक्क बुडविण्या करितां तें खत बनावट केलें आहे, हें उघड आहे.

**सुरत** शहरचे मुनसफानें ह्या मुकद्दम्याची चौकशी करून ठराव केला, कीं देसाईगिरीचे उत्पन्नांत **वसंजीचे** जे भागीदार आहेत त्यांनीं त्याबरोबर आपले हिस्से वादीला कर्जाबद्दल गहाण लावून दिले आहेत; ह्यावरून त्या कर्जांत लबाडी झाली नाहीं, असें दिसतें. कारण जर लबाडी असती तर **वसंजीचे** भागीदारांनीं आपले हिस्से गहाण कधीं लावून दिले नसते. तेव्हां वरील व्यवहारांत कपट नाहीं, असें ह्मटलें पाहिजे, व **मुळजी रूपजीनें** आपलें कूळ **वसंजी** ह्यावर हुकूमनामा करून घेतांच त्याचे मिळकतीवर टांच बसविली नाहीं, ही त्याची चूक आहे; सबब टांच दूर व्हावी.

ह्या ठरावावर असिस्टन् जड्जाचे कोडतांत अपील झाल्यावर त्यानें खटल्याची चौकशीकरून ठराव केला, तो येणेंप्रमाणें. ज्या गहाण खतावरून हल्लींची फिर्याद झाली त्यांत कपट दिसत नाहीं, असा मुनसफानें ठराव केला, परंतु कोडताचे नजरेस तसें येत नाहीं. कारण, कीं **मुलजीनें वसंजीवर** हुकूमनामा करून घेतला, हा मजकूर **वसंजीला** ठाऊक नव्हता असें कोणतेही प्रकारें दिसून येत नाहीं. असें असून आपणास कर्ज नसतां कांहीं तरी कर्ज दाखविण्याकरितां **वसंजीनें** आपली मिळकत तिऱ्हाईत मनुष्य **लालाभाना** ह्यास सदरहू हुकूमनामा झाल्यावर जाणून बुजून गहाण लावून दिली; तेव्हां **वसंजीनें** हें काम आपला पहिला सावकार **मुळजी** ह्यास बुडविण्या करितां केलें, ह्याविषयीं बिलकुल अंदेशा नाहीं. **सदर दिवाणी अदालती**चे निवडक मोकद्दम्यांपैकीं ९वे व १०वे नंबरांत असें ठरलें आहे, कीं बापावर झालेल्या हुकूमनाम्याचें देणें असतां पुत्रास मालमत्ता कोणास देण्यास अखत्यार नाहीं; तेव्हां एखाद्यावर हुकूमनामा झाला असतां त्यास तर सावकाराचें नुकसान करून आपली मिळकत दुसऱ्यास गहाण वगैरे लावून देण्याचा अखत्यार अगदींच नाहीं. सरदहू मिळकत ज्या ऐवजा बद्दल गहाण पडली आहे तो ऐवज शेवटीं पटला किंवा नाहीं, ह्याविषयीं शोधकरण्याची जरूरी नाहीं, कारण, कीं आपणावर हुकूमनामा झाला आहे व त्या हुकूमनाम्याबद्दल आपण पैसा दिला नाहीं, असें ठाऊक असून नवें कर्ज काढून **वसंजीनें** आपली मिळकत **लाला**कडे गहाण लाविली, ह्यावरूनच त्यानें कपट केलें असें स्पष्ट होतें. आतां गहाणदारानें सदरहू मिळकत आपलेकडे गहाण लावून घेतली, त्यास ती कोणत्या प्रकारची आहे, हें पहाणें त्या-

चेच काम होतें. जेव्हां गहाणखत झालें तेव्हां आपणास त्या गहाणखताबद्दल सर्व ऐवज अगर त्यापैकीं कांहीं ऐवज घेणें नाहीं, असें **लालाभाना** ह्यास ठाऊक असून त्यानें सदरहू उत्पन्न आपलेकडे गहाण लावून घेतलें, व त्या उत्पन्नाचा ऐवज सरकारी खजिन्यांतून घेण्याविषयीं **वसंजीनें लाला** ह्यास मुखत्यार पत्र दिलें असून त्याप्रमाणें त्यानें तजवीज केली नाहीं, असें दिसतें. ह्यावरून **वसंजी** व **लाला भाना** ह्यांनीं संगनमत्त केलें, असा मोठा वहीम येतो. जर **लाला** शाबीत करतां, कीं अमुक कारणा करितां सदरहू गहाण खत ४९९ रुपयांचे **वसंजीनें** मला लिहून दिले आहे, तर त्यानें कपट केलें नाहीं, अशी कोडताची खातरी झाली असती; परंतु तसें **लालानें** केलें नाहीं, व सदरहू रकम गहाण खतांत कां लावली ह्याचें कारणही दिसत नाहीं, ह्या मुळें **मुलजीचा** दावा **वसंजीवर** आहे, हा मजकूर **लाला** ह्यास माहीत होता, आणि तो बुडविण्याकरितां **लालानें वसंजीशीं** संगनमत्त करून त्यापासून गहाणखत लिहून घेतलें, असें कोडताचे नजरेस येतें. ह्या गहाणाचे व्यवहारांत **वसंजी बरोबर** त्याचे भागीदारही आहेत, तर ह्या गोष्टीला कांहीं महत्त्व देतां येत नाहीं, कारण **वसंजी** व त्याचे भागीदार हे जवळचे नातलग आहेत, ह्याकरितां त्यांनीं **वसंजीशीं** पाहिजे तसा आंतून करार केला असेल. खत लिहिल्यावर मागून सर्व पैसा दिला, असा **लालाभानानें** सर्व मजकूर लिहिला आहे, त्यास तो पैसा केवळ **वसंजीला** दिला, ह्यावरून कोडतास असा अंदेशा येतो, कीं **वसंजीचे** नातलगांचीं नावें गहाणखतांत सामील करण्या मध्यें कांहीं तरी कपट आहे.

ह्या हकीकतीवरून तंट्यांतील गहाणखतांत कपट झालें

असें नजरेस येतें, सबब मुनसफाचा निवाडा रद्द करून **मुळजी**-ची टांच काईम ठेविली असे.

सदरहू हुकूम नाम्यावर **बाईतेजकूंवर** हिनें आपला नवरा **लालाभाना** मयत झाला, सबब आपला पुत्र लखन ह्याचे तर्फेनें **सद्दर दिवाणि अदालतींत स्पेशल** अपील केलें, तें मंजूर झालें. त्यांत चौकशीचें कलम असें होतें, कीं **वसंजीनें** आपली मिळकत **मुळजी**चे हातीं न लागूं देण्याकरितां कपटानें **लाला** जवळ गहाण ठेविली, व त्या कामांत **लालाभाना** सामील होता असा वहीम धरून कायद्याप्रमाणें **लाला** कडे गहाण लावून दिलेल्या मिळकतीवर **आपिलेंट् बाई तेज-कूवर** हिचा दावा पोंहचत नाहीं, असा असिस्टन जड्जानें हुकूम-नामा केला तो वहिवाटीस व कायद्यास विरुध आहे, किंवा कसें.

ग्रांट साहेब.

मग फुलकोर्टानें ह्या खटल्याची चौकशी करून निवाडा केला तो येणें प्रमाणें. **मुळजीनें वसंजी** वर हुकूम-नामा करून घेतल्यावरून **वसंजीनें** त्यास बुडविण्याकरितां आपली मिळकत कपटानें **लाला**कडे गहाण लाविली असें वाटल्या-वरून असिस्टन् जड्जानें मुनसफाचा निवाडा रद्द केला, परंतु हुकूमनामा झाला असला तरी प्रतिवादीचे मिळ-कतीवर टांच बसण्यापूर्वी तिची पाहिजे तशी व्यवस्था करण्यास त्याला कोणतेही कायद्यावरून इरकत होत नाहीं, आणि सदरहू गहाणाचा व्यवहार कोणतेही हेतूनें झाला असो, पण तो झाला आहे खरा असें मुनसफाचे नजरेस येतें, ह्याकरितां असिस्टनानें लिहिलेले कारणांवरून व्यवहार कायद्याविरुद्ध झाला असें ह्मण-वत नाहीं, सबब मुनसफाचा ठराव बहाल करून असिस्टनाचा

वार्डिन साहेब, लिजिट साहेब, आणि लॉर्किन साहेब.

ठराव रद्द केला आहे, व **रिस्पोंडेंट** ह्यावर खर्च घातला असे.

## स्पेशल अपील नंबर २९६५.

अपिलेंट्

**लालि जिलू-परभू.**

रिस्पोंडेंट्

**गणेस महादेव.**

दावा रुपये २.

### ठराव.

एका जमिनीवर टांच बसली होती ती दूर होण्याकरितां फिर्याद झाल्यावरून ठराव झाला, कीं जमिनीचा धारा मी देत असतों, सबब ती माझे कबज्यांत रहावी, ह्मणून जो मनुष्य फिर्याद करील, त्याला ज्या रकमेबद्दल टांच बसली असेल, तेवढ्या रकमेची फिर्याद करण्याची गरज नाहीं. त्याला जमिनीच्या धाऱ्याचे रकमेची फिर्याद करण्यास अधिकार आहे.

तारिख १३ माहे फेब्रूवारी सन १८५२.

**लालि** ( **वादि** ) ह्यानें कोंकण जिल्ह्यांतील **मालवण**चे मुनसफ कोडतांत फिर्याद केली, कीं **गणेश माहादेव** ( प्रतिवादी ) ह्याचे दरखास्ती वरून माझे धाऱ्याचे जमिनीवर टांच बसली आहे, त्यास ती दूर व्हावी; व तीमुळें माझें नुकसान झालें आहे, तें मजला देववावें. **गणेश माहादेवानें** जबाब दिला, कीं ज्या मनुष्यावर माझा हुकूमनामा झाला आहे.

त्याची तंट्यांतील जमीन आहे, तीवर वादीचा वारसा नाहीं; व ज्या रकमेबद्दल जमिनीवर टांच बसली आहे तितक्या रकमेची फिर्याद न करितां जमिनीला जो सारा आहे, त्याची फिर्याद करतो, हें गैरशिस्त आहे.

मुनसफानें ह्याखटल्याची चौकशी केली, तींत वादीचा जमिनीवर दावा शाबीत झाल्या वरून टांच दूर करण्याविषयीं त्यानें ठराव केला, परंतु नुकसान नाकबूल केलें. नंतर अपिलांत **रत्नागिरी** तुकडीचे सिनीयर असिस्टन् जड्जानें ठराव केला, कीं ज्या रकमे बद्दल जमिनीवर टांच बसली आहे, त्या रकमे बद्दल फिर्याद झाली पाहिजे होती; परंतु तसें झालें नाहीं, सबब वादीचा दावा रद्द आहे; परंतु हीचूक दुरुस्त करून मर्जी असल्यास पुनः फिर्याद करण्यास **लाली** ह्याला ह्या हुकूमनाम्या वरून प्रतिबंध होणार नाहीं. ह्या तजविजी पेक्षां **सदर दिवाणी अदालतीस** अर्ज करावा हें बरें, असें **लाली** ह्यासवाटून त्यानें तिकडे अर्ज केला, तेव्हां ज्या रकमे बद्दल सदरहू टांच बसली त्या रकमेचा **स्पेशल अपिलेंट् (लाली)** ह्यानें दावा करावयाचा होता, असा ठराव अकूटिंग शिनीयर असिस्टन् जड्जानें केला, तो सन १८३०च्या १२व्या कायद्याच्या १ल्या कलमाच्या १ल्या रकमे प्रमाणें पहातां कायद्या विरुद्ध झाला किंवा कसें, हें पहाण्यास **स्पेशल** अपील मंजूर केलें.

लार्किन साहेब.

मग **वार्डिन** साहेब **लिजिट्** साहेब व **लार्किन्**साहेब ह्यांनीं चौकशी करून ठराव केला, कीं **अपिलेंटानें** आपल्याकडे जमीन रहाण्याकरितां धारेकरी ह्मणून फिर्याद केली, सबब जमिनीवर ज्या रकमे बद्दल टांचबसली आहे तितक्या रकमेची त्याला फिर्याद करण्याची गरज नाहीं. त्याला १८३०चा कायदा १२ कलम १

ह्याप्रमाणें जमिनीचे धाऱ्या इतके रकमेची फिर्याद करण्याचा अधिकार आहे, ह्यास्तव सिनीयर असिस्टनू जडूजाचा निवाडा रद्द करून मुकद्दमा जिल्ह्यास परत पाठवून हुकूमकरण्यांत येतो, कीं अपिलाचे फैलावरील ज्या नंबरावर पूर्वी हा मुकद्दमा होता तेथें तो पुनः घेऊन चौकशी करून निवाडा करावा.

## स्पेशल अपील नंबर २९७२.

अपिलेंटू

**गिरापा बिन हनमापा.**

रिस्पोंडेंटू

**नरसापा दिवटी.**

दावा रुपये २५.

**ठराव.**

गहाणखत कोडतांत मंजूर होण्यास गहाणमाल गहाणदाराच्या ताब्यांत असण्याची जरूरी नाहीं.

तारीख २० फेब्रुवारी सन १८५२ इसवी.

ह्या खटल्यांत **गिरापानें** फिर्याद केली, कीं मजकडे एक घर गहाण असून त्यावर **नरसापानें** टांच बसविली आहे, तर ती दूर व्हावी. **नरसापानें** जबाब दिला, कीं मला ठकविण्याचे इराद्यानें सदरहू गहाणखत बनावट केलें आहे.

सदरहू गहाणखत मंजूर धरण्या जोगे आहे, असें **धारवाड** जिल्ह्यांतील **हावेरी** एथील मुनसफाचे नजरेस आलें, त्याकरून त्यानें टांच उठविण्याविषयीं हुकूम दिला.

नंतर अपिलांत असिस्टंट जड्जानें मुनसफाचा हुकूमनामा रद्द केला. त्यानें चौकशी करून येणें प्रमाणें निवाडा केला. **गिरापा** ह्मणतो, कीं गहाणखतांत लिहिलेली मुद्दत संपल्यावर गहाणमाल ( ह्मणजे सदरहू घर वगैरें ) माझे ताब्यांत आला, व हा मजकूर शाबीत करण्याकरितां त्यानें तीन साक्षीदार दिले; त्यांनीं साक्ष दिली, कीं कबुलायतीप्रमाणें **तिरकापा** ( ह्मणजे ज्या मनुष्यावर प्रतिवादी **नरसापा** ह्याचा हुकूमनामा झाला, ) ह्यानें सर्व घर **गिरापास** दिलें; परंतु **गिरापानें तिरकापाचे** बायकोला हंगामाचे दिवसांपवितों त्या घरांत रहाण्याची परवानगी दिली. आतां गहाणखत सन १८४९ अप्रेल तारिख १० वीचें आहे, आणि हंगामाचे दिवस डिसेंबरचे व जानेवारीचे सुमारास येतात, ह्यास्तव करारापेक्षां १४ महिने ज्यास्त **तिरकापा** ह्याची बायको सदरहू घरांत भाडे दिल्या वांचून राहिली असें होतें, ह्यावरून वादी **गिरापा** ह्याचे दाव्याचे खरेपणाविषयीं मोठा संशय येतो. **तिरकापानें** आपली सर्व मालमत्ता **गिरापाकडे** गहाण लावून दिली आहे, व गहाणखतांत लावलेला पैसा **गिरापानें तिरकापास** आमच्या देखत दिला असें साक्षीदारांतून कोणीही ह्मणत नाहीं; ह्यावरून **तिरकापानें** आपला सावकार **नरसापा** वगैरे ह्यांस बुडविण्याकरितां तें गहाणखत कपटानें **गिरापा** ह्याला करून दिलें आहे, असा मोठा वहीम येतो. शिवाय कराराप्रमाणें १५ दिवसांतपैसा न पोंचल्यास गहाणदार ( वादी ) ह्याला सर्व गहाण माल मिळावा असा गहाणखतांत करार असून माल त्याचे ताब्यांत नाहीं, ह्याकारणावरून सदरहू गहाणखत नामंजूर समजून मुनसफाचा निवाडा रद्द केला आहे.

सदरहू हुकूमनाम्यावर सदर दिवाणी अदालतींत अर्ज झाल्यावरून गहाणखतांतील कराराप्रमाणें ज्या वेळेस गहाण घेणाराचे ताब्यांत गहाण लाविलेला माल असावयाचा होता, त्यावेळेस तो त्याचे ताब्यांत नसल्या मुळें गहाणखत ना मंजूर करणे हें कायदा व वहिवाट सोडून आहे किंवा कसें, ह्याविषयीं चौकशी करण्याकरितां स्पेशल अपील मंजूर झालें.

लार्किन साहेब.

नंतर फुल कोडतानें त्या कलमाचा विचार करून ठरविलें, कीं सदर अदालतींतील शास्त्री ह्यानें शास्त्रार्थ सांगितला, त्या प्रमाणें पाहिलें असतां, गहाणखतांत लिहिलेली मिळकत गहाणदाराचे ताब्यांत नसली तरी तें खत कोडतांत मंजूर धरण्यास हरकत नाहीं, सबब असिस्टन जडूजाचा निवाडा रद्द केला आहे, आणि मुनसफाचा निवाडा बहाल करून रिस्पोंडेंट ह्यावर खर्च घातला असे.

वार्डिन साहेब, लिजिट साहेब व लार्किन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २७४५

अपिलेंट

**भुकणदास दयाराम**

रिस्पोंडेंट

**दामोदर बिजाभाई**

दावा रुपये २०.

### ठराव

मोकदम्याची चोकशी पुनः चालली असतां पक्षकार जो सा-

क्षी पुरावा देईल, तो कोडतानें घेतला पाहिजे. न घेतल्यास तसें करण्याचें योग्य कारण लिहिलें पाहिजे.

दामोदर बिजाभाई ह्याची मोरी भुकणदासानें तुंबविली ह्यामुळें दुर्गंधी सुटून दामोदराचे घरांत रहाण्याची सोय नाहींशी झाली, ह्यामुळें दामोदरानें त्याविषयीं बंदोबस्त व्हावा ह्मणूनफिर्याद करून तींत २० रुपयांचा दावा केला. प्रतिवादीनें तकरार केली, कीं फिर्याद विनाकारण झाली आहे.

ता० ८ मार्च सन १८५१

सुरत जिल्ह्यांतील सजोदे एथील मुनसफानें ह्याखटल्याची चौकशी करून वादीचा दावा प्रथम रद्द केला; परंतु तो खटला पुनः चौकशी होण्याकरितां मुनसफाकडे परत आल्या वरून त्यानें जातीनें सदरहू घर पाहून असा ठराव केला, कीं इतःपर पावसाचें पाणीमात्र त्या मोरीनें जाऊंद्यावें. पुढें अपिलांत भडोच्चे असिस्टंट् जड्जानें असा अभिप्राय लिहिला, कीं मुनसफाचे ठरावांत हात घालण्यास कांहीं कारण दिसत नाहीं, सबब तो ठराव काईम केला असे.

नंतर भुकण दासानें स्पेशल अपील मंजूर होण्या बद्दल सद्दरेस अर्ज केला, तेव्हां कनिष्ठ कोडताकडून कागद पत्र आणवून पाहतां बेलसाहेबांचें नजरेस आलें, कीं मुकद्दम्याची पुनः चौकशी होण्याचे वेळेस अर्जदारानें जो साक्षी पुरावा दिला तो अव्वल कोडतानें घेतला नाहीं; त्यास पहिला ठराव रद्द करण्या पूर्वी तो पुरावा त्या कोडतानें घ्यावयाचा होता, अगर पुरावा न घेण्याचें योग्य कारण दाखवावयाचें होतें; परंतु तसें केलें नाहीं, सबबही वर्तणूक वहिवाटीस विरुद्ध आहे, ती नीट व्हावी ह्मणून स्पेशल अपील मंजूर केलें.

फुलकोडताचा अभिप्राय सदरहू प्रमाणेंच पडल्यावरून आसिस्टनू जडूजाचा निवाडा रद्द झाला, व सदर कोडतानें मुकद्दमा जिल्ह्यास परत पाठवून हुकूम केला, कीं मुकद्दम्याची चौकशी करून नवा निवाडा करावा, व त्यांत सदर दिवाणी अदालतींत झालेला जो खर्च त्याची हिस्सेरशी ठरवावी.

बेलसाहेब, वार्डिन साहेब, आणि लिजिट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २६५२.

अपिलँट्.

**शिद्दापा बिन रेवापा.**

रिस्पोंडेंट्.

**पुनाकोटी** मयत, त्याचा वारस पुत्र **वासुदेव** अज्ञान, त्याचें पालनकरणारा **विजिरंगअय्या मुदलियर.**

दावा रुपये ८००.

**ठराव.**

दोघे बंधु एकत्र रहात असतां त्यांतून एकानें आपले नांवानें एखादें घर खरेदी केलें, तर तें घर हिंदुशास्त्राप्रमाणें दोघांचें होतें.

ता. २१ माहे मार्च सन १८५१.

मयत **पुनाकोटी** ह्याचावारस पुत्र **वासुदेव** हा अज्ञान, सबब त्याचें पालनकरणारा **विजिरंग** ह्यानें **पुणें** एथील प्रिन्सिपाल सदर अमिनाचे कोडतांत ही फिर्याद करून तींत असें लिहिलें, कीं **शिद्दापानें च्चिनैया मुदलियर** ह्यावर आपला हुकूमनामा करून घेतला होता, त्यावरून त्यानें **च्चिनैया** ह्याचें घर ह्मणून ज्या घरावर टांच बसविली तें घर मयत **पुनाकोटी** ह्याचें आहे, ह्या करितां ती टांच दूर व्हावी.

प्रतिवादीनें जबाब दिला, कीं **वासुदेवाचें** पालन करणारा **विजिरंग** नव्हे, व **वासुदेवा**चा चुलता **चिनैया** ह्यानें **विजिरंग** ह्याशीं संगन मत्त करून त्या कडून ही फिर्याद करविली आहे.

प्रिनसिपाल सदर अमिनानें असा ठराव केला, कीं **चिनैया** व **वासुदेवाचा** बाप **पुनाकोटी** हे उभयतां बंधु असून एकत्र राहून व्यापार करीत होते; व त्यांनीं सरकाराशीं जी देव घेव केली तिच्या बद्दल सरकारी वहींत **चिनैयाचें** नांव लागलें आहे, ह्यास्तव घरावरील टांच काईम असे. पुढें अपिलांत असिस्टन जड्जानें सदरहू ठराव अशा कारणावरून फिरविला, कीं साक्षी पुरावा पहातां तंटयांतील घर मयत **पुनाकोटीचेंच** ठरतें. नंतर दुसरें अपील जिल्हा जड्जाचे कोडतांत झालें, तेव्हां जड्जाचें मत असिस्टन जड्जाप्रमाणेंच पडून त्यानें त्याचा निवाडा काईम केला.

पुढें **सदर दिवाणी अदालतीं**त स्पेशल अपील मंजूर झालें; त्यांत चौकशीचें कलम असें होतें, कीं दोघे बंधु एकत्र राहत असतां त्या दोघांपैकीं एकाच्या नावाचे दोन घरांच्या मालकी विषयीं दस्त ऐवज आहेत, तर एवढेंच कारणामुळें त्या घरांवर दुसरे भावाचा हक्क नाहीं, असें ठरण्यास कायदा व मामूल चाल ह्यांचा आधार आहे किंवा कसें.

वार्डिन साहेब.

सदरहू बाबदींत फुलकोडतानें चौकशी केली, तेव्हां **सदर दिवाणी अदालतीं**चा शास्त्री ह्यानं शास्त्रार्थ सांगितला; त्यावरून असा ठराव झाला, कीं दोघे बंधु एकत्र रहात असतां त्यांतून एकानें आपलें नांवें एकादें घर

बेलसाहेब, वार्डिनसाहेब, व लिजिट साहेब.

खरेदी केलें असेल, तर *तें घर शास्त्राप्रमाणें दोघां बंधूंचें होतें, ह्मणून कनिष्ठ अपिलेट कोडतांचे निवाडे रद्द होऊन प्रिनसिपाल सदर अमिनाचा निवाडा बहाल झाला, व खर्च रिस्पोंडेंटावर बसला.

---

## स्पेशल अपील नंबर २७३३.

अपिलेंट्

खंडू शिवराम नाईक.

रिस्पोंडेंट्

महादेव त्र्यंबक नाईक

दावा रुपये २६८६६१०.

### ठराव.

कोणी एकानें आपलें कर्ज वसूल करण्याकरितां फिर्याद केल्या वरून प्रतिवादीनें जबाब दिला, कीं फिर्यादींत लिहिलेले कर्जा पैकीं मीं कांहीं कर्ज फेडलें आहे, व ती फेड शाबीत करण्यास त्यानें आपले हिशेब पुराव्यास हजर केले, त्यावरून असा ठराव झाला, कीं जी फिर्याद रोख्या वरून होते ती शाबीत होण्यास वादीचे हिशेब आणण्याची जरूरी नाहीं.

अहमद नगर जिल्ह्यांतील शिन्नरचे मुनसफ कोडतांत महादेवानें फिर्याद केली, कीं मह्मण रोख्यावरून मुद्दल व व्याज मिळून रुपये ४६१ प्रतिवादी खंडूकडून घेणें निघतात, ते त्याकडून मजला देववावे, अगर रोख्यांतील कराराप्रमाणें

तारीख १५ अप्रेल सन १८५१ इसवी.

---

* अपिलेंट ह्मणजे ज्या कडे अपिलें होतात.

गहाण ठेवलेलें घर माझे कबज्यांत द्यावें. खंडूनें जाब दिला, कीं मीं गहाणा बद्दल फक्त ५९ रुपये देणें आहेत.

मुनसफानें ठराव केला, कीं १९२८१५८२ बाकी देणें निघते ती प्रतिवादीनें वादीस द्यावी; परंतु अपिलांत जिल्हाजड्जानें तो ठराव दुरुस्त करून ठराव केला, कीं खंडूनें आपले गहाणरोख्यांत लिहिलेली रकम वादीस द्यावी, अगर त्यांतील करारा प्रमाणें आपलें घर त्याचे कबजांत द्यावें. जड्जानें आणखी असें लिहिलें, कीं हा खटला अगदीं स्पष्ट आहे, तो असा, कीं खंडू गहाण रोखा कबूल करतो; परंतु त्याचें ह्मणणें इतकेंच आहे, कीं मुदला पैकीं ५९ रुपये व व्याज, इतकें मात्र मीं देणें आहे. बाकींचे सर्व रुपयांची फेड मीं केली आहे, व ह्याचे पुराव्यास त्यानें आपले हिशेब हजर केलें आहेत, आतां जमाखर्चाचे वहींत रकम खर्चीं पडली ह्मणजे तेवढ्यानेंच ती रकम दिली असें शाबीत होत नाहीं, आणि माहादेव त्रिंबक आपली वही हजर करीत नाहीं, ही गोष्ट जरी खंडूचे वहीचे खरे पणास अनुकूल पडते तरी तेवढ्या वरून खंडूची वही खरी आहे, असें समजून ठराव करणें हें न्याय्य नाहीं.

पुढें स्पेशल अपील झालें, तेव्हां प्रतिवादी ह्मणतो, कीं मीं रुपये दिले आणि त्याचे पुराव्यास तो आपली जमाखर्चाची वही कोडतांत दाखलकरतो, आणि वादी ह्मणतो, कीं मजजवळ जमाखर्चाची वही आहे; परंतु तो ती कोडतांत दाखल करीत नाहीं; तेव्हां प्रतिवादी ह्मणतो ह्याप्रमाणें वादीचे वहींत रुपये जमा आहेत किंवा नाहींत, हें पाहण्याकरितां वादीकडून त्याची वही न आणवितां प्रतिवादीचे वहीवर विश्वास ठेवतां येत नाहीं, ह्मणून खताबरहुकूम प्रतिवादीनें वादीस रुपये

लिजिट् साहेब.

द्यावे असा जड्जानें हुकूम केला त्यास कोडताचे चाली विरुद्ध त्यानें वर्तणूक केली किंवा कसें ह्याची चौकशी करण्या करितां **लिजिट्** साहेबांनीं **स्पेशल** अपील मंजूर केलें.

पुढें फुलकोडतानें सदरहूविषयीं विचार करून ठराव केला, कीं सरटिफिकिटांत लिहिल्याप्रमाणें जिल्हे-जड्जानें केल्यामुळें कोडतांचे वहिवाटीस विरोध येत नाहीं; सबब अपील रद्द करून **अपिलेंटा** वर खर्च घातला असे.

वार्डन साहेब लिजिट साहेब, आणि ग्रांट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८११.

अपिलेंट्.

**शिऊबाई** व तिचा बापरामजी **वानारशी.**

रिस्पोंडेंट्.

**रतनजी नथू.**

दावा रुपये ५०.

**ठराव.**

कोणी एका मनुष्यानें आपले सुनेवर फिर्याद केली, कीं तिनें दुसरें लग्नकेलें ह्याकरितां पहिल्या नवऱ्याचे पोटचें लहान मूल आहे, तें माझ्या हवाली करवावें. ह्या मुकद्दम्यांत ठराव झाला, कीं जों पावेतों बालक आईचे अंगावर पितें तो पावेतों आईचा हक्क त्या मुलावर असतो, असें हिंदुशास्त्र आहे. तेव्हां सदरहू बाई दुसरें लग्न करून गरोदर झाली आहे, ह्याकरितां हिंदुशास्त्राप्रमाणें तंटयांतील मुलावर तिचा हक्क नाहीं.

**रतनजी नथूनें** आपली सून **शिऊबाई** व तिचा बाप **रामजी वानारशी** ह्यांवर फिर्याद केली, कीं शिऊबाईचा नवरा ( ह्मणजे माझा पुत्र ) ह्याचे पोटचें तिला मूल होऊन तो मयत झाला. त्यावर **शिऊबाईनें** दुसरें लग्न केलें आहे; सबब आमचे जातीचे चालीप्रमाणें त्या मुलावर माझा हक्क आहे, तर तें माझे स्वाधीन करावें. प्रतिवादींनीं जाब दिला, कीं जों पर्यंत आईचे अंगावर मूल पितें तों पर्यंत त्यावर आईचा हक्क आहे.

तारिख २० जून सन १८५१ इ०

**सुरत**चे सदर अमिनानें ह्या खटल्याची चौकशी केली, तेसमयीं तेथील अदालतीचा शास्त्री ह्यानें अभिप्राय दिला, कीं **शिऊबाई**ची तकरार शास्त्राप्रमाणें मंजूर धरण्या जोगी आहे, त्यावरून सदर अमिनानें प्रतिवादी **शिऊबाई** हिचे वतीनें निवाडा केला. पुढें अपिलांत जिल्हा जडूजानें ठराव केला, कीं सदरहू हुकूमनामा जातीचे नेमा विरुद्ध आहे, व अव्वल चौकशी झाली तेसमयीं मुलाची आई **शिऊबाई** सातमहिन्यांची गरोदर होती; सबब आपले जवळ मूल बाळगण्याचा प्रतिवादी **शिऊबाई** हिचा हक्क ज्या तकरारीवरून पोंचतो तीच तकरार शास्त्री ह्याचे अभिप्रायावरून नामंजूर ठरते, ह्यास्तव कनिष्ट कोडताचा निवाडा रद्द केला आहे, आणि **शिऊबाईनें** आपलें मूल **रतनजी नथूचे** स्वाधीन करावें.

ह्याठरावावर **शिऊबाई** व तिचा बाप ह्यांनीं **सदर अदालतींत** अर्ज केल्यावरून **स्पेशल** अपील मंजूर झालें. त्यांत विचाराचें कलम असें होतें, कीं दुसरें लग्न होऊन स्त्री गरोदर राहिली असतां तिचा पहिले लग्नाच्या लहान मुलास बाळगण्याचा हक्क नाहींसा होतो, ह्याप्रमाणें कनिष्ट

वार्डिन साहेब.

कोडतानें फैसला केला तो हिंदुशास्त्रास विरुद्ध आहे किंवा कसें.

नंतर फुलकोडतानें सदरहू कलमाविषयीं चौकशीकरून जिल्हाजडूजानें जीं कारणें लिहिलीं होतीं, तीं मान्यकरून अपील रद्द केलें, व पक्षकार ह्यांनीं आपला खर्च सोसावा असा हुकूम केला.

वार्डन साहेब, ग्रांट साहेब, व लॉकिन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८९१.

अपिलेंट्.

**हरी वल्लद बुधाजी.**

रिस्पोंडेंट्.

**पांडू वल्लद बाळोजी व आपा वल्लद त्र्यंबकजी.**

दावा रुपये ५०.

### ठराव.

अनें एकघर क पाशीं गहाण ठेविलें, व तेंच घर बनें ड पाशीं गहाण ठेविलें. नंतर कनें त्याघरावर टांच लाविली, ती दूर करण्याबद्दल डनें फिर्याद केली; तेव्हां बला घर गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं, असें समजून ती फिर्याद जिल्हाजडूजानें रद्द केली. पुढें सदर दिवाणी अदालतीनें ठराव केला, कीं अहा बवर फिर्याद करून आपली मालकी शाबीत करीपर्यंत डचें गहाणखत मंजूर धरावें, कारण कीं गहाणमाल त्याचे कबजांत आहे.

**आपा** वल्लद **त्र्यंबकजी** ह्यानें **विठूवर** हुकूमनामा करून घेऊन घरावर टांच बसविली. तें घर **बगू** हिनें **हरी** वल्लद **बुधाजी** पाशीं गहाण ठेविलें होतें, सबब त्यानें ती टांच उठविण्याकरितां **नासिक** चे मुनसफाचे कोडतांत पन्नास रुपयांची फिर्याद केली. **बगूनें हरी** वल्लद **बुधाजी** ह्यास जें गहाणखत लिहून दिलें होतें त्यावर बगूचा नवरा (बाळोजी) ह्याची सही होती. **हरी** वल्लद **बुधाजीनें बगू, आपा** व **बाळोजीचा** मुलगा **पांडू** ह्यातिघांवर फिर्याद केली. **आपानें** जबाब दिला, कीं तंटयांतील घर **विठूचें** वडिलोपार्जित आहे, त्या घरावर दुसरे कोणाचा कांहीं एक हक्क नाहीं.

तारीख २१ जून सन १८५१ इसवी.

ह्या खटल्याची चौकशी मुनसफानें प्रथम करून हुकूम दिला, कीं **आपानें** घर खुलें करून **हरीचे** स्वाधीन करावें, परंतु तें घर कोणाचें वास्तविक आहे, ह्याविषयीं साक्षी पुरावा घेऊन निवाडा करण्याकरितां जिल्हाजडूजानें मुकद्दमा मुनसफाकडे परत पाठविल्यावरून मुनसफानें पुनः चौकशी करून अभिप्राय दिला, कीं सदरहू घर खरोखरी कोणाचें आहे, ह्याचा निर्णय होत नाहीं; परंतु ज्या अर्थी **हरी** कडे तें घर गहाण आहे, त्या अर्थी तें त्याला मिळावें. नंतर **आपा** व **पांडू** ह्यांनीं जिल्हाजडूजाकडे अपील केलें, तेव्हां जडूजानें मुनसफाचा निवाडा अशा कारणावरून रद्द केला, कीं तंटयांतील घर मुळचें कोणाचें आहे, हें बरोबर समजत नाहीं; परंतु त्याची वहिवाट **बाळोजीकडे** होती हें शाबीत झालें आहे, **बाळोजीची** राख **बगू** हिला **पांडू** (**बाळोजीचा** पुत्र) ह्याचे अनुमताशिवाय तें घर गहाण ठेवण्याचा अखत्यार नाहीं, व **पांडूनें** कबूल केलें आहे, कीं तंटयांतील घर **विठूचें** आहे व तें

त्यानें **आपा** जवळ गहाण ठेविलें आहे. जड्जानें आणखी असें लिहिलें, कीं **पांडू** वर **हरीनें** दावा केला होता, तो मुनसफानें रद्द केला, सबब **पांडूला** अपील करण्याचें कारण नव्हतें.

**बाळोजीची** सही गहाण खतावर आहे, ह्यावरून स्पष्ट होतें, कीं घर गहाण ठेविलें तेव्हां **बाळोजी** जिवंत होता. ह्यावरून घर गहाण लावून देण्यास **बाळोजीचा** पुत्र पांडू ह्याचे अनुमताची जरूरी होती असा ठराव जिल्हाजड्जानें केला तो वाजवी आहे किंवा कसें? व तंटयांतील घरावर मालकी **बाळोजीची** नाहीं, विठूची आहे, ह्याप्रमाणें ठराव जिल्हाजड्जानें पुराव्याशिवाय केला तर तो कायद्यास व वहिवाटीस विरुद्ध झाला, किंवा कसें? ह्या दोन्ही कलमांची चौकशी करण्याकरितां **लिंजिट्** साहेबांनीं **सदर दिवाणी अदालतींत स्पेशल** अपील मंजूर केलें.

**फुल** कोडतानें सदरहू विषयीं चौकशी करून ठराव केला, कीं **पांडूचे** जबाबावरून घर **विठूचें** आहे, असें समजून जडजानें **विठूनें आपा** ह्याला जें गहाणखत लिहून दिलें तें व **बाळोजीनें हरीचे** ताब्यांत तेंच घर देऊन त्याला घराबद्दल जें गहाणखत करून दिलें तें, ह्या दोन्ही खतांतून प्रधान कोणतें, ह्याविषयीं ठराव केला. तर तसें न करितां **विठू** हा **बाळोजीवर** फिर्याद करून आपला मालकीचा हक्क शाबीत करी पर्यंत जड्जानें **हरीचें** गहाणखत मंजूर धरावयाचें होतें, कारण कीं **हरीचे** कबजांत तें घर **बाळोजीनें** दिलें आहे.

वार्डिन साहेब, ग्रांट साहेब आणि लींकिनसाहेब

असा ठराव करून **फुल** कोडतानें जिल्हा जड्जाचा हुकूमनामा रद्द करून मुनसफाचा हुकूमनामा बहाल केला, व **खर्च रिस्पांडेंटावर** घातला.

---

## स्पेशल अपील नंबर २८५८.

अपिलेंट्

**नौरोजी होरमसजी.**

रिस्पोंडेंट्

**कावसजी खरशेटजी.**

दावा रुपये २८९.

**ठराव.**

**काव** (समुद्रांतील मासे धरण्याची जागा) हिचा हिस्सा घेण्या बद्दल फिर्याद झाली होती, तींत असा ठराव झाला, कीं त्या जाग्या बद्दल जो सरकारास कर द्यावा लागतो त्याचे अन्वयें फिर्याद झाली, सबब ती फिर्याद कमी दाव्याची आहे, कारण त्या जाग्याची गणना साऱ्याच्या जमिनींत करतां येत नाहीं, सबब तीविषयीं सन १८३० चा १२वा कायदा लागू पडत नाहीं.

तारीख ४ सप्टेंबर सन १८५१

कोंकण जिल्ह्यांतील **कल्याण**चे मुनसफाचे कोडतांत **नौरोजी**नें कावेचा निमे हिस्सा आपले स्वाधीन करून घेण्याविषयीं त्या जागेवरील दरसालचे कराच्या निमे रुपयांची फिर्याद केली; तींत त्यानें असा मजकूर लिहिला, कीं माझे व प्रतिवादीचे पूर्वजांनीं तंटच्यांतील जागा मिळविली आहे, व सरकारचे खातेवहींत ती जमीन माझें नावानें लागली आहे, आणि ती बद्दल सरकारास दरसाल कर ५ रुपये मी देतों. असें असतां प्रतिवादीनें जबरदस्तीनें

ती जमीन आपले कबजांत दोन वर्षें घेऊन मला त्या जमिनीचा भोग वटा करूं देत नाहीं. ह्याविषयीं मी मामलेदाराकडे अर्ज केला होता तेव्हां सदरहू जागेवर हक्क शाबीत करण्याकरितां दिवाणींत फिर्याद करण्याविषयीं मला त्यानें हुकूम दिला, ह्यास्तव मी ही फिर्याद केली आहे, तर माझा मला हिस्सा मिळावा.

ह्यावर प्रतिवादी कावसजी ह्यानें इतकाच जबाब दिला, कीं सदरहू जागा १००० रुपयांचे किमतीची आहे, तेव्हां त्या किमतीचे निमे रकमेबद्दल फिर्याद व्हावी, कारण कीं ती जागा सारा देणारी जमीन नव्हे, सबब तिच्या कराराच्या रकमेची फिर्याद गैरशिस्त आहे, व आलीकडे ह्या जमिनीबद्दल सरकार करही घेत नाहीं.

मुनसफानें वादीचे वतीनें निवाडा केला. त्यानें असें लिहिलें, कीं काव खातेवहींत वादीचे नांवावर लागली आहे, व दोघे पक्षकार फारखती झाल्या ह्मणून कबूल करतात; ह्यावरून वादीचा दावा शाबीत होतो, व वादीस जाग्याचे किमती इतके रुपयांचा दावा करण्याचें कांहीं कारण नाहीं, त्यानें जो दावा केला आहे तो बरोबर आहे.

ह्या ठरावावर असिस्टंट जड्जाकडे अपील झालें, तेव्हां त्यानें वादीचा दावा रद्द केला. त्यानें असें लिहिलें, कीं फिर्यादींत दाव्याची जी रकम लाविली आहे ती गैरशिस्त आहे, कारण वसूल घेतल्या बद्दल सरकारची पावती अव्वल फिर्यादींत वादीनें पुराव्यास हजर केली आहे, ती सन १८४३,४४ सालांबद्दल आहे, व त्या सालापासून पुढें सरकारानें कर घेतला नाहीं, ह्याकरितां ज्या वेळेस फिर्याद झाली त्यावेळेस कावे बद्दल सरकारास वसूल मिळत नव्हता, सबब दरसालचे जमाबंदीचे दराइतकी कावेचा

किंमत होऊं नये. बरें तंटयांतील जागेचे मालकास तीबद्दल सरकारास कर द्यावा लागतो, असें जरी ह्मटलें, तरी मासे धरण्याकरितां जाळीं व दोर लावलेल्या सदरहू जाग्यास साऱ्याची जमीन ह्मणतां येत नाहीं, ह्यास्तव सन १८३०च्या १२व्या कायद्याच्या १ल्या रकमेच्या १ल्या कलमांतील ठराव ह्याबाबदींत लागू होत नाहीं, कारण तेथें असें लिहिलें आहे, कीं ज्या जमिनीबद्दल सरकारास उत्पन्न येतें त्या जमिनीची किंमत तिचे दरसालचे जमाबंदी इतकी लावावी. असिस्टन्ट जड्जानें असें आणखी लिहिलें, कीं हल्लींजी चूक झाली आहे ती मर्जी असल्यास वादीनें दुरुस्त करून नवी फिर्याद लावावी.

पुढें जिल्हाजड्जाकडे अपील झालें, तेव्हां त्यानें असिस्टनाचा निवाडा काईम केला. नंतर **स्पेशल** अपिलाबद्दल **सदर दिवाणी अदालतीं**त अर्ज झाला, तेव्हां फिर्याद पुर्ती बरोबर दाव्याची झाली आहे किंवा कसें, व अव्वल फिर्यादींत लागलेल्या मिळकतीची किंमत जर कमी लागली तर सन १८२७चा कायदा १८ कलम १६ रकम ३ हींतील ठरावाप्रमाणें तजवीज कां झाली नाहीं. ह्या दोन गोष्टींची चवकशी करण्याकरितां तो अर्ज मंजूर झाला.

बेल साहेब.

फुलकोडतानें जिल्हाजड्जाप्रमाणेंच ठराव केला, कीं सन १८३०चा १२वा कायदा **कावे**स लागूं नाहीं, कारण त्या जागेस सारा देणारी जमीन ह्मणतां येत नाहीं, ह्मणून अव्वल फिर्याद कमी दाव्याची झाली असें होतें, ह्यास्तव अपील काढून टाकून खर्च **आपेलंटा**वर घातला असे.

लिजिट साहेब ग्रांट साहेब आणि लार्किन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २६९१.

अपिलेंट

**जिवाजी गंगाधर.**

रिस्पोंडेंट

**शामराव माहादेव.**

दावा रुपये १२१९.

### ठराव.

पाटिलाचे घराण्यांतील कोणी पुरुष पाटिलकीचे वतनाचे हिशावर दावा करील, तर त्याचे हक्काबद्दल इनसाफ करण्याचा अखत्यार दिवाणी कोर्टास आहे; परंतु कलेकटर किंवा दुसरा कोणी वरिष्ठ अमलदार ह्यास संन १८४३चा अक्ट नंबर ११ कलम १३ ह्यांतील ठराव अन्वयें त्या वतनाची जी वांटणी करणें योग्य दिसेल ती करण्यास सदरहू इनसाफावरून अटकाव होणार नाहीं.

**शामराव महादेव** ह्यानें ही फिर्याद दावा रुपये १५१९ साची करून तींत असा मजकूर लिहिला, कीं आमचे घराण्यांतील **जिवाजी गंगाधर** ह्याचे वडिलांनीं माझे वडिलांपासून पाटिलकीचें वतन व एक घर अन्यायानें घेतलें आहे, तीं त्याकडून मला देववावीं, व कांहीं हक्काबद्दल पैसा येणें राहिला आहे तोही देववावा.

तारीख १८ सपटेंबर सन १८५१ इसवी.

**जिवाजी गंगाधरानें** जाब दिला, कीं माझे वडिलांनीं सदरहू मिळकतीवर आपला हक्क संपादिला, आणि ती मिळकत आमचे कबज्यांत ३४,३५, वर्षें आहे.

**सोलापुरचे** सदर आमिनानें ह्या खटल्याची चौकशी करून ठराव केला, कीं वादीचा हक्क वतनावर शाबीत होतो, सबब तें वतन व त्या संबंधी हक्क ह्यांची किंमत १२१९ रुपये लागली आहे, ती वादीस मिळावी, परंतु घरावर वादीचा दावा शाबीत होत नाहीं, सबब तो रद्द असे.

पुढें जिल्हा जड्जाकडे सदरहू बदल अपील झाल्यावर त्यानें सदर अमिनाचा निवाडा काईम करून अभिप्राय लिहिला, तो येणें प्रमाणें. **जिवाजी गंगाधर** तकरार करितो, कीं माझे बापानें तंटयांतील वतन आपलेकडे गहाण लावून घेतल्या वरून तें त्याकडे २८ वर्षें होतें, व तो मयत झाल्यापासून तें मजकडे आहे, ह्मणून त्यावरील माझे हक्कास व्यत्यय येऊं शकत नाहीं. ही तकरार मंजूर धरण्या जोगी नाहीं, कारण सन १८२७ चा कायदा १६ कलम २० ह्यावर तारीख ५ माहे डिसेंबर सन १८३४ इसवींत समजूतपत्र झालें आहे, त्यांत असें ठरविलें आहे, कीं वतनदारास आपले हयाती पर्यंत मात्र आपलें वतन गहाण लावून देण्याचा अधिकार आहे. ह्या प्रकारचें गहाण निरंतर दुसऱ्याकडे चालावयाचें नाहीं, गहाण लावून दिल्यामुळें गहाण देणाराचा मात्र वतनावरील हक्क नाहींसा होईल; आणि गहाण देणारास एखादी मिळकत गहाण ठेवण्याचा अधिकार नसून ती जर त्यानें गहाण लाविली तर त्यापासून जें नुकसान होईल तें गहाण घेणारास सोसावें लागेल. **जिवाजी** आपला हक्क दोन गोष्टींवरून सांगतो. एक अशी, कीं

माझे बापानें आपले हयातींत वतन गहाण लावून घेतलें, व दुसरी अशी, कीं तें वतन फिर्याद होण्यापूर्वी २८ वर्षे त्याचे कब्ज्यांत राहिलें. त्यास गहाणखत जरी काईम असतें तरी सदरीं लिहिलेल्या समजूत पत्रावरून गहाणदाराचा गहाणावर हक्क नाहीं, असा निवाडा झालाच असता; परंतु **जिवाजीनें** अस्सल गहाणखत गहाळ झालें, असें सांगून गहाण शाबीत करण्याकरितां अस्सल खताची नक्कल हजर केली, ती कनिष्ट कोडतानें पुराव्यास घेतली, हें गैरशिस्त आहे; कारण **जिवाजीनें** अस्सल खत गहाळ झाल्याचा अगर फाटल्याचा पुरावा केला नाहीं, व तें खत मुळचें झालें आहे खरें, हें पहाण्याकरितां कनिष्ट कोडतानें खतावरील साक्षीदार देखील बोलाविले नाहींत; ह्यावरून सदरहू नक्कल निरुपयोगी आहे, ती मंजूर धरण्यासारिखी नाहीं. फिर्याद फार दिवसांनीं झाली, ह्या तकरारी विषयीं असा प्रकार नजरेस येतो, कीं **शामरावाचा** बाप जिवंत असतां त्यानें सोलापुरचे कलेकठराकडे सदरहू वतनाचे हक्का बदल फिर्याद केली होती, परंतु दिवाणींत फिर्याद करण्या विषयीं त्याला हुकूम झाला. त्या प्रमाणें त्यानें दिवाणी कोडतांत फिर्याद केल्यावर तिकडून हुकूम झाला, कीं तुमचे दाव्या संबंधी जो दस्त ऐवजी पुरावा कलेकटराकडे असेल तो तिकडे अर्ज करून घ्यावा. पुढें तो मयत झाला, सबब त्याचा मुलगा **शामराव** ह्यानें हल्लीं फिर्याद केली आहे. ह्या हकीकतीवरून सदरहू तकरारीचा निकाल होतो. मी मयताचा शिदा वारस आहे, ह्मणून माझा हक्क वतनावर पोंहचतो, ह्याप्रमाणें **शामरावानें** शाबीद केलें आहे, व कलेकटराकडील दप्तरचे दाखले पहातां असें कळून येतें, कीं शामरावाचे बापाचें नांव वतनदार ह्मणून दप्तरांत लागलें आहे, व तो वतनदार असल्यामुळें त्या वतनाचे कामा सं-

बंधी लावून दिलेली जी स्थावर मिळकततीवर त्याचा (**शामरावा**-चे बापाचा) हक्क होता.

जिल्हाजड्जाचे ठरावावर **सद्र दिवाणी अदालतींत जिवाजीनें** अपील अर्ज केला, कीं माझा आजा **शामराव गुंडो** ह्यास साहा पुत्र होते. ते काहीं दिवसपर्यंत एकत्र होते, आणि त्यावेळेत वडील पुत्र **मल्हार शामराव** वतनाची वहिवाट करीत होता, त्यानें सन १२१८ फसली (सन १८०८ इसवी) सालांत कुटुंबाचे रद कर्जास वतन गहाण लावून दिलें, पुढें सन १२२० फसली (सन १८१० इसवी) ह्या वर्षी ते बंधु विभक्त झाले, तेव्हां असा करार झाला, कीं घराण्यांतील जो पुरुष तें वतन सोडवील, त्यानेंच सर्व वतनाचा भोगवटा करावा. सन १२२२ फसली (सन १८१२ इसवी) सालांत मीं सदरहू कर्ज फेडल्यावरून कराराप्रमाणें वतन माझें झालें. पुढें सन १२२६ फसली (सन १८१६ इसवी) ह्या सालांत **मल्हार शामराव** मयत झाला, व मी वतनाची वहिवाट मालक ह्मणून सुमारें ३४,३५ वर्षे करीत आलों आहे, आणि तें माझे नावें दप्तरांत लागलें आहे. जिल्हाजड्जानें सन १८२७चा कायदा १६ कलम २० व त्यावर झालेलें समजूत पत्र, हीं दोन्ही माझे खटल्यास लागू केलीं आहेत, तीं लागू होत नाहींत, कारण मी व वादी हे आह्मी एकाच घराण्यांतील आहों, व शास्त्राचा अधार असा आहे, कीं एखादे घराण्यांतील सर्व पुरूष एकत्र आहेत तोंपर्यंत जें कर्ज होईल त्याबद्दल ते सर्व जबाबदार होतात, व ती जबाबदारी ते विभक्त झाले तरी कायम असते. तेव्हां हल्लींचे खटल्यांत सर्व कुटुंबाचें कर्ज मीं एकटयानें फेडिलें आहे, आणि भाऊबंदांनीं वतनावरील सर्व आपले हक्क मजकडे सोंपून दिले आहेत असें

असून वादी हा मल्हार शामराव ह्याचा वारस आहे, सबब व- तनावर त्याची मालकी पोंहचते, आणि मी तिन्हाईत आहें; असा ठराव जिल्हाजडूजानें केला तो सदरहू कारणांवरून कायद्यास व शास्त्रास विरुद्ध आहे.

सदरीं लिहिलेली अर्जाची सुनावणी व खटल्यांतील कागद

लिजिट् साहेब.

पत्रांचे मनन झालें, त्यावरून व मुनसफाचा निवाडा पहातां अर्जदार **अपिलेंट् जिवाजी** हा पाटलाचे घराण्यांतील पुरुष आहे, असें नजरेस आल्या वरू- न पाटलाचे घराण्यांतील कोणी पुरुष आपले पाटिलकीचे वतनाचे हिशा बद्दल दावा करील,तर सन १८४३ अकट् नंबर ११ कलम १३ ह्याअन्वयें त्या दाव्या बद्दल फैसल्ला करण्याचा अखत्यार दिवाणी कोडतास आहे,किंवा कसें ह्या विषयीं चौकशी करण्या क- रितां **सदर दिवाणी अदालतींत स्पेशल** अपील मंजूर झालें.

सदरहू बाबदींत फुल कोडतानें ठराव केला, कीं पाटलाचे घ- राण्यांतील एखादा पुरुष पाटिलकीचे वतनाचे हिशाबद्दल फिर्याद करील, तर त्याचे हक्का बद्दल चौकशी करण्याचा अखत्यार दिवाणी कोडतास आहे; परंतु कलेकटर किंवा दुसरा

वार्डेन साहेब, ग्रांट् साहेब लार्किन सा- हेब.

वरिष्ठ अमलदार ह्यास सन १८४३चा अकट नंबर ११ कलम १३ह्यांतील ठरावाअन्वयें त्यावतनाची जी आणखी वांटणी करणें योग्य दिसेल ती करण्यास दिवाणी कोडताचे निवाड्यावरून अटकाव होणार नाहीं; इतक्या अंशीं फुलकोडतानें जिल्हाजडूजा- चा निवाडा दुरुस्त केला, आणि खर्चा विषयीं असा ठराव केला, कीं कनिष्ठ कोडतांत जो खर्च झाला आहे तो ज्यांनीं द्यावा ह्मणून

तेथें ठराव झाला आहे त्यांनींच द्यावा, आणि सदर दिवाणी अदालतींत झालेला खर्च ज्याचा त्यानें सोसावा.

---

## स्पेशल अपील नंबर २१६९

अपिलेंट्

**रामा खानसुवा.**

रिस्पोंडेंट्

**जिबा भिकचूरी**

दावा रुपये २५.

### ठराव.

कोणी मनुष्य आपले भाऊ बंदांसहवर्तमान एकत्र रहात असतां मयत झाला, तर त्याच्या बायकोस त्याचे इतर वारसांचे अनुमतावांचून त्याची स्थावर मिळकत विकण्याचा अधिकार नाहीं.

तारीख ११ सपटेंबर सन १८५१

वादी **रामाखान** ह्यानें फिर्याद केली, कीं मीं कांहीं जमीन दोन बायकांपासून खरेदी केली. तिच्या शेजारचे बागेंत **जिवा** रहातो, त्यानें कपटानें ती घेतली आहे, सबब ती माझे कबजांत देववावी.

**जिबा** ह्यानें जबाब दिला, कीं माझा चुलता व चुलत भाऊ मयत झाल्यामुळें वारसाचे हक्कानें तंटयांतील जमीन मला मिळाली, आणि ते मयत झाल्या पासून ती एकसारखी माझे कबजांत आहे.

**त्या** उभयतांचे स्त्रियांपासून मी जमीन खरेदी घेतली असें वादी ह्मणतो; परंतु त्या स्त्रियांस कायद्याप्रमाणें सदरहू जमीन विकण्याचा अधिकार नाहीं.

ह्या फिर्यादीचा फैसल्ला मुनसफानें वादीचे वतीनें केला. त्यास त्यानें अशीं कारणें लाविलीं, कीं प्रतिवादीच्यानें आपले ह्मणण्याची शाबिदी होत नाहीं; आणि वादीनें सदरहू जमीन खरेदी केल्याच्या मजबूत पूरावा केला आहे, व ती जमीन वादीचे नांवानें दप्तरांत लागली असून त्याचे कबज्यांतही आहे, सबब त्याचे दाव्यास बळकटी येते. पुढें अपिलांत **ठाण्याचे** असिस्टंनू जड्जानें अदालतींतील शास्त्री ह्यास शास्त्रार्थ विचारल्या वरून त्यानें आपला अभिप्राय दिला, कीं जे पुरुष आपले भाऊ बंदां समागमें एकत्र रहातात, ते मयत झाल्यावर त्यांच्या स्त्रियांनीं त्यांचे वारसांचे अनुमत घेतल्यावांचून, जमीन विकली असतां ती विक्री गैरशिस्त आहे. तेव्हां ह्या अभिप्रायावरून असिस्टनानें मुनसफाचा निवाडा रद्द केला. नंतर जिल्हाजड्जाकडे अपील झालें. त्यानें असिस्टनाचा निवाडा बहाल करून असें लिहिलें, कीं भाऊबंदांचे विचारावांचून विक्रीखत मयताचें कर्ज फेडण्याकरितां जरी झालें असलें तरी तें अगदीं कायदेशीर नाहीं, व जी जमीन **जिबा** ह्याचे कबजांत हल्लीं आहे ती त्यापासून परत घेण्या करितां **रामा खानानें** विक्रीखतावरून फिर्याद केली आहे, सबब **रामाखानाचा** दावा मंजूर धरतां येत नाहीं.

**स्पेशल** आपील झाल्यावर **लिजिट्** साहेबांनीं लिहिलें, कीं ह्या मुकद्दम्यांत असें घडलें ह्मणून लिहिलें आहे, कीं दोन बायकांनीं आपले नवऱ्यांचें कर्ज वारण्याकरितां स्थावर माल विकला तर स्त्रीस आपले मयत नवऱ्याचे कर्ज फेडण्याकरितां स्थावर मि-

ळकत विकावयाचा अधिकार आहे किंवा नाहीं, ह्याविषयीं चौकशी करण्याकरितां स्पेशल अपील मंजूर केलें आहे. पुढे ह्या कलमाचा विचार फुल कोर्टानें करून असें ठरविलें, कीं सदरीं लिहिलेली मिळकत (जमीन) ज्या बायकांनीं आपले नवरे मयत झाल्यावर विकली त्यांस असें करण्यास हिंदुशास्त्राप्रमाणें अधिकार नाहीं; सबब हें अपील रद्द आहे. सर्व खर्च अपिलेंटानें द्यावा.

लिजिट् साहेब ग्रांट साहेब व लार्किन साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८२८.

अपिलेंट्.

**चिंतो सखाराम सप्तऋषी.**

रिस्पोंडेंट्

**बाळकृष्ण गोपाल भलवणकर.**

दावा रुपये ३४६८८६

**ठराव.**

कर्जरोख्यावरून फिर्याद झाली होती, ती तारीख २५ माहे जून सन १८३२ इसवीचे समजूत पत्रावरून मुदती बाहेर गेली, ह्मणून जिल्हाजड्जानें रद्द केली. मग सदर दिवाणी अदालतींत असा ठराव झाला, कीं १२ वर्षांची मुदत गणण्यांत जो शक वादींचे दाव्यास अनुकूल पडत होता, तो त्याला घेऊं द्यावयाचा होता.

कर्जरोख्यावरून व्याज मुद्दल वसूल करण्याकरितां **चिंतो सखाराम** ह्यानें **मोरेश्वर दिक्षित मनोहर** इनामदार ह्यांचे कोडतांत **बाळकृष्ण गोपाल** ह्यावर फिर्याद केली; तेव्हां **बाळकृष्ण गोपालानें** जाब दिला, कीं कर्जरोखा बनावट झालेला आहे. प्रतिवादीनें दाव्याचे सर्व रुपये वादीस द्यावे, ह्मणून इनामदारानें निवाडा केला. पुढें जिल्हाजड्जाकडे अपील झाल्यावरून त्यानें सदरहू ठराव असे कारणांवरून फिरविला, कीं कर्जरोख्यावरील साक्षीदारां पैकीं एकाची मात्र साक्ष घेतली आहे, आणि दुसऱ्याची साक्ष न घेतल्या बदल कांहीं एक कारण लिहिलें नाहीं, व कर्जरोखा तारीख ४ माहे आगष्ट सन १८३३ इसवी सालांतील आहे, आणि फिर्याद तारीख १८ माहे आगष्ट सन १८४५ इसवी रोजी, ह्मणजे फिर्याद करण्याचे मुदती बाहेर १४ दिवसांनीं झाली आहे, ह्मणून सन १८२७ इसवीचा कायदा ५ ह्यांत लिहिलेल्या मुदती बाहेर रोखा गेला, सबब मंजूर धरण्या सारखा नाहीं.

तारीख २५ सप्तें-
बर सन १८५१
इसवी.

सदरहू निवाड्यावर **चिंतो सखाराम** ह्यानें अर्ज केल्यावरून **सदर दिवाणी अदालतींत स्पेशल** अपील मंजूर झालें. त्यांत ठरावाचें कलम असें होतें, कीं अपिलेंट् (वादी) ह्याचे दाव्यास अत्यंत अनुकूल जो शक त्यापासून फिर्यादीची मुदत गणिली असतां मुदतीचे कायद्याप्रमाणें फिर्याद मुदतींत येते, असें असून त्याच कायद्यावरून जिल्हाजड्जानें ती ना मंजूर केली, हें कायद्या विरुद्ध झालें किंवा कसें.

वॉर्डिन साहेब.

नंतर फुल कोडतानें सदरहू कलमाबदल ठराव केला, कीं ता-

लिजिट् साहेब ग्रांट साहेब आणि लॉकिन साहेब.

रीख २५ माहे जून सन १८३२ इसवीचे समजूतपत्रावरून ज्याचें नुकसान होत असेल तो ह्यानें केवळ प्रतिवादीच समजतां येत नाहीं. कायदा ५ ह्यांत वादीचे हक्काची यत्ता ठरविली आहे, ह्मणून त्या कायद्या खालीं जे खटले येतात त्यांमध्यें ज्याचें नुकसान होत असेल तो ह्मटला ह्मणजे बहुत करून वादीच होईल, ह्याकरितां नंबर २३१ चे * मुकदम्यांत ह्याच कोडतांतील पूर्वीचे जड्जांचे बहुमतानें जो ठराव झाला आहे तो हल्लींचे जड्ज मान्य करीत नाहींत. सांप्रतचे मुकदम्यांत तारीख २५ माहे जून सन १८३२ इसवींचें समजूतपत्राअन्वयें वादीला त्याचे दाव्यास अनुकूल शक धरूं दिला नाहीं, हें काम कनिष्ठ कोडतानें कायद्या विरुद्ध केलें. कर्जरोखा श्रावण वद्य ४ शके १७५५ नांत झाला, आणि फिर्याद श्रावण वद्य १ शके १७६७ सालांत झाली, सबब वादीचे दाव्यास **शालिवाहन** शक हाच अनुकूल पडतो. कारण त्यावरून पाहिलें असतां बारा वर्षें भरण्यापूर्वी तीन दिवस फिर्याद झाली असें होतें; व सन १८४३ इसवीच्या १२ व्या अक्टांतील ठरावाप्रमाणें तो निवाडा झाला नाहीं, ह्मणून तो बरोबर झाला नाहीं असें समजलें पाहिजे. ह्या सर्व कारणांवरून जड्जाचा निवाडा रद्द करून हा खटला पुनः अपिलांत चौकशी होण्या करितां परत पाठविला आहे, व ह्या कोडतांत जो खर्च झाला आहे, त्याबद्दल हिस्सेरशी जिल्हा जड्जानें नवे निवाड्यांत ठरवावी.

---

*. बेलाशीस साहेबानें सदर दिवाणी अदालतीचे मुकदमे ज्या पुस्तकांत लिहिले आहेत त्याचे ९० वे पृष्ठावर पाहिल्या वरून कळेल.

---

## स्पेशल अपील नंबर २७१३

अपिलेंट्

**लक्ष्मण उद्धव कुळकर्णी**

रिस्पोंडेंट्

**गणू वल्लद हरजी पाटील**

दावा रुपये १५८१२८९

**ठराव**

कुळकर्णीपणाचा हक्क मिळण्याविषयीं फिर्याद झाली होती, परंतु सदरहू हक्काबद्दल मला अमूक रुपये घेणें आहेत असा वादीच्यानें पुरावा झाला नाहीं, तेव्हां त्या फिर्यादींत असा ठराव झाला, कीं आपल्या दाव्याचे शाबिती करितां कलेकटराची साक्ष व त्याचे दप्तराचा दाखला मिळण्या विषयीं वादीस कोडताची मदत मागण्याचा हक्क आहे.

तारीख १९ वंबर सन १८५१

कुळकर्णीपणाच्याहक्का बदल पांच सालचें धान्य गणूचे शेता पैकीं घेण्या करितां **लक्ष्मण** ह्यानें ही फिर्याद केली. **गणूनें** तकरार केली, कीं **लक्ष्मणानें** जास्ती दावा केला आहे. **अहमद नगर** जिल्हयांतील **सिंनरचे** मुनसफानें सदरहू दावा असे कारणा वरून रद्द केला, कीं प्रतिवादीकडून माझे अमूक रुपये घेणें निघतात असा वादीनें पुरावा दिला नाहीं. अपिलांत जडजानें सदरहू कारणावरूनच मुनसफाचा निवाडा कायम

केला"

**लक्ष्मणानें सदर अदालतीस** अर्ज केला, त्यांत ह्या मुकदम्या प्रकर्णी त्यानें पुष्कळ हकीकत लिहिली होती, आणि तींत त्यानें असें लिहिलें होतें, कीं माझे हक्काचे रकमे बद्दल मला दाखला द्यावा ह्मणून मीं कलेकटराकडे अर्ज केला असतां त्यानें हुकूम दिला, कीं तुह्मीं कोडत मार्फत अर्ज करावा, त्यावरून मीं दाखला मिळण्याविषयीं कोडतास अर्ज केला, परंतु कोडतांनीं माझा अर्ज नाकबूल केला, सबब माझें **स्पेशल** अपील मंजूर करावें. आपल्या दाव्याची शाबीती करण्याकरितां कलेकटर साहेबा कडून त्याचे दप्तराचा दाखला आणण्याविषयीं कोडताची मदत मागण्यास **अपिलेंटास** हक्क आहे कींवा नाहीं, हें पहाण्याकरितां सदरहू अर्ज **लिजिट** साहेबांनीं कबूल केला. ह्या मुकदम्याचा फुल कोडतानें विचार करून ठराव केला, कीं ह्या प्रकारची मदत मागण्यास वादीस हक्क आहे.

लिजिट साहेब ग्रांट साहेब व लार्किन साहेब.

ह्या कारणावरून मुनसफ व जिल्हा जडज ह्यांचे निवाडे **रद्द** झाले, आणि सदरहू मुकदम्याची मुनसफानें पुन्हः चौकशी करून फैसल्ला करण्याकरितां **सदर अदालतीनें** तो मुकदमा परत पाठवून हुकूम केला, कीं **सदर अदालतींत** पक्षकारांस जो खर्च झाला आहे त्याचा ठराव नवीन निवाडा करते वेळेस करावा.

---

## स्पेशल अपील नंबर २५४२.

अपिलेंट.

**महादाजी बिन विठोजी चव्हाण.**

रिस्पेंडेंट्.

**रुपाजी बिन विठोजी**, अज्ञान, पालण करणार त्याची आई.

दावा रुपये ७८८६१०

**ठराव.**

काळी कडील अमलदारांनीं ज्या मनुष्यास गतकुळी शेत वहिवाटीस दिलें, त्या व्यतिरिक्त दुसरे मनुष्याचा त्या शेतावर हक्क आहे, व त्याकडून तें शेत आपले ताब्यांत घेण्याविषयीं दुसऱ्यास अखत्यारी आहे, असा दोन्ही कनिष्ठ कोडतांनीं ठराव केला तो गेराशिस्त केला, असें सदर दिवाणी अदालतीनें ठरविलें.

तारीख ७ मार्च सन १८५१

**महादाजी** बिन **विठोजी** ह्यास माझे बापानें अर्धेलीच्या करारानें कांहीं शेत लावणीस दिलें होतें, तें शेत माझें आहे, सबब मला परत देववावें, ह्मणून **रुपाजी** बिन **विठोजी** ह्यानें ही फिर्याद केली.

प्रतिवादीनें तकरार केली, कीं सदरहू शेताची मी लावणी करितों, तें शेत मिराशी नाहीं गतकुळी आहे, व सारा मी सरकारांत देत असतों, सबब सदरहू शेतावर वादीचा हक्क नाहीं.

वादीचे बापाकडून प्रतिवादीनें सदरहू शेत वर लिहिलेल्या करारानें अगर दुसरे प्रकारें लावणीस घेतलें, ह्याविषयीं कांहींच पुरावा नाहीं, आणि कलेकटराच्या दप्तरावरून असा पुरावा होतो, कीं शेत गतकुळी आहे, व **महादाजी** बिन **विठोजी** हा शेताची वहिवाट करून सरकारास सारा देत असतो, ह्या कारणावरून मुनसफानें वादीचा दावा रद्द केला.

अपिलांत असिस्टन जड्जानें सदरहू निवाडा रद्द केला. त्यानें असें लिहिलें, कीं जे कागद वादीनें पुराव्यास दिले आहेत त्यांवरून असें कळतें, कीं कलेकटराचे दप्तरांत कांहीं वर्षें वादीचे नांवें सदरहू शेत लागलें आहे, ह्यावरून असें अनुमान होतें, कीं वादीला सरकार मालक समजत होतें, ह्याकरितां जर कलेकटराचे नजरेस येईल, कीं वादीपेक्षां प्रतिवादीचा हक्क अधीक आहे तर तें शेत त्यास देण्यास कलेकटर मुख्त्यार आहे.

मुळचे प्रतिवादीनें जिल्हे जड्जाकडे अपील केलें, तेव्हां जड्जानें असिस्टंट जड्जाचा निवाडा त्यानें लावलेल्या कारणां वरून कायम केला.

नंतर मुळच्या प्रतिवादीनें **सदर दिवाणी अदालतींत स्पेशल** अपील मंजूर होण्याकरितां अर्ज करून त्यांत असें लिहिलें, कीं हें शेत गत कुळी ह्मणून ठरलें आहे, ह्यास्तव कले- कटरानें ज्याच्या कबजांत जमीन दिली आहे त्यापेक्षां त्या शेता- वर दुसरे कोणाचा हक्क मजबूत नाहीं, आणि जड्ज व असिष्टंन जड्ज ह्यांनीं वादीच्या नावानें शेत होतें इतकेच कारणावरून वादी तर्फे निवाडा केला, तो कायद्याबरहुकूम नाहीं.

**हट** साहेबांनीं ह्या खटल्याची प्रथम चौकशी केली, तेव्हां त्यांचे नजरेस आलें, कीं **अपिलेंटा**ची तकरार वास्तवीक आहे, सबब कालीकडील अमलदारांनीं ज्या मनुष्यास गतकुळी शेत वहिवाटीस दिलें आहे, त्या व्यतिरिक्त दुसरे मनुष्याचा त्या शेता वर हक्क आहे, आणि त्याकडून तें गतकुळी शेत आपले ताब्यांत घेण्याविषयीं दुसऱ्यास अखत्यार आहे, असा कनिष्ट कोडतांनीं निवाडा केला तो गैरशिस्त किंवा कसें, ह्या **बद्दल**

ठराव करण्याकरितां हट साहेबांनीं सदर्हू अर्ज मंजूर केला. फुल कोडतानें ठराव केला, कीं जड्ज व असिस्टंट जड्ज ह्यांनीं जो ठराव केला तो गैरशिस्त केला; सबब त्यांचा निवाडा रद्द करून मुनसफाचा निवाडा बहाल केला असे.

बेलसाहेब, वार्डिन साहेब व लिजिट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २८७०.

अपिलेंट्

**विठू दयाळजी गुजर**

रिस्पोंडेंट्

**महादाजी केशव दामले**

दावा रुपये ५०

### ठराव

**सदर अदालतीनें** ठराव केला, कीं एका मुकदम्यांत साक्षीदारांनीं ज्या साक्षी दिल्या असतील त्या साक्षी दुसरे मुकदम्यांत वादी प्रतिवादी निराळे असल्यास पुराव्यास घेऊं नयेत, त्या साक्षीदारांच्या साक्षी पुन्हा घ्याव्या, व गहाणमालावरील टांच उठविण्याकरितां फिर्याद करणें ती जितके रुपयांबदल टांच लाविली असेल तितक्याच रुपयांची करण्यास चिंता नाहीं.

**विटू दयाळजी** गुजर ह्यानें फिर्याद केली, कीं **महादाजी केशव दामले** ह्यानें गहाण खत बेचन घेतलें, आणि त्यावरून **जाधव** ह्या वर हुकूम नामा करून घेऊन **रत्नागिरी** जिल्ह्यांतील त्याचें

तारीख ७ मार्च सन १८५१

एक शेत व **अनवरे** गांवचा कांहीं थोडा हिस्सा वगैरे माल मत्ते वर ५० रुपयांकरितां टांच बसविली आहे. त्यास ती माल मत्ता मजकडे गहाण आहे, सबब ती टांच उठवावी. ही फिर्याद ५० रुपयांची लावली होती; व वादीनें आणखी असें लिहिलें होतें, कीं सदरहू सर्व गांव मजकडे दुसरे लोकांकडून गहाण आहे.

**हरणई**चे मुनसफानें मुकद्दम्याची चौकशी करून हुकूमनामा केला, कीं बेचन घेतलेले गहाण खतावरून तंटयांतील माल कबजांत घेण्याविषयीं तजवीज न करितां रुपये घेण्याविषयीं **जाधव** ह्यावर **महादाजी**नें फिर्याद केली; तर एथेंच त्याची चूक झाली, आणि आतां गहाणदार ह्मणून माल कबजांत घेण्या विषयीं तजवीज करतो तर तो त्याला मिळणार नाहीं. जावेळेस **महादाजी**नें सदरहू मालावर टांच बसविली त्यावेळेस **विठू दयाळजी** ह्याचे कबजांत तो माल होता, असा पुरावा झाला आहे, व जप्ती उठविण्याविषयीं त्यानें फिर्याद केली आहे; व गहाण खतांवरून त्याचा हक्क मजबूत पोंहचतो; सबब तो माल त्याचे हातांतून काढला जाणार नाहीं. आणखी अशी गोष्ट आहे, कीं पूर्वीं **जाधव** ह्यानें **विठूजी** पासून सदरहू माल परत घेण्या विषयीं फिर्याद केली होती, तिचे निर्णयावरून **विठोजी**चे दाव्यास मजबूती येते, आणि **महादाजी**चा सदरहू गहाणमालावर कांहीं दावा नाहीं असें होतें, तर सदरहू जप्ती उठवावी.

**कोंकणां**तील **रत्नागिरी**चे असिस्टन जडूजाचे कोडतांत **माहादाजी**नें अपीलअर्जी केली, कीं **विठूजी** ह्यानें पुराव्यास दाखल केलेल्या गहाणखतां पैकीं दोन गहाण खतें बनाऊ आहेत. जर तीं बनाऊ नसतीं तर तीं छापील कागदांवर लिहिलेलीं असतीं; व

जो गांव मजकडे गहाण आहे असे **विठू** ह्मणतो त्या गांवाचा कांहीं हिस्सा सुद्धां त्याकडे नाहीं. त्या गांवचा आठवा हिस्सा **जिवाजी जाधव, मानाजी जाधव, व गुणाजी जाधव,** ह्यांनीं **जीवनराव रामाजी कानडे** ह्याकडे गहाण ठेविला होता. पुढें **जीवनराव** मयत झाल्यावर त्याचे बायकोनें मला तें गहाणखत बेचन दिलें. पुढें त्या गहाणखतावरून मीं फिर्याद केली, तेव्हां माझे तर्फे हुकूमनामा झाला, सबब जो गांवचा हिस्सा गहाण खतांत लिहिला आहे त्यांतून गहाण खताचा ऐवज वसूल करण्यास माझा हक्क आहे.

ह्या मुकद्दम्याचा निकाल करते समयीं **सिनियर असिस्टन जड्जानें महादाजीचे** अर्जीचा व मुनसफाचे हुकूम नाम्याचा संक्षेपानें उलेख करून असें लिहिलें, कीं **महादाजीची** पहिली तकरार अशी आहे, कीं जीं खतें **विठूनें** हजर केलीं आहेत, तीं बनाऊ आहेत, त्यास ही तकरार खरी आहे किंवा कशी ह्याचा कोडत विचार करीत नाहीं. त्यास इतकें लिहिणें आहे, कीं मुनसफानें गहाणखतांवरील साक्षीदारांच्या साक्षी घेतल्या नाहींत. तो आपल्या हुकूमनाम्यांत लिहितो, कीं **जाधव** ह्यानें **विठूवर** फिर्याद केली होती, तेव्हां सदरहू साक्षीदारांनीं साक्षी दिल्या आहेत; सबब पुनः त्यांची साक्ष घेणें जरूर नाहीं. हें काम मुनसफानें गैर शिस्त केलें, कारण असा ठराव झालेला आहे, कीं साक्षीदार येण्या सारिखे असतां त्यांची साक्ष न घेतां तिऱ्हाईत पक्षकारांचे मुकदम्यांत ज्या त्यांनीं साक्षी दिल्या त्या पुराव्यास घेणें हें गैरशिस्त आहे. दुसरें असें आहे, कीं **विठू** ह्यानें जीं चार खतें दाखल केलीं तीं रुपये १८०६४ ह्यांचीं आहेत, व ही फिर्याद रुपये ५० ची केली आहे. * त्यास आमचे नजरेस असें येतें, कीं **विठू**

ची फिर्याद गैर शिस्त आहे, कारण कीं कोणी एका मनुष्यानें शेताबद्दल मालकीचा हक्क शाबीत करण्याकरितां नव्हे, तर शेताची वहिवाट कांहीं दिवस पावेतों गहाणाचे संबंधानें आपले कबजांत घेण्याकरितां फिर्याद केली होती, तेव्हां त्या खटल्यांत शेताचे किमती बरहुकूम दावा असावा किंवा कसें ह्मणून प्रश्न विचारल्यावरून ठराव झाला आहे, कीं जितका ऐवज त्या शेतावर वादीस घेणें आहे, तितक्याची त्यानें फिर्याद करावी, शेताचे किमती इतका दावा करू नये. ह्या मुकदम्यांत **विठूनें** चार रोखे दाखल केले आहेत, तर त्याचा हेतु असा आहे, कीं ते खरे आहेत असें शाबीत करावें. आणखी असें आहे, कीं **महादाजीचा जाधव** ह्यावर जो हुकूमनामा झाला त्यावरून तंटयांतील मालावर त्यानें जप्ती बसविली आहे. त्या हुकूमनाम्यावर **जाधव** ह्यानें अपील केलें होतें, परंतु तो हुकूमनामा अपिलांत कायम राहिला, त्यास **जाधव** ह्यानें जें गहाणखत लिहून दिलें त्या गहाणखतावरून जो ऐवज येणें तो घेण्या करितां **महादाजीनें** फिर्याद केली होती, व त्याचा दावा दोन कोडतांत शाबीत झाला आहे, सबब **महादाजी** ( गहाणदार ) ह्यास व्याजमुद्दल मिळून रुपये १५२ वसूल करण्याकरितां तंटयांतील मालावर टांच लावण्यास हक्क आहे. गहाणाच्या संबंधानें **विठूचे** ताब्यांत जो माल आहे तो घेण्याकरितां **जाधव** ह्यानें प्रयत्न केला असतां **विठु** ह्यापाशीं जें गहाणखत आहे त्याबद्दल रुपये घेण्याकरितां ह्या वेळपावेतों त्यानें फिर्याद केली नाहीं. ह्या सर्व कारणांवरून आमचे नजरेस येतें, कीं गहाणाचा पैसा व्याजासुद्धां जो **महादाजीस** घेणें निघतो तो त्यास तंटयांतील मालांतून मिळावा, सबब कनिष्ठ कोडताचा नीवाडा रद्द करून टांच कायम केली आहे, सव

खर्च विठूनें द्यावा. ह्या निवाडयावर सदर अदालतींत स्पेशल अपील मंजूर व्हावें, ह्मणुन विठूनें अर्ज केला. त्यांत त्यानें अशी तकरार लिहीली, कीं मुनसफानें दुसऱ्या खटल्यांतील साक्षदारांच्या साक्षी ह्या खटल्यांत पुराव्यास घेतल्या, ह्यांत मजकडे कांहीं दोष नाहीं, कारण कीं मी कोडतास दरखास्त केली होती, कीं साक्षीदारांस समान करून त्यांची साक्ष घ्यावी, व गहाणमाल गहाण दाराचे कबज्यांत असतां त्या मालाची तिऱ्हाईत मनुष्यानें जप्ती केली, तर ती दूर करण्याविषयीं गहाण मालावर जितका ऐवज दिला असेल तितक्या ऐवजाची गहाणदारास फिर्याद करावयास पाहिजे, असें कायद्यावरून होत नाहीं. विठूजीनें आपले मूळ फिर्यादीचें कारणही अर्जांत लिहिलें होतें. तेव्हां प्रथमतः चौकशी करणारे जड्ज ग्रांट साहेब ह्यांनीं अर्जाचा विचार करून असें लिहिलें, कीं मुनसफानें साक्षीदारांची साक्ष न घेतां दुसरे मुकदम्यांत त्या साक्षीदारांनीं दिलेली साक्ष पुराव्यास घेतली, हें गैरशिस्त केलें. ह्या बदल आमचा अभिप्राय असा आहे, कीं वरिष्ट असिष्टन जड्जानें मुकदमा परत पाठवून हुकूम करावयाचा होता, कीं ही चूक दुरुस्त करावी, कारण कीं, विठूनें अव्वल फिर्यादींत, साक्षीदारांस बोलावून त्यांची साक्ष घेण्याविषयीं दरखास्त केली होती. ह्या कारणावरून व मालावरील टांच उठविण्याची फिर्याद करणें असल्यास गहाण मालावर जितका ऐवज येणें तितक्या ऐवजाची फिर्याद करावी, अगर जितक्या रुपयांबदल गहाण मालावर टांच लागली आहे तितके रुपयांची फिर्याद करावी ह्याचा ठराव करणें जरूर आहे, ह्या कारणावरून हें स्पेशल अपील आह्मीं मंजूर केलें आहे.

फुल कोडतानें ठराव केला, कीं एका मुकदम्यांत दिलेली साक्ष

बेल साहेब, वार्डिन साहेब, व लिजिट् साहेब.

दुसरे मुकदम्यांत पुराव्यास घेणें ह्या बदल प्रारंभीं चौकशी करणारे जड्जानें जो अभिप्राय दिला आहे त्या प्रमाणेंच आमचा अभिप्राय आहे, वजप्त झालेल्या मालावरील" टांच उठविण्याकरितां जो दावा करणे तो दावा ज्या रकमे करितां गहाणमालावर टांच लाविली असेल तितक्या रकमेचा करण्यास हरकत नाहीं. आणि ह्या कारणावरून वरिष्ट असिष्टन् जड्जाचा हुकूम नामा रद्द केला आहे, आाणि पुन्हा चौकशी करण्याकरितां मुकदमा परत पाठवून हुकूम केला आहे, कीं सदर अदालतींतील पक्षकरांस जो खर्च झाला आहे त्याचा ठराव नवीन निवाडा करते वेळेस करावा.

---

एका सावकाराचे वतीनें हुकूमनामा झाला होता. त्या सावकारानें हुकूम नाम्यावरून एका शेतावर टांच लाविली होती, तेव्हां त्या शेताचा मी धारा देणारा आहें, सबब माझे कबजांत असावें, ह्मणून धारा देंणारानें फिर्याद केली होती. त्या मुकदम्यांत (नंबर २९६५) सदर अदालतीनें असें ठराविलें, कीं धारा देणाऱ्यास एक सालचे धाऱ्याचे रकमे इतकी फिर्याद करावयाचा अधिकार आहे. ज्या ऐवजाकरितां टांच बसविली होती त्या ऐवजा इतकी फिर्याद करणें त्यास कांहीं जरूर नाहीं.

---

## स्पेलश अपील नंबर. २५७०

अपिलेंट्

**लाला त्रिकम.**

रिस्पोंडेंट्

## भिकाऊर्फ चबेला केशव; वालजी केशव व पितांबर केशव.

दावा रुपये १६.

### ठराव.

**सदर अदालतीनें** असें ठरविलें, कीं भाऊ एकत्र रहात असतां वडील भावास स्वसंपादित माल आपल्या कनिष्ठ बधूंचे अनुमताशिवाय विकण्यास देश चालीवरून अधिकार आहे, वसंन १८२७ चा कायदा ४ कलम २६ ह्याप्रमाणें देश चालीला प्रतिवादीचे शास्त्रापेक्षां प्राधान्य आहे.

तारीख ३ सपटेंबर सन १८५१

**भिकाऊर्फ चबेला केशव** व त्याचे भाऊ **वालजी** व **पितांबर** ह्यांनीं आपला वडील भाऊ **नारायण केशव** व **लाला त्रिकम** ह्यांवर फिर्याद केली, कीं आह्मी व **नारायण केशव** असे चार भाऊ आहों. **घोडबंदर** एथें आमचे बापानें अर्धे घर विकत घेतलें, त्या घरांत आमचा चौघांचा हिस्सा असून **नारायण केशव** ह्यानें **लाला त्रिकम** ह्यास तें अर्धे घर विकत दिलें, त्यास त्यापैकीं आमचे हिस्से आह्मांस परत देववावे. प्रतिवादी जाब देण्यास हजर झाले नाहींत.

**ठाण्याचे** मुनसफानें ठराव केला, कीं वादी व त्याचे भाऊ हे जरी एकत्र रहात आहेत, व जिनगीची जरी वाटणी झाली नाहीं तरी सदरहू अर्धे घर धाकटे भावांचे अनुमताशिवाय विकण्याचा अधिकार वडील भावास देश चालीवरून आहे, सबब वादीचा दावा रद्द केला असे. माजी मुनसफानें ठाणे एथील शास्त्री ह्याकडून शास्त्रार्थ आणविला आहे तो शास्त्रार्थ वादीस अनुकूल आहे; परंतु तो शास्त्रार्थ वडिलोपार्जित मिळकतीस लागू आहे, आणि तं-

**टयांतील मिळकत स्वतां** मिळविलेली आहे. अपिलांत जिल्हा जड्जानें मुनसफाचा हुकूमनामा असे कारणावरून रद्द केला, कीं शास्त्री ह्यानें दिलेला शास्त्रार्थ यथार्थ आहे, आणि त्या शास्त्रार्था प्रमाणें मुनसफानें ठराव करावयाचा होता. कारण ज्या मालाचा व्यापार करून सर्व भाऊ उपजीविका करीत आहेत, तो माल **नारायण** हा वडील भाऊ आहे, ह्मणून त्यास विकण्यास जरी अधिकार कदाचित् असला, तरी ज्या ठिकाणीं तंटा उत्पन्न झाला आहे त्या ठिकाणचे चालीवरून वडिलोपार्जित मिळकतीपैकीं कांहीं मिळकत कनिष्ट बंधूंचे अनुमतावांचून त्याला विकण्यास अधिकार नाहीं.

जिल्हे जड्जाचे निवाडयावर **लाला त्रिकम** ह्यानें एकटयानेंच **सदर अदालतींत** स्पेशल अपील मंजूर व्हावें ह्मणून अर्ज केला, आणि त्यांत तकरार लिहिली, कीं सर्व मुकदम्यांत शास्त्रापेक्षां देशचाल प्रधान धरितात, असें असून ती चाल सोडून जिल्हे जड्जानें शास्त्री ह्याच्या अभिप्रायाप्रमाणें ठराव केला, ह्याकरितां तो न्यायास विरुद्ध आहे, कारण तंटयांतील माल वडिलोपार्जित नाहीं. नाझरानें लिलाव केला त्या लिलावांत **नारायण** ह्यानें हा माल विकत घेतला व तो **नारायण** ह्या पासून मीं विकत घेतला. तेव्हां प्रारंभीं चवकशी करणारे जड्ज **हट** साहेब ह्यांनीं असा अभिप्राय लिहिला, कीं अपिलेंटाची तकरार अशी आहे, कीं पक्षकारांचे शास्त्रापेक्षां देशचाल प्रधान असें कायद्यांत आहे, त्यास ही तकरार जड्जाचे निवाडयास लागू पडते, व मुनसफानें देशचालीवरून निवाडा केला आहे, परंतु सदरहू देश चालीबद्दल त्यानें साक्षी पुरावा घेतला नाहीं. अवल फिर्यादींत अपिलेंट् जाब

देण्यास हजर झाला नाहीं, ह्यामुळें त्याचे अपील वस्तुतः मंजूर करूं नये; परंतु मेहरबानगीनें केलें आहे.

फुल कोडतानें असें लिहिलें, कीं सदरहू बाबतींत विचार करण्याचें कलम असें आहे, कीं देश चालीप्रमाणें अथवा शास्त्राप्रमाणें चालावें, व **नारायण** ह्यास देश चालीप्रमाणें आपले बंधूंचे अनुमता खेरीज तंटच्यांतील माल विकण्यास अधिकार आहे असा कनिष्ठ कोडतानें ठराव केला आहे, तो जी वहिवाट चालू आहे तीस सोडून केला किंवा कसें.

लिजिट्र साहेब, ग्रांट साहेब, व लार्किन साहेब.

मुनसफ आपले ठरावांत लिहितो, कीं भावांनीं ( वादी ह्यांनीं ) सदरहू घर वडिलोपार्जित आहे, असें शाबीत केलें नाहीं, आणि अशी गोष्ट आहे, ह्याकरितां मुनसफानें देश चालीविषयीं जरी कांहीं पुरावा घेतला नाहीं तरी ती अमुक रीतीची आहे, ह्मणून त्यानें जो ठराव केला तो बरोबर आहे, असें मानण्यास हरकत दिसत नाहीं, व स्पेशल अपिलांतील अपिलेंट् ( **लाला त्रिकम** ) ह्याला घर विकण्यास वडील भावास अखत्यार आहे, असें ही मानण्यास बाध दिसत नाहीं.

जड्जानें देशचालीपेक्षां शास्त्र प्रधान धरिलें, हें बरोबर आहे किंवा कसें. ह्याविषयीं आह्मास इतकें लिहिणें आहे, कीं जो माल वडिलोपार्जित नाहीं तो देशचालीवरून धाकटे भावांचे संमता शिवाय विकण्यास वडील भावास अधिकार आहे, असा मुनसफाचा अभिप्राय आहे, तो गैरशिस्त आहे असें दाखविणारें जड्जाचे निवाड्यांत कांहींच नाहीं, सबब शास्त्री ह्याचा शास्त्रार्थ घेण्याची जरूर नव्हती, व तो ह्या मुकदम्यास लागू ही नाहीं. सन १८२७ चा कायदा ४ कलम २६ ह्याचे अन्वयें देशचाल प्रतिवादीचे

शास्त्रापेक्षां प्रधान आहे; सबब जड्जाचा हुकूमनामा रद्द करून रिस्पोंडेंट् ह्यावर खर्च घातला असे.

---

## स्पेशल अपील नंबर २९३८.

अपिलेंट्

**गोपाळ दीक्षित** बिन भास्कर दीक्षित, **मयत**, त्याचा वारस पुत्र **दामोदर दीक्षित.**

रिस्पोंडेंट्

**व्यंकापा नाईक** ह्याचे नांवचें दुकान, वहिवाट करणार **वासुदेव नारायण धारवाडकर.**

दावा रुपये ९९१८६८४

### ठराव.

**अ**नें कांहीं माल **ब** जवळ गहाण ठेविला, आणि तो **ब**चे ताब्यांत होता; आणि **क**नें **अ**वर कर्जाबद्दल हुकूमनामा करून घेऊन त्या मालावर जप्ती बसविली; परंतु त्या मालावर आपल्या हुकूमनाम्याचा उलगडा करून घेण्याविषयीं आपणास हक्क आहे असा पुरावा केला नाहीं, तेव्हां ह्या खटल्यांत सदर अदालतीनें असा ठराव केला, कीं गहाणदार जो **ब** त्याचा हक्क **क** पेक्षां सदरहू मालावर अधिक आहे.

**गोपाळ दीक्षित** ह्यानें फिर्याद केली, कीं **व्यंकापा नाईक**

ह्याचे दुकानाची वहिवाट करणार **वासुदेव नारायण धारवाडकर** ह्यानें कर्जाबद्दल **राम भटावर** फिर्याद करून त्यावर हुकूम नामा करून घेतला, आणि त्याचें ह्मणून ४ बिघे शेतावर टांच बसविली; परंतु तें शेत **राम भटानें** मजपाशीं गहाण ठेविलें आहे, सबब सदरहू टांच उठवावी.

तारीख १८ सपटेंबर सन १८५१

अवल कोडतानें वादीचादावा मुख्यत्वें असें कारणावरून रद्द केला, कीं सदरहू शेत तीन भावांचें असून **रामभट** हा कनिष्ठ बंधु असतां वडील भावाचे अनुमताशिवाय त्यानें तें शेत गहाण ठेविलें, तर असें करण्यास त्यास अधिकार नव्हता. त्या हुकूम नाम्यावर पुण्याचे असिष्टन जड्जाकडे अपील झालें, तेव्हां त्यानें असा ठराव केला, कीं गहाणखतांत **रामभट** ह्यानें असा साफ करार लिहून दिला आहे, कीं मी चार महिन्याचे आंत तुम्हांस ( गहाण दार दिक्षीत ह्यांस ) दुसरे दोन हिस्से दार **धोंडो काशिनाथ** व **नारायण भट** ह्यांचीं अशीं पत्रें आणून देईन, कीं आमचे भावानें जी देवघेव केली, ती आह्मा सर्वांस कबूल आहे; तेव्हां शेताचे सदरहू हिस्से दारांनीं **रामभट** हा आमचा मुकत्यार ह्मणून सदरहू समाईक शेत गहाण ठेवण्यास त्याला अधिकार दिला होता किंवा काय, ह्या विषयीं किंवा **रामभट** ह्यानें गहाणखतांत जे करार लिहून दिले होते ते करार पुढें हिस्सेदारांनीं कबूल केले किंवा नाहीं, ह्या विषयीं तोंडचा पुरावा मिळण्या सारखा असता तर कनिष्ट कोडतानें घ्यावयाचा होता. आह्मांस असें वाटतें, कीं साधारण नेम ह्मठला ह्मणजे लेखी दस्त ऐवजांत कांहीं मजकूर लिहिणें राहिला, अथवा कांहीं मजकूर संशयात्मक असला तर त्याची शाबिती करण्या करितां तोंडची साक्ष घेऊंनये; परंतु ह्या-

मुकदम्याप्रमाणं जर दस्तऐवजांत कोणती गोष्ट कमी आहे ती सांगितली असली, आणि ती कमताई दूरकरण्याचा उपाय सांगितला असला, तर सदरहू नियम कोडतानें बरें दिसल्यास मोडावा; आणखी आह्मांस असें वाटतें, कीं कांहीं पत्रें दाखल केलीं आहेत, तीं गहाणखाताच्या पुरवण्या ह्मणून घेतां येत नाहींत, कारण तीं साधे कागदावर आहेत, परंतु ज्यामनुष्यांनीं तीं पत्रें लिहिलीं आहेत ते पड साक्षी होण्यास त्यागोष्टी वरून कांहीं हरकत नाहीं. अव्वल मुकदम्यांत जी दरखास्त वादीनें दिली आहे तींत ज्या साक्षीदारांचीं नावें आहेत त्यांच्या व सदरहू मनुष्यांच्या जबान्या गहाणखतांतला मजकूर खरा आहेकिंवा कसें हें पहाण्याकरितां घ्याव्या.

ह्या सर्व कारणांवरून असिस्टन जड्जानें हामुकदमा मुनसफाकडे पुन्हा चौकशी होऊन नवीन निवाडा होण्याकरितां परत पाठविला. मग मुनसफानें पुन्हा चौकशी करून वादीतर्फे निवाडा केला, परंतु त्यानें वादीचा दावा कांहीं अंशीं नामंजूर केला. पुढें ह्या निवाडच्यावर उभय पक्षकारांनीं असिस्टन जड्जाचे कोडतांत अपिलें केलीं तेव्हां त्यानें ह्या प्रमाणें निकाल केला.

"गहाणखतांत दुसरेदोन मनुष्यांचीं नावें लिहिलीं आहेत. ते दोघे व मी मिळून शेताचे समईक मालक आहों, असें रामभटानें कबूल केलें आहे, व त्या दोघांचे हिशांचें शेत रामभट ह्यानें नि १० चे गहाणखतांत गहाण लावून दिलें आहे, त्यास तें रामभटाला गहाण ठेवण्यास अधिकार होता असा पुरावा कोडतास कांहीं दिसत नाहीं, व आपला हिस्सा गहाण ठेवण्यास रामभट ह्यास अधिकार आहे. परंतु त्याचे हिशाचें शेत किती आहे अगर त्याची किमत कायआहे, हें कोडताचे नजरेस येतना-

हीं. आतां पहिले कलमाबदल देशचाल कशी आहे, ह्याविषयीं माहीतगार अशा जुरीचें * मत कोर्टत दाखल करितें. दुसरें कलमाबदल पुरावा देण्या करितां दामोदरदीक्षितास चार दिवसांची फुरसत दिली आहे. सदरहू कारणावरून खटला तहकूब केला होता. तोपुढें चौकशीस निघाला, तेव्हां असिस्टन जड्जानें खालीं लिहिल्या प्रमाणें ठराव केला.

कोडतानें ठराव केलाच आहे, कीं रामभट हा विभक्त असून कनिष्ठ बंधु आहे. सबब नि १० चे गहाणखतांत लिहिलेल्या शेतापैकीं आपले हिशाखेरीज बाकी शेत त्यास गहाण ठेवाण्यास अधिकार नाहीं. दोन साक्षीदारांच्या हल्लीं साक्षी घेतल्या त्यांवरून व एका वडील भावाच्या मुलाच्या मुखत्यारपत्रावरून कोडताचे नजरेत असें येतें, कीं सदरहू शेतापैकीं तिसरा हिस्सा रामभट ह्याचा आहे, सबब नुनतर्फ ह्याचा हुकूमनामा दुरूस्त करून रामभट ह्याच्या तिसऱ्या हिशावरील टांच उठविली आहे. अव्वल कज्जांत व दोन्ही अपिलांत जोखर्च झाला असेल तो पक्षकारांनीं हिसेरशीनें द्यावा.

रामभटानें वादीकडे माल गहाण लावून दिला आहे, आणि

---

* टीप. देशचालीं अन्वयें रामभट ह्यास एकट्यासच सदरहू शेत गहाण लावून देण्यास अधिकार आहे किंवा कसें, ह्मणून जुरीस प्रश्न विचारल्यावरून तिनें जबाब दिला, कीं जर भाऊ विभक्त रहात असले तर तिघा भावांचा माल एका भावास गहाण लावून देण्यास अधिकार नाहीं, व गहाण खतावरून दिसून येतें, कीं गहाण देणारा व घेणारा ह्यांस माहीत होतें, कीं गहाणखतांतील मालाचे दुसरे हिस्सेदार आहेत, ते विभक्त रहात आहेत, व त्यांचे हिस्से त्यांचे अनुमताशिवाय गहाण ठेविले जाणार नाहींत.

तो वादीचे कबजांत आहे, आणि त्या मालावर प्रतिवादीनें टांच बसविली आहे. आतां रामभटानें जो माल गहाण लावून दिला आहे त्यांत दुसरे दोन मनुष्यांचे हिस्से आहेत; तेव्हां सदरहू मालावर वादीचा अगर प्रतिवादीचा हक्क विशेष आहे, ह्याचा निकाल करण्याकरितां लिजिट्र साहेबांनीं स्पेशल अपील मंजूर केलें.

लिजिट्र साहेब ग्रांट साहेब व लार्किन साहेब.

ह्या मुकदम्याचा फुल कोडतानें विचार करून असें ठरविलें, कीं सदरहू शेता पैकीं दोन हिशांवर वादीपेक्षां प्रतिवादीचा हक्क कमी आहे, कारण प्रतिवादीनें रामभटावर झालेला आपला हुकूमनामा सदरहू हिशांवर पुरा करून घेण्याविषयीं हक्क शाबीत केला नाहीं; ह्या करितां त्या हिशांवरील जप्ती उठवावी; व असिस्टन जड्जाचा निवाडा रद्द करून मुनसफाचा निवाडा कायम केला आहे. फुल कोडतानें आणखी असें लिहिलें, कीं चार विघे जमिनीचे किमतिच्या योग्य हिशाची ह्मणजे ५४० रुपयांची फिर्याद व्हावयास पाहिजे होती. ह्या करितां त्या प्रमाणें जो खर्च आकारेल तो प्रतिवादीनें द्यावा.

---

## स्पेशल अपील नंबर २८६४.

अपिलेंट्

**योगिराज बिन जिवाजी गोरके**

रिस्पोंडेंट्.

**केशव सिद्धेश्वर शास्त्री**

दावा रुपये २९८११८६.

## ठराव.

जितक्या रुपयां बद्दल फिर्याद झाली असेल तितक्या रुपयां हून जास्त रुपये देण्याविषयीं ठराव झाला असतां तो ठराव अपील करण्यास योग्य कारण आहे.

**केशव सिद्धेश्वर** शास्त्री ह्यानें रुपये २९८११८६ खान्यावरून बाकी निघत होती, ती घेण्या करितां **योगिराज** बिन **जिवाजी गोरके** ह्यावरही फिर्याद केली. **योगिराज** ह्यानें जवाब दिला, कीं ही रक्कम मजला देणें नाहीं. **पुणे** शहरचे सदर अमीन ह्यानें ठराव केला, कीं प्रतिवादीनें वादीस खर्चासुद्धां ३१ रुपये ४ आणे ६ पै द्यावे.

तारीख १ अकटोबर सन १८५१

अपिलांत सदरहू हुकूमनामा असिस्टन जड्जानें बहाल करून असा अभिप्राय लिहिला, कीं वादीनें जी रकम प्रतिवादीच्या नानें आपले हिशेबांत जमा केली आहे ती पेक्षां जास्ती रकम फेडी करितां मीं दिली, असें प्रतिवादीनें अगदीं शाबीत केलें नाहीं, आणि जी रकम घेण्याकरितां वादीनें दावा केला त्या रकमे पेक्षां जास्ती रकम द्यावी ह्मणून कनिष्ट कोडतानें ठराव केला अशी प्रतितादी तकरार करितो; तर जास्त ठरविलेल्या रकमे बदल अपील केलें नाहीं, सबब ती वीषयीं कोडत चौकशी करणार नाहीं.

प्रदिवादीनें आसिस्टन जड्जाचे हुकूमनाम्यावर **स्पेशल** अपिल मंजूर व्हावें, ह्मणून **सदर अदालतीस** अर्जी केली. तींत त्यानें दोन कारणें अशीं लिहिलीं, कीं कर्जाबदल जो माल

वादीस मीं गहाण लावून दिला होता तो त्यानें गला परत दिला आहे, ह्या वरून असा पुरावा होतो, कीं वादीचें कर्ज मीं कांहीं देणें नाहीं, व सदर अमीन ह्यानें दाव्यापेक्षां जास्ती रकम देण्याविषयीं ठराव केला, त्या बद्दल असिस्टन जड्जानें कांहींच चौकशी केली नाहीं, हें त्यानें कायद्यास व चालीस विरुद्ध केलें. प्रारंभीं चौकशी करणारे **ग्राट** साहेबह्यानीं असें लिहिलें, कीं सन १८४३ चा अकट् ३ ह्या अन्वयें पहिले कारणावरून अपील मंजूर करतां येत नाहीं; परतु जास्त रुपये देण्याचा ठराव हा एक अपिलाचें कारण असिस्टन जड्जाकडे केलेल्या अपिलाचे अर्जांत लिहिलें असतां त्यानें चौकशी केली नाहीं. त्यास ही गोष्ट बरोबर केली किंवा कशी ह्या बद्दल ठराव करण्याकरितां **स्पेशल** अपील मंजूर केलें आहे.

फुल कोडतानें मुकदम्याची चौकशी करून ठराव केला, कीं वादीनें ज्या रकमे बदल फिर्याद केली होती त्या रकमेहून जास्त रुपये त्यास द्यावे, ह्मणून सदर अमिनानें ठराव केला, तर हें काम त्यानें कायदा सोडून केले ह्यांत संशय नाहीं, आणि ह्याविषयीं प्रतिवादी तकरार करीत असतां आसिस्टन जड्ज साहेब लिहितात, कीं ह्या कलमा बदल आमच्यानें चौकशी करवत नाहीं, ही असिस्टन साहेबांची चूक आहे, तर कनिष्ट कोडताचे हुकूमनाम्यांत जे रुपये प्रतिवादीनें द्यावें, ह्मणून ठराव झाला आहे, त्यांतून एक रुपया नऊ आणे वजा केले आहेत, आणि ह्या रकमे बदलचा खर्च वादीवर घातला आहे.

लिजिट् साहेब, ग्रांट साहेब, व लॉकिन साहेब.

## स्पेशल अपील नंबर २८८७.

अपिलेंट्

**शिवरामपंत बडबडे.**

रिस्पोंडेंट्

**योगानंद शेट** व दुसरा एक मनुष्य

दावा रुपये २९२८२८५.

### ठराव.

फिर्याद खात्यावरून असून खात्यावर प्रतिवादीचा सही असल व ही बंदीनें रुपयांची फेड करीन असें त्याचें वचन असेल, तर त्या फिर्यादीत सन १८२७ चा कायदा १८ कलम १० ह्यांत लिहिलेला ठराव लागू आहे, ह्मणजे फिर्याद करण्याकरितां खात्यास स्टांप लावला पाहिजे.

तारीख ९ आकटोबर सन १८५१

धारवाड जिल्ह्यांतील सदर अमिनाचे कोडतांत **शिवरामपंत** ह्यानें फिर्याद केली, कीं **योगानंदाकडे** मुद्दल व व्याज मिळून ३८९८७ खात्यावरूनच येणें निघतात, त्यास ते त्याकडून देववावे. खात्यावर **योगानंदाची** सही आहे. प्रतिवादीनें जाब दिला, कीं मी वादीचें कांहीं देणें नाहीं, व मराठी भाषेंत लिहिलेल्या खात्यावर माझी सही आहे. ती भाषा मला समजत नाहीं, व भलताच मजकूर वादीनें मला समजाविल्यावरून मीं खात्यावर सही केली.

ह्या मुकदम्याची चौकशी पुरी झाली नाहीं, असें जिल्हाजड्जाचे नजरेस आल्यावरून त्यानें मुकदमा प्रिन्सिपाल सदर अमीन ह्याकडे पुन्हा चौकशी करण्याकरितां पाठविला. त्यावरून त्यानें पुन्हा चौकशी केली. त्या वेळेस त्याचे नजरेस आलें, कीं एक रकम वहीवर चूकून जास्त पडली; ह्मणून त्यानें ती वजा करून वादीचे वतीनें रुपये २९२८२८५ चा हुकूमनामा केला. ह्या निवाड्यावर जिल्हे जड्जाकडे प्रतिवादीनें अपील केलें, तेव्हां जड्जानें प्रिन्सिपाल सदर अमीन ह्याचा हुकूमनामा असे कारणावरून रद्द केला, कीं खात्यावर प्रतिवादीची सही आहे, सबब खातें रोख्याप्रमाणें समजलें पाहिजे, आणि ह्याकरितां खात्यास स्टाप असला पाहिजे; परंतु त्यास स्टाप लावलेला नाहीं.

वादीनें जिल्हाजड्जाचे हुकूमनाम्यावर **सदर दिवाणी अदालतींत** अपील केलें, कीं चालते हिशेबांतील खात्यावर प्रतिवादीची सही असली तरी खात्यास स्टाप लावण्याची देशचाल नाहीं, ह्यावरून ह्या कलमाचा ठराव करण्याकरितां **ग्रांट** साहेबांनीं स्पेशल अपील मंजूर केलें. फुल कोडतानें असें ठरविलें, कीं चालते खात्यावर प्रतिवादीची सही असून हप्तेबंदीनें रुपयांची फेड करीन ह्मणून त्याचें वचन आहे, सबब ह्या देव घेवीस सन १८२७ चा कायदा १८ कलम १० ह्यांतील ठराव लागू आहे, ह्यास्तव जिल्हेजड्चा हुकूमनामा रद्द केला असे, व अपिलांत पुन्हा चौकशी करण्याकरितां जिल्हा कोडताकडे मुकदमा परत पाठविला आहे, तर जिल्हेजड्जानें खातें छापविण्याकरितां वादीस फुरसत देऊन नवीन निवाडा करावा, आणि त्या वेळेस **सदर अदालतींत** व कनिष्ट कोडतांत जो हल्लीं खर्च झाला आहे, त्या बदल हिसेरशीनें ठराव करावा.

लिजिट् साहेब, ग्रांट साहेब, व लर्किन साहेब.

## स्पेशल अपील नंबर २९०५.

अपिलेंट्

**मुरगीआपा मेन्सिकी.**

रिस्पोंडेंट्

**गिरीआपा तेली.**

दावा रुपये ३०.

## ठराव.

फिर्यादीचे वेळेस गहाणदाराचे कबजांत गहाण माल नसला तरी फिर्याद होण्या पूर्वी बारा वर्षांचे आंत कधीं सदरहू माल कबजांत असल्यास गहाणखताला बारा वर्षे झालीं असलीं तरी तें कायदा बाहेर गेलें असें समजूं नये.

**धारवाड** येथील मुनसफाचे कोडतांत **मुरगीआपा मेन्सिकी** ह्यानें ही फिर्याद केली, कीं **गिरी आपा** तेली ह्यानें कांहीं शेत तारण ठेवून साहा होन माझे भावापासून कर्ज घेतले. हल्लीं माझा भाऊ मयत झाला आहे, सबब मीं फिर्याद केली आहे, तर व्याज मुद्दल फिटे तों पर्यंत शेत माझे ताब्यांत देववावें. पुढें वादीनें पुरवणी अर्जी दिली, कीं प्रतिवादी पासून २८ रुपये देववावे, अथवा ही रकम तो देई पर्यंत शेत माझे कबजांत देववावें.

तारीख १५ आक्टोबर सन १८५१

**गिरी आपानें** जाब दिला, परंतु तो मुदत भरून गेल्यावर दिला. सबब फैलांत दाखल झाला नाहीं. मुनसफानें मुकदम्याची

चौकशी करून ठराव केला, कीं प्रतिवादीनें वादीचे ताब्यांत शेत द्यावें, आणि सर्व कर्ज फिटे तोंपर्यंत वादीनें तें आपले कबजांत ठेवावें. अपिलांत असिस्टन जड्जानें मुनसफाचा हुकूमनामा अशा कारणावरून रद्द केला, कीं वादीचे ताब्यांत गहाण माल नाहीं, आणि गहाणखतास बारा वर्षे होऊन गेलीं, सबब गहाणखत रद्द आहे.

असिस्टन जड्जाचे निवाड्यावर **स्पेशल** अपील मंजूर होण्याविषयीं **सदर अदालतीस** वादीनें अर्ज केला, तेव्हां अपील **लिंजिट** साहेबांनीं अशा कारणावरून मंजूर केलें, कीं अर्जी करण्याचे मिती पूर्वी बारावर्षांचे आंत वादीचे कबजांत गहाण माल होता असा मुनसफ कोडतांत पुरावा झाला असतां ज्या खतावरून दावा केला आहे तें खत कबजांत माल नसल्यामुळें कायद्या बाहेर गेलें असा असिस्टन जड्जानें ठराव केला. तर ही त्यानें चूक केली किंवा नाहीं, ह्या बद्दल ठराव झाला पाहिजे.

नंतर फुल कोडता समोर हा मुकदमा आल्यावर त्यानें ठराव केला, कीं फिर्यादीचे तारखे पूर्वी बारा वर्षांचे आंत वादीचे ताब्यांत माल होता असा मुनसफाचे कोडतांत पुरावा झाला आहे, सबब फिर्यादीचे मितीस **स्पेशल** अपिलेंट म्हणजे वादी ह्याचे ताब्यांत माल नव्हता, ह्यास्तव गहाणखत कायद्या बाहेर गेलें, असा ठराव असिस्टन जड्जानें केला, तो कायदा व देशचाल ह्यांस सोडून केला आहे; ह्या कारणावरून असिस्टन जड्जाचा निवाडा रद्द करून मुनसफाचा निवाडा बहाल केला असे, व खर्च **रिस्पोंडेंटावर** घातला असे.

लिंजिट साहेब, ग्रांट साहेब, व लॉकिन साहेब.

## स्पेशल अपील नंबर २९०६.

आपिलेंट्.

**सिद्दा बिन दाद सिद्दा बारकी.**

रिस्पोंडेंट्

**सन सिद्दापा.**

दावा रुपये ६८८

## ठराव.

**सदर अदालतीनें** ह्या मुकदम्यांत असें ठरविलें, कीं जर कसबीण निका लावील तर तो तिचे लग्नाप्रमाणें समजावा, व कसबिणींत वारशा बदल ज्या चाली असतील त्या निका लाविलेले कसबिणीचे संततीस लागू नाहींत.

**सिद्दा** बिन **दादसिद्दा बारकी** ह्यानें **धारवाड** जिल्ह्यांतील

तारीख १५ आक्टोबर सन १८५१

**हावरी** येथील मुनसफाचे कोडतांत फिर्याद केली, कीं **चिक बसल** ह्या गावांत दोन शेतें आहेत. त्या शेतांचा अर्धा भाग माझे ताब्यांत फार दिवसांपासून आहे, व बाकीचा अर्धा भाग माझी चुलती **पुतवा** व तिची मुलगी **अर्वा** ह्यांच्या ताब्यांत होता. तीं दोघे आतां मयत आहेत, आणि मी त्याचा वारस आहें सबब मीं ही फिर्याद केली आहे, तर त्यांचा हिस्सा प्रतिवादीकडून माझे ताब्यांत देववावा. त्या हिशावर त्याचा कांहीं हक्क नाहीं.

**सन सिद्दापानें** जाब दिला, कीं **पुनवा** हिचे बहिणीचा मी मुलगा आहें, सबब **अर्वी** मयत झाल्यांवर तिचा वारस मी ह्मणून माझे स्वाधीन तिच्या शेतांचा हिस्सा करावा, ह्मणून महालकऱ्यानें कलेक्टरास रपोट केला, आणि कलेक्टराच्या हुकमावरून तो हिस्सा माझे ताब्यांत आला.

मुनसफानें वादीतर्फे निवाडा केला होता, तो **धारवाडचे** असिस्टन जड्जानें फिरविला. त्यानें असें लिहिलें, कीं साक्षी पुराव्यावरून दिसून येतें, कीं **सन सिद्दापाची** आई कसबीण होती. मुनसफानें असें लिहिलें आहे, कीं तिनें एका धनगराशीं निका लाविला, ह्या कारणानें तिचे मुलाचा तिचे मालावर वारसा नाहीं; परंतु आमचें मत असें आहे, कीं कसबिणीच्या जातीच्या नियमा प्रमाणें **सन सिद्दापाचा** त्याचे आईचे मालावर वारसा आहे. कारण तिनें धनगराशीं कांहीं लग्न लाविलें नाहीं निका लाविला आहे. लग्न लावती तर प्रकार निराळा होता.

असिस्टन जड्जाचे निवाड्यावर **स्पेशल** अपील मंजूर व्हावें, ह्मणून वादीनें **सदर दिवाणी अदालतीस** अर्ज केला. तेव्हां **पुनवा** हिची बहीण **लिंगवा** हिनें **सन सिद्दापाचे** बापाशीं पाट लावला, सबब कसबिणीचा मुलगा ह्मणून्यानें **सन सिद्दापाचा** हक्क आपले आईचे मालावर पोहचण्यास हरकत नाहीं असा जो असिस्टन जड्जानें निकाल केला हा बरोबर आहे किंवा कसें, ह्याचा निर्णय करण्याकरितां **सदर अदालतींत स्पेशल** अपील मंजूर झालें.

**ह्या कलमाबदल फुल कोर्डतानें** खालीं लिहिल्या प्रमाणें नि-

लिजिट् साहेब, ग्रांट साहेब, व लार्किन साहेब.

वाडा केला. कोडताचे नजरेस येतें, कीं सन सिदापाचे आईनें निका लाविला, आणि त्या मुळें तिनें कसब करणें सोडून दिलें. असिस्टन जड्जाचे कोडतांत असा विचार निघाला होता, कीं आईचे कसबावरून तिचे मुलांस जो हक्क प्राप्त होतो, तो तिनें निका लावल्यामुळें बुडत नाहीं, आणि ह्या बदल चौकशी करण्याकरितां अपील मंजूर झालें आहे.

कोडताचे नजरेस येतें, की इतर जातीं मध्यें निका ह्मणजे सर्वांशीं लग्नच समजतात, आणि कसाविणीनें निका लाविला असतां तो लग्ना प्रमाणें न समजण्यास कांहीं कारण दिसत नाहीं, कारण निका लावल्यामुळें ती कसब करणें सोडून देते, सबब कसाविणी मध्यें वारशा बदल ज्या चाली आहेत त्या तिच्या संततीस लागू नाहींत; ह्यास्तव असिस्टन जड्जाचा हुकूमनामा रद्द करून रिस्पांडेंटा वर खर्च घातला असे.

---

## स्पेशल अपील नंबर २९३९

अपिलेंट्

**मोरो रघुनाथ काळे**

रिस्पोंडेंट्

**रावजी बाळाजी व त्याचे वहिवाटदार,**

**सालूबाई, अंताजी, व बाबाजी**

दावा रुपये २३१६११

## ठराव.

एक मनुष्य **ग्वालेरीस** होता, त्याकडून कर्ज वसूल करण्या करितां त्यावर व त्याचे वहिवाटदार हजर होते त्यांवर वादीनें **नगरास** फिर्याद केली. ही फिर्याद गैरशिस्त आहे, ह्मणून कनिष्ट कोडतांनीं वादीचा दावा रद्द केला; परंतु **सदर अदालतीनें** असा ठराव केला, कीं मुख्य प्रतिवादी अव्वल कोडताचे हुकमती बाहेर होता तरी त्यावर फिर्याद घेण्यास अव्वल कोडतास अधिकार होता.

**मोरो रघुनाथ** ह्यानें **रावजी बाळाजी** ( हा मनुष्य **ग्वालेरीस** होता. ) व त्याचे वहिवाटदार त्याची बायको **साळूबाई** व पुत्र **अंताजी** व **बाबाजी** ह्यांवर दस्तऐवजी यादीवरून कर्जाबद्दल फियाद केली.

तारीख २५ अक्टोबर सन १८५१

प्रतिवादींपैकीं **अंताजी** मात्र हजर होऊन त्यानें जबाब दिला, कीं मीं वादीचें देणें लागत नाहीं. माझा बाप **रावजी बाळाजी** ह्यापासून मी विभक्त आहें, व तो **नगर** एथील सर्व खटलें सोडून हल्लीं **ग्वालेरीस** रहात आहे.

**अहंमद नगरचे** प्रिनसिपाल सदर अमिनानें वादीचा दावा अशा कारणा वरून रद्द केला, कीं **रावजी बाळाजी** हा जिवंत आहे, सबब त्याचे वहिवाटदारांवर कायद्या प्रमाणें फिर्याद चालावयाची नाहीं, परंतु त्यानें आणखी असें लिहिलें, कीं जर वादीची मर्जी असेल तर त्यानें नवीन फिर्याद एकट्या **रावजी बाळाजी** वर करावी. प्रिन्सिपाल सदर अमिनाचे हुकूम नाम्यावर वादीनें **जिल्हा** जड्जाकडे अपील केलें, कीं ज्या ठिकाणीं प्रतिवादी रहात असेल किंवा जेथें फिर्यादीचें कारण घडलें असेल तेथें

फिर्याद करावी असें कायद्यांत आहे, व प्रतिवादी नगरचे रहाणारे असून नगरासच कर्ज दिलेलें आहे, व रावजी बाळाजी ह्यानें आपली बायको व पुत्र ह्यांस जें पत्र लिहिलें आहे कीं माझें कर्ज येणें आहे तें तुह्मी वसूल करावें तें पत्र मीं पुराव्यास दिलें आहे; त्या वरून तीं त्याचे वहिवाटदार आहेत हें शाबीत होतें, व ज्या प्रमाणें मीं फिर्याद केली आहे त्या प्रमाणें फिर्याद करण्यास जडूज कोडतांत मागें जे हुकूम नामे झाले आहेत त्यांवरून आधार आहे. कनिष्ट कोडतानें अभिप्राय लिहिला आहे, कीं प्रतिवादी रावजी स्वतां ग्वालेरीस असतां त्याचे वहिवाटदारांवर फिर्याद करण्याचा अखत्यार वादीस नाहीं, ह्या प्रमाणेंच जिल्हाजडजानें अभिप्राय देऊन कनिष्ठ कोडताचा हुकूमनामा बहाल केला.

मोरो रघुनाथ ह्यानें सदर अदालतीस अपील केलें. तें अपील लिजिट् साहेबांनीं मुख्यत्वें करून ह्या गोष्टीची चवकशी करण्याकरितां मंजूर केलें, कीं कनिष्ट कोडतांनीं वादीचा दावा विना कारण रद्द केला किंवा कसें; व त्यानीं असें लिहिलें, कीं फिर्यादीचें कारण जिल्ह्यांत घडलें त्यापेक्षां प्रतिवादी ग्वालेरीस असला तरी त्यावर फिर्याद करण्यास हरकत नाहीं, तेव्हां वहिवाटदारांचे जबाबदारीविषयीं विचार एकीकडे ठेवून अव्वल अर्जीवरून रावजी ह्या वरील फिर्यादीची चौकशी करण्याविषयीं कनिष्ट कोडतास काय बाध होता.

फुल कोडतानें मुकदम्याची चवकशी करून ठरविलें, कीं जरी मुख्य प्रतिवादी प्रिन्सिपाल सदर अमीन ह्याचे हुकमती बाहेर रहात आहे तरी फिर्यादीचें कारण जिल्ह्यांत घडलें सबब त्यावर फिर्याद घेण्यास त्याला अखत्यार आहे. ह्यास्तव कनिष्ट

लिजिट् साहेब, ग्रांट साहेब, व लार्किन साहेब.

कोडतांचे हुकूमनामे रद्द करून पुन्हा चौकशी करण्याकरितां मुकदमा जिल्ह्यांत परत पाठविला आहे, आणि हुकूम केला आहे, कीं **सदर अदालतींत** जो खर्च झाला आहे त्या बदल ठराव नवीन निवाडा करते वेळेस करावा.

---

## स्पेशल अपील नंबर २५५०

अपिलेंट

**भगवंत केशव**

रिस्पोंडेंट

**गोविंद बाजीराव**

दावा रुपये ९६२

**ठराव**

जी तकरार अपिलेंटानें केली नाहीं त्या तकरारी वरून अपिलांत पहिला हुकूनामा रद्द करूनये.

**नगर** जिल्ह्यांतील **जामखेडचे** मुनसफानें ह्या मुकदम्यांत वादीच्या तर्फे निवाडा केला. त्यानें असें लिहिलें, कीं घराण्यांतील समाईक शेता पैकीं तंट्यांतील चार बिघे शेत माझे हिशाचें आहे असें वादी ह्मणतो, आणि प्रतिवादी **गोविंद बाजीराव** तकरार करतो, कीं तें शेत गतकुळी आहे, व तें सरकारांतून माझे वहिवाटीस आहे; परंतु त्या चार बिघे शेतावर वादी **भगवंत केशव** ह्यानें आपला दावा शाबीत केला आहे,

तारीख ३० अक्टोबर सन १८५१

अपिलांत मुनसफाचा ठराव जड्जानें अशा कारणावरून रद्द केला, कीं सदरहू शेतांत वर्षास उत्पन्न होतें, सबब सन १८२७ कायदा ४ कलम ३ रकम १ ह्या बरहुकूम ह्या शेताचे एक वर्षाचे उत्पन्नाचे दसपटीचा दावा करावयाचा होता; परंतु एक सालचे उत्पन्नाचे किमतीची फिर्याद असतां ती मुनसफानें फैलावर घेतली.

**सदर दिवाणी अदालतींत** जैंट जड्जाचे हुकूमनाम्यावर स्पेशल अपील मंजूर व्हावें, ह्मणून **भगवंत केशवानें** अर्जी केली. तींत त्यानें असा मजकूर लिहिला, कीं मिरास जमिनीबदल दावा दसपटीचे आकारानें करावयाचा होता ह्मणून जैंट जड्जानें ठराव केला, तो कायद्या विरुद्ध केला आहे. तेव्हां **हट** साहेबांनीं अशा कारणावरून अपील मंजूर केलें, कीं इनाम शेताबदल सारा सरकारांत येत नाहीं, तेव्हां अशा शेताबदल मात्र सन १८३० चा कायदा १२ कलम २ प्रमाणें उत्पन्नाचे दसपटीचा दावा पाहिजे; परंतु तंटयांतील जमीन जैंट जड्जाचे हुकूमनाम्यांत मिरास ह्मणून लिहिली आहे, व मुनसफ ह्मणतो, कीं सदरहू शेत बिन दस्त (ह्मणजे ज्याचा सरकारास सारा मिळत नाहीं असें) ह्मणून अर्जीत लिहिलें आहे.

ह्या मुकदम्याची चौकशी करून फुल कोडतानें निवाडा केला, कीं ज्या तकरारी वरून जैंट जड्जानें मुनसफाचा हुकूमनामा रद्द केला ती तकरार ज्या पक्षकारानें त्याकडे अपील केलें त्यानें केली नाहीं, सबब जैंट जड्जानें अपिलाचा ज्या रितीनें निकाल केला त्या रितीनें निकाल करण्याविषयीं त्यास अखत्यार नाहीं. ह्यास्तव त्याचा हुकूमनामा रद्द करून पुन्हा चौ-

लिजिट् साहेब
ग्रांट साहेब, व
लॉकिन साहेब.

कशी करण्याकरितां अपील जिल्ह्यांत परत पाठविलें आहे, आणि असा हुकूम केला आहे, कीं सदर अदालतींत जो खर्च झाला असेल त्याचा ठराव नवीन निवाडा करते वेळेस करावा.

---

## स्पेशल अपील नंबर २४५९.

अपिलेंट्.

**बाळमित्र पालेकर** त्याचे वारस गोपाळ, **हरी, रामा आणि** गोपीका.

रिस्पोंडेंट्.

**येशू** बिन गनमात्र व **चिमा** बिन गनमात्र **पालेकर.**

दावा रुपये ८२५

### ठराव.

ह्या मुकदम्यांत असा ठराव झाला, कीं मुदलापेक्षां ज्यास्त व्याज देऊं नये असें जरी हिंदू शास्त्रांत आहे तरी व्याज देण्याचा जो करार रिणकोनाम ह्यानें दस्त ऐवजांत लिहून दिला असेल त्या प्रमाणें कोडतानें व्याज देववावें.

खालशांत आलेले कुलाब्याचे संस्थानांतील कांहीं गावांचे पाटिलकीचे व माहारकीचे हक्क परत घेण्याकरितां रिस्पोंडेंट् **येशू** व **चिमा** ह्यांनीं ही फिर्याद केली, आणि तींत असें लिहिलें, कीं **बाळमित्र पालेकर** ( हल्लीं मयत ) ह्यापासून घराण्यांतील लग्नखर्चाकरितां रुपये १८६ घेऊन त्याचे फेडीकरितां सदरहू हक्क गहाण

तारीख १० अप्रेल सन १८५०.

लावून दिले होते, व **बाळमित्र पालेकर** व दुसरे प्रतिवादी ह्यांस सदरहू वतनाचे उत्पन्नांतून कर्जाचे दुप्पट वसूल पावला आहे, सबब त्यांकडून सदरहू हक्क आह्मांस परत देववावे. प्रतिवादींनीं जाब दिला, कीं गहाण लावून दिलेले वतनापैकीं कांहीं वतन आह्मीं वादीस परत दिलें आहे, आणि बाकीचे वतनाचे उत्पन्नांतून मुद्दल व व्याज अजून फिटलें नाहीं. व्याजाबदल रोख्यांत करार दरमहा दर शेंकडा रुपया प्रमाणें आहे.

**कुलाब्याचे** एजंट साहेबानें ह्या मुकदम्याची चौकशी करून ठराव केला, कीं काळीकडील दप्तरचे दाखले वादीनें पुराव्यास दिले आहेत, त्यांवरून असें दिसून येतें, कीं पाटीलकीचे हक्का बाबद रुपये २५५ व माहारकीचे हक्काबदल रुपये १३० एकूण रुपये ३८५ प्रतिवादीस पावले आहेत, व हे रुपये दाम दुप्पटीपेक्षां जास्ती आहेत ह्याकरितां दरमहा दर शेंकडा रुपयां १ व्याज मिळेल असा जरी रोख्यांत करार आहे तरी सर्व कर्जाची फेड झाली असें समजलें पाहिजे, कारण त्या कराराप्रमाणें व्याज दिलें तर वतनाची मोकळीक कधींच होण्याचा संभव नाहीं, आणि प्रतिवादींनीं वादीची अज्ञानपणाची संधि पाहून सदरील व्याजाचा करार लिहून घेतला आहे, ह्या कारणावरून व हिंदूशास्त्राप्रमाणें दाम दुपटीहून जास्ती पैसा मागण्यास प्रतिवादीस हक्क नाहीं, ह्या कारणावरून प्रतिवादींनीं वादीचें सर्व वतन परत द्यावें.

प्रतिवादींनीं **सदर अदालतींत** सदरहू ठरावावर अपील मंजूर होण्याकरितां अर्ज केला, त्यांत त्यांनीं अशी तकरार लिहिली, कीं दरमहा दर शेंकडा रुपया १ प्रमाणें व्याजाबदल गहाणखतांत करार आहे. **बेल** साहेबाचे नजरेस आलें, कीं ह्या कामांत एजंटानें चूक केली कारण रिणकोनामांनीं जो व्याजाचा करार दस्त

ऐवजांत केला असेल तो सन १८२७ चा कायदा ५ कलम १० रकम १ प्रमाणें कायद्या वर हुकूम आहे असें समजलें पाहिजे; सबब त्यांनीं फुल कोडताकडे मुकदमा पाठविला. तेव्हां फुल कोडतानें असा ठराव केला, कीं एजंटानें जो हिंदुशास्त्राचा नियम जमेस धरिला आहे, तो व्याजावदल साफ करार असल्यावरून व बेल्ल साहेब ह्यांनीं जो कायदा लाविला आहे त्यावरून ह्या मुकदम्यास लागू नाहीं, ह्यावरून सर्व कर्जाची फेड होई तोंपर्यंत वतन वादीचे कबजांत देऊं नये.

बेल साहेब वारडिन साहेब व ग्रांट साहेब.

---

## स्पेशल अपील नंबर २५८३

अपिलेंट्

**जगजीवन सिवलाल गुजराथी.**

रिस्पोंडेंट्

**मोरो, व शामराव रामजी.**

दावा रुपये ३००

## ठराव

कितीकाळ गेला तरी गहाणदाराकडून गहाण माल घेण्याविषयीं मालकास हक्क आहे.

**मोरो** व **शामराव रामजी** ह्यांनीं फिर्याद केली, कीं **संदुक रामलालजी** ह्यानें एक घर **अंबाईदास लालजी** व **भवानदास पुणतांबकर** ह्यांपाशीं गहाण ठेविलें. त्यांनीं ते घर जग-

**जीवन सिवलाल** ह्यास दिलें. त्यानें हल्ली त्या घराचे जाग्यावर नवीन घर बांधण्यास आरंभ केला आहे; त्यास आह्मीं **संदुक रामलालजी** ह्याचे वारस आहों, आणि आह्मी गहाणाबदल ऐवज देतों, ह्याकरितां आमचें घर आमचे हवालीं करवावें.

**अहंमदनगर** जिल्ह्यांतील येवल्याचे मुनसफानें ह्या मुकदम्याची चौकशी करून ठराव केला, कीं तंट्यांतील घर एकानें दुसऱ्यापाशीं दुसऱ्यानें तिसऱ्यापाशीं गहाण ठेवितां ठेवितां शेवटीं प्रतिवादीचे हातांत आलें आहे, परंतु वादी हे घराचे वारस आहेत असा पुरावा झाला आहे. सबब रुपये ३११८५८३ गहाणाबदल येणें वाजवी आहेत ते प्रतिवादीनें घेऊन घर वादींचे हवाली करावें, आणि त्यांचे जाग्यावर त्यानें नवीन घर बांधिलें असेल किंवा तो बांधीत असेल तर त्याचें सामान त्यानें काढून न्यावें.

मुनसफाचे निवाड्यावर **जगजीवन** ह्यानें **अहंमदनगर**चे जैंट जड्जाकडे अपील अर्जी करून तक्रार केली, कीं सदरहू घर मजकडे गहाण आहे, व नवा इमला बांधण्यास मीं १००० रुपये खर्च केले आहेत, व घर बांधते वेळेस वादींनीं कांहीं हरकत केली नाहीं. अशी हकीकत असतां हल्लीं ते फिर्याद करितात, हें गैरशिस्त आहे. मुनसफ ह्याचे हुकूमनाम्यांत हात घालण्यास जैंट जड्जास कांहीं कारण दिसलें नाहीं, सबब त्यानें तो बहाल केला. नंतर **जगजीवन** ह्यानें **सदर अदालतीस** अर्जी केली, कीं तंट्यांतील घर मजकडे गहाण फार दिवस आहे, सबब सन १८२७ चा कायदा ५ कलम ८ रक्कम २ प्रमाणें माझे भोगवट्यास हरकत होऊं नये, व सन १८२७ चा कायदा ४ कलम ६० रक्कम २ हींतील ठरावा प्रमाणें घराची किंमत ३०० रुपये मज कडून देवविण्याचा ठराव व्हावा, कारण मुनसफाचे ठरावा प्रमाणें चालणें अशक्य आहे.

प्रथम चौकशी करणाऱ्या जड्जानें अर्जीतील कलमांचा विचार होण्या करितां अपील कबूल केलें; परंतु तें फुल कोर्डता कडे आल्यावर त्यानें तें काढून टाकिलें, कारण कीं अपिलेंट् ह्यांचे वकिलानें असें कबूल केलें, कीं सदरहू घर ज्या वेळेस पहिल्यानें गहाण पडलें, त्या वेळे पासून ज्या ज्या लोकांचे ताब्यात होतें त्या त्या लोकांचे ताब्यांत तें घर खरोखरी मालक ह्मणून नव्हतें, व सन १८२७ चा कायदा ४ कलम ६० रकम २ हिचे अर्था प्रमाणें अपिलेंटाचे घर सदरहू जाग्या वरून काढून टाकितां येणार नाहीं असें नाहीं, सबब त्याचे अर्जा प्रमाणें जाग्याचे ऐवजीं त्यानें पैसा द्यावा असा ठराव करववत नाहीं.

बेल साहेब

लिजिट साहेब, ग्रांट साहेब आणि लार्किन साहेब.

———

समाप्त.